# अनुक्रमणिका


| | | |
|---|---|---|
| १ | ‘ निधि ’ कीं ‘ रामसन्निधि ’ | १ |
| २ | ‘ तंत्र-मुक्ती ’नंतर गांधीवाद्यांची जबाबदारी | ४ |
| ३ | कर्जाचा प्रश्न | ९ |
| ४ | मानवाचें मूळ जमिनींत असावें | ११ |
| ५ | गांधीवाल्यांनीं आपल्या पायांवर उभें राहावें | १२ |
| ६ | ‘ नई तालीम ’ चे तीन सिद्धान्त | १७ |
| ७ | सेवेच्या साह्यानें सत्तेची समाप्ति | २६ |
| ८ | हिंदी चिनी भाई भाई असें केव्हा होईल ? | ३४ |
| ९ | व्यापाऱ्यांशीं चर्चा | ३५ |
| १० | तमिलनाड ग्रामदानाकरितां विशेष अनुकूल | ४० |
| ११ | प्रेमाक्रमण | ४१ |
| १२ | प्रत्येक कुटुंबानें एक कार्यकर्ता द्यावा | ४९ |
| १३ | सर्वोदय म्हणजे शासनमुक्ति | ५३ |
| १४ | ग्रामदान म्हणजे ग्रामस्वराज्य | ६१ |
| १५ | ग्रामदानामध्ये धर्म, अर्थ आणि विज्ञानाचा विचार | ६३ |
| १६ | ग्रामदानें जनशक्तीची निर्मिति | ६८ |
| १७ | ग्रामदान : आत्मावलंबन | ७४ |
| १८ | सज्जनांचें मत आणि दंड | ८४ |
| १९ | भक्तिमार्गाच्या पायऱ्या | ९४ |
| २० | व्यापाऱ्यांनीं धर्मानें वागून पुढारी व्हावें | १०३ |
| २१ | मालकीची आग विझवून टाका | ११० |
| २२ | ग्रामदानी गांवकऱ्यांनीं प्रचारक बनावें | ११३ |
| २३ | सत्तेनें व्यवस्थासत्ता कीं भक्तिमुक्ति ? | ११६ |
| २४ | समतेमध्यें च सुरक्षितता | १२३ |
| २५ | भोगाला योगमय बनवायचें आहे | १२७ |

| | | |
|---|---|---|
| २६ | मी पूर्णविराम नाहीं, प्रश्नचिन्ह आहे . . . | १३२ |
| २७ | माझा मरेल तेव्हां लोक जगतील . . | १३४ |
| २८ | आपलें ' नशीब ' स्वतः च भोगावें काय . . | १३६ |
| २९ | भूदानामध्यें अद्वैत, भक्ति आणि कर्मयोग . . | १४० |
| ३० | धर्मक्षेत्रांनीं तपस्येचा वारसा संभाळावा . . | १४३ |
| ३१ | द्रविड देशांत सत्यभाव स्थापित होवो . . . | १५१ |
| ३२ | योजना आणि श्रमशक्ति. . . . . | १५५ |
| ३३ | ग्रामदान म्हणजे स्वर्गाचा पूल . . . | १५९ |
| ३४ | ग्रामदान ईश्वराचा पहिला संकल्प . . . | १६४ |
| ३५ | गांधीजींच्या चरणीं सर्वस्व अर्पण . . . | १६५ |
| ३६ | सर्वोदयाचें अविरोधी दर्शन . . . | १६६ |
| ३७ | ग्रामदानी गांवात वर्णाश्रमधर्माची स्थापना . . | १७२ |
| ३८ | धर्मसंस्थांचें विविध कर्तव्य . . . | १७८ |
| ३९ | ग्रामदान–आत्मदर्शनाचा शोध . . . | १८४ |
| ४० | त्रिविध पुरुषार्थ . . . . | १८९ |
| ४१ | सरकारी नोकरांना . . . . | १९४ |
| ४२ | अमेरिकेंत सर्वोदयसमाज कसा स्थापित होईल ? . | २०१ |
| ४३ | ग्रामदान आणि विकासकार्य . . . | २०४ |
| ४४ | केरळमध्यें जमिनीची मालकी नाहींशी व्हावी . . | २०८ |
| ४५ | स्वामित्वविसर्जनांत कोणता हि दोष नाहीं . . | २०९ |
| ४६ | वायकम्-सत्याग्रहापासून धडा घ्या . . . | २१८ |
| ४७ | स्वामित्वविसर्जन पवित्रतम गोष्ट . . . | २२१ |



# भूदान - गंगा

## ( भाग नववा )

### ‘ निधि ’ की ‘ रामसन्निधि ’ : १ :

हिंदुस्थानांत एक मोठा संप्रदाय ( इन्स्टिट्यूशन ) आहे. तो इन्स्टिट्यूट संप्रदाय व इन्स्टिट्यूशन संस्था दोन्ही आहे. त्याचें नांव ‘ भिक्षा ’. दुसऱ्या देशांत भीक मागणें हा गुन्हा समजतात; पण जर येथें त्याला गुन्हा समजण्यांत आलें तर धर्म च गुन्हा मानला जाईल; कारण भिक्षा मागणें कांहीं लोकांचा धर्म च आहे. जर उद्यां असें म्हटलें गेलें कीं, “ भिक्षा मागणें अधर्म आहे, गुन्हा आहे, ” तर बाबा म्हणेल कीं, “ भिक्षा मिळाली तर च खाईन; नाहीं तर खाणार नाहीं. ” तुमचा तो कायदा कागदांत च राहील, आणि बाबाला लोक खाऊं घालतील; बाबाचे विरुद्ध कोणता हि कायदा चालणार नाहीं. भिक्षेंत एक मोठी खुबी आहे. आपण कोणा एकाचें अन्न खाल्लें, कोणा एकाचा आधार घेतला तर आपल्यावर त्याच्या पापपुण्याचा बोजा हि पडतो. माणिक्यवाचकर घरोघरीं जाऊन भिक्षा मागीत असत. सर्व घरांतून थोडें थोडें घेतल्यानें त्यांच्या पापपुण्याचा भार आपल्या शिरावर पडत नाहीं. ही आपल्या महाभारताची फार मोठी संस्था आहे.

#### ‘ भिक्षा ’ व ‘ भीक ’

परंतु काम केल्याशिवाय मागत राहाणें हा भिक्षेचा अर्थ नाहीं. ‘ तिरुकुरल ’मधें त्याचा स्पष्ट निषेध केला गेला आहे. वास्तविक रीत्या भिक्षा वेगळी व भीक वेगळी. भिक्षा धर्म आहे. मजूर आठ आण्याचें काम करतो आणि आठ आणे मिळवितो; परंतु भिक्षा मागणारा दोन हजार रुपयांची सेवा करील आणि आठ आण्याचें खाईल; याचें नांव ‘ भिक्षा ’.

शंकराचार्य फिरत असत व भिक्षा मागत असत. रामानुज हि फिरत व भिक्षा मागत. एकदां रामानुज भिक्षा मागण्यासाठीं एका घरीं गेले. दरवाजे बंद होते. असा प्रश्न आला कीं, दरवाजा कसा उघडेल आणि भिक्षा कशी मागतां येईल. त्यांनीं एक गाणें म्हणण्यास सुरुवात केली. गीत गातांक्षणीं च दरवाजा उघडला गेला आणि एका भगिनीनें येऊन झोळींत तांदूळ घातले. रामानुजांनीं जें भजन म्हटलें त्याचा अर्थ असा होता कीं, 'हे लक्ष्मीदेवी, भगवान् विष्णूचा दास तुझ्या दाराशीं आला आहे; ये आणि त्याला भिक्षा घाल.' त्यांनीं घरवाल्या भगिनीला सामान्य गृहस्थाची स्त्री मानलें नाहीं तर लक्ष्मी मानलें, आपल्या भगवान् विष्णूची पत्नी मानलें. ते संन्यासी आणि आचार्य शिरोमणि होते.

## नारायणाच्या सेवकांना भिक्षेचा अधिकार

सारांश, अशा प्रकारें देणाऱ्यांना विष्णु आणि लक्ष्मी समजून त्यांच्या-कडून भिक्षा घेतां त्याला कोणत्या हि प्रकारचें पाप लागत नाहीं. ज्याच्या हृदयांत आपल्याला खाऊं घालणारा मनुष्य वाईट असूं च शकत नाहीं तो साक्षात् विष्णु च आहे अशी भावना असेल, त्याला विश्वंभर विष्णूचें च अन्न खावयास मिळेल. नारायणाच्या सेवकांना नेहमीं भिक्षेचा अधिकार आहे. त्याच्या च आधारावर हजारों यात्रा चालतात. भगवान् बुद्ध आणि महावीरांचे शिष्य फिरत असत. चैतन्य आणि नानकाचे शिष्य फिरत असत. आणि येथें हि तम्मालवार व माणिक्यवाचकर फिरत असत. प्रत्येक प्रान्तांत मोठे लोक फिरले. ते कोणत्या आधारावर फिरले ? त्यांना खाण्या-पिण्याचा काय आधार होता ? स्पष्ट च आहे कीं, नारायण हा च त्यांचा आधार होता.

## प्रत्येक घर आमची बँक आहे

मी म्हणतों कीं, 'पूर्वजांनीं आम्हाला जो आधार दिला आहे तो आमच्यापासून कोण काढून घेणार ? म्हणून पुढें या च योजनेनें आंदोलन चालावें. लोक जमीन देतील आणि आमच्या कार्यकर्त्यांचे जीवनाधार हि बनतील. जो आपल्या जमिनींतील हिस्सा काढून देतो तो कार्यकर्त्यांची खाण्यापिण्याची सर्वसाधारण व्यवस्था करूं शकणार नाहीं का ? एकशेंतीस

एकर जमिनीचा एक मालक अकरा एकर जमीन देण्यास तयार झाला होता. मीं त्याला विचारलें, 'बंधु, सहावा हिस्सा कां देत नाहींस?' तेव्हां तो म्हणाला, 'शाळेसाठीं सात एकर जमीन वेगळी दिली आहे' नंतर मी म्हटलें, 'ही तर जुनी गोष्ट झाली. त्याचा उल्लेख आतां कशाला? आतां आणखी अकरा एकर जमीन द्या आणि सहाव्वा हिस्सा पूर्ण करा.' असें म्हणतां क्षणीं च त्यानें अकरा एकर जमीन दिली. विचार करण्यासारखी गोष्ट आहे कीं, एका मिनिटांत अकरा एकरांची बावीस एकर जमीन दान देणारा मनुष्य कार्यकर्त्याला जेवूं घालणार नाहीं? यावरून स्पष्ट होतें कीं, आम्हीं आमच्या कार्यकर्त्यांकरितां फार मोठा निधि चालू केला आहे. घरोघरीं आमची बँक आहे. प्रत्येक घरीं जाऊन आही मागूं शकूं.

## निधि कीं रामसन्निधि?

आतां च मीं आमच्या एका मुलीला केरळमध्यें काम करण्यास पाठवलें. तिला जवळ बसवून मीं येशू ख्रिस्ताचीं वचनें ऐकविलीं. येशू ख्रिस्तानें आपल्या शिष्यांना बोलावून सांगितलें होतें कीं, तुम्ही काम करण्यासाठीं जा, परंतु बरोबर सोनें, चांदी किंवा तांब्याचीं नाणीं नेऊं नका. तात्पर्य हें कीं, सोन्या चांदीची मोहर किंवा कवडी हि जवळ ठेवूं नका. ज्या घरीं जाल तेथें 'शांति' असें म्हणा. जर त्या घरीं तुम्हांला स्थान मिळालें नाहीं तर तुमची शांति तुमचेबरोबर परत येईल. समाजासमोर जा आणि विचार करूं नका कीं आतां काय बोलावें? कारण बोलणारे तुम्ही नाहीं. परमेश्वर तुमच्या मुखांतून बोलेल. जर येशू ख्रिस्तानें सांगितलें असतें कीं, तुम्हांला विचार करून बोललें पाहिजे, तर काय स्थिति झाली असती? त्याच्या शिष्यगणांत एक कोळी होता तर दुसरा सुतार. ते काय योजना करणार आणि काय बोलणार? समोर बसलेले बडे बडे विद्वान् होते, त्यांचेपुढें ते काय बोलणार? येशू ख्रिस्तानें त्यांना श्रद्धा देऊन पाठविलें होतें. त्यानें असें हि सांगितलें होतें कीं, तुम्ही दोन कोट ठेवतां कामा नयेत. हें च धन आहे आणि हा च निधि. जेव्हां मी आंध्रमध्यें फिरत होतों तेव्हां त्यागराज यांचें सुंदर भजन ऐकलें होतें. 'निधि चाल सुगमा, रामसन्निधि चाल सुगमा।'

निधि अधिक सुखदायक आहे का रामाचें सान्निध्य ? दोन्हींमधील तुम्ही काय पसंत कराल ?

म्हणून जेव्हांपासून हा ठराव पास झाला तेव्हांपासून माझ्या अंगांत विजेचा संचार झाला आहे. आता आम्ही कोणा हि मनुष्याजवळ जाऊन म्हणूं कीं, " दान द्या आणि काम करूं लागा." आतांपर्यंत ते सांगूं शकत होते कीं, " दुसऱ्या कार्यकर्त्यांना पगार मिळतो म्हणून ते संपूर्ण वेळ देऊं शकतात, पण आम्ही संपूर्ण वेळ कसा देऊं शकूं ? आम्हांला काय आधार आहे ? " परंतु आम्ही आता त्याला म्हणूं शकूं कीं, " तुम्हांला आतां रामसान्निध्याचा आधार आहे. ज्याच्याजवळ जाल त्याला राम माना आणि म्हणा श्रीरामचंद्रा, सहावा हिस्सा द्या." याचें च नांव राम-सान्निध्य; हे हातीं घ्या आणि कामासाठीं बाहेर पडा.

**ओड्डमछत्रम्** (मदुरा)
२५–११–'५६

## ' तंत्र-मुक्ती 'नंतर गांधीवाद्यांची जबाबदारी : २ :

भूदानकार्यासाठीं जागोजागीं समित्या स्थापन झाल्या होत्या आणि त्यासाठीं ' गांधी-निधी 'च्या संचित निधींतून त्यांना मदत मिळत होती आणि आज हि ती प्रेमानें मिळत आहे. निधीचा उद्देश गांधी-विचाराचा प्रसार हा आहे. गेल्या साडेपाच वर्षांत भूदान-आंदोलनामुळें गांधी विचार जितका पसरला तितका दुसऱ्या कशानें हि पसरला नाहीं; म्हणून ती मदत देणें व घेणें दोन्ही गोष्टी योग्य झाल्या, परंतु आतां पलनी येथें आम्ही प्रान्तीय व जिल्हा समित्यांची ती योजना मोडून टाकली. केंद्रीय निधींतून मदत न घेण्याचा संकल्प केला आणि त्यासाठीं ३१ डिसेंबर ही तारीख निश्चित केली.

**संघटना सद्विचारांचे प्रसारांत बाधक होते**

ईश्वर व त्याचें कार्य यांचेमध्यें जर एखादी संघटना निर्माण झाली तर

कधीं कधीं ती बाधक हि होते. मला आठवतें, एक खिस्ती मित्र माझ्याशीं सल्लामसलत करण्यास आला होता. तो आदिवासी लोकांत जाऊन सेवा करूं इच्छीत होता. त्यानें मला विचारलें, " आपण काय सल्ला देतां ? " बोलणीं इंग्रजींत चालूं होतीं म्हणून मीं त्यांना इंग्रजींत म्हटलें, " डू नॉट ऑर्गनाइज (संघटना करूं नका, निव्वळ सेवा करीत जा)." हें ऐकून त्याला फार आनंद झाला. नंतर त्यानें ऑर्गनाइझेशन ( संघटना ) केली. कारण तो त्याचा स्वभाव च होता. तरी हि तो मला म्हणाला, " आपण जें सांगतां तें च सेंट फ्रान्सीसनें हि सांगितलें होतें. " सेंट फ्रान्सिसनें असें सांगितलें होतें या नाही हें मला माहीत नाहीं. पण माझा हा मूलगामी विचार आहे कीं, सद्‌विचार हवेंत पसरू देणें चांगलें. तो जमिनींत पेरण्यानें त्याचा वृक्ष होतो आणि लोकांना त्याची सांवली मिळते. परंतु त्याच्या खालीं थोडेसे च लोक येऊन बसूं शकतात व तो मर्यादित होतो. या उलट जो विचार हवेंत पसरतो तो प्रत्येक हृदयाला स्पर्श करूं शकतो आणि कोठच्या कोठें जातो. म्हणून मीं विचार केला कीं, या वर्षी भूदानाचा विचार हवेंत पसरवावा. मी माझ्या मित्रांना हि म्हणत होतों कीं, " याशिवाय शांतिमय क्रांति होऊं शकत नाहीं. " सुरुवातीला त्यांच्यांत थोडीशी कां कूं, थोडा संकोच होता; व तो स्वाभाविक च होता. पण आज सर्व लोकांचा संकोच नष्ट झाला आणि त्यांनीं एकमतानें ठराव पास केला कीं, " आतां सर्व संघटना नष्ट केल्या जाव्या. आता आम्हीं निधीमधून मदत घेणार नाहीं. "

## मानवी हृदयावर श्रद्धा असावी

असें विचारलें जातें कीं, हें काम कोण करणार ? उत्तर आहे कीं, " ईश्वराचे सेवक करतील. " ते कोण असतील ? याचें हि सरळ उत्तर हें आहे कीं, ईश्वराला जे पाहिजेत ते. तरी हि व्यवहारांत गांधीजींच्या मूळ विचारावर श्रद्धा ठेवण्यावर च त्याची अधिक जबाबदारी येते. लोकांचे जवळ जाऊन समजाविल्यावर जमीन मिळते. असें वातावरण साडेपांच वर्षांच्या परिश्रमांनंतर निर्माण झालें आहे. परंतु सर्वांचा मानवी हृदयावर विश्वास नसतो. ही सर्वांत मोठी बाधक गोष्ट आहे. गांधीजींच्या सिद्धान्ता-( सत्याग्रह या सर्वोदयाचे सिद्धान्त)ची मूलगामी निष्ठा अशी आहे कीं,

'प्रत्येक हृदयांत परमेश्वर आहे आणि त्याला जागृत करतां येतें." जेथें ही श्रद्धा नसते तेथें लोकांजवळ जाऊन मागण्याची हिम्मत होत नाहीं आणि त्यावर विश्वास हि बसत नाहीं. तेलंगणांत जमीन मिळाली तेव्हां लोकांना वाटलें कीं, कम्युनिस्टांनीं संकट निर्माण केलें म्हणून असें घडलें. दुसऱ्या ठिकाणीं अशा प्रकारें जमीन मिळणार नाहीं. नंतर दिल्लीच्या यात्रेंत हजारों एकर जमीन मिळाली तेव्हां लोकांना वाटलें कीं, बाबामुळें मिळाली. नंतर उत्तर प्रदेशांत लोकामार्फत जमीन मिळाली तेव्हां लोक म्हणूं लागले, "जमीन मिळाली पण त्याची मालकी नष्ट झाली नाहीं. आपल्या जमिनींतील थोडासा भाग लोक देतात." नंतर बिहारमध्यें लाखो एकर जमीन मिळाली आणि ओरिसामध्यें हजार-पंधराशें ग्रामदानें झालीं आणि मालकी हि नष्ट झाली. इतकें सर्व पाहिल्यावर हि हृदयाची गांठ सुटली नाहीं.

कुराणांत याची एक सुंदर गोष्ट आली आहे. मुहम्मद पैगंबरांनीं सांगितलें होतें कीं, "जर तुम्ही इथें चांगले कार्य कराल तर मेल्यावर परमेश्वराचें सांनिध्य तुम्हाला लाभेल." लोकांचा विश्वास नव्हता. त्यावर मुहम्मद म्हणाले, तुम्ही कसे लोक आहात? तुम्ही चांगले काम कराल हि आणि मरणा-नंतर ईश्वराजवळ पाठविले गेल्यावर व ईश्वराला समोर पाहिलें तरी हि तुमची शंका जाणार नाहीं. तुम्ही विचाराल कीं, 'खर च हा ईश्वर आहे का? हे ईश्वराचें दर्शन घडत आहे का?' सारांश, तुमच्या हृदयावर मुहर (सील) लागले आहे ते काढून टाका. येशू ख्रिस्ताला असे च सांगावें लागलें होतें – "Oh, Ye of little faith!" श्रद्धेची थोडी तरी गरज आहे. त्याशिवाय जगांत नुसत्या पराक्रमानें काम होणार नाहीं. साध्या पराक्रमांत हि श्रद्धेची जरूरी असते. तेव्हा लोकानीं आपली मालकी सोडावी. प्राणा-पेक्षां प्यारी आपली जमीन द्यावी अशी श्रद्धा बाळगणें मनुष्याला जरा कठिण च वाटतें.

### गांधी-विचारावर श्रद्धा असणारांची जबाबदारी

हल्लीं लोकांचा कायद्यावर इतका विश्वास बसला आहे कीं, त्यानें ईश्वराची जागा घेतली आहे. ते समजतात कीं, कांहीं हि करावयाचें असेल,

तर कायद्यानें होईल. हृदयपरिवर्तन होऊं शकतें असें मानण्याला त्यांचीं मनें तयार नाहींत. तरी हि बाबानें हें काम सुरू केलें व जमीन मिळत आहे. भिन्न भिन्न राजकीय पक्षांनीं हि जमीनवांटपाचा कार्यक्रम ठेवला आहे. आतांपर्यंत कायद्याच्या मार्फत एक एकर हि जमीन वांटली गेली नाहीं. अशा स्थितींत कांहीं तरी करणें जरूर आहे. जे मित्र कामाला निघतात ते कांहीं ना कांहीं तरी काम करतात च. पण ज्याचा मानव-हृदयावर विश्वास आहे तो च या कार्याचें निदान घेऊं शकेल. गांधीजींचे सहकारी मानवी हृदयावर विश्वास ठेवण्यास बांधलेले आहेत. त्यांच्या गोष्टी आम्ही आचरणांत आणूं वा न आणूं, पण जर मानव-हृदयावर विश्वास ठेवण्याचें हि धैर्य आम्हांला झालें नाहीं तर गांधीजींच्या विचाराचा भार उचलूं शकणार नाहीं. विचार नसला म्हणजे तो खरोखरी च बोजा होतो. वास्तविकपणें तो बोजा नाहीं. ती डोक्यावर घेतलेली गोड न्याहारी आहे. जो खाण्याच्या उपयोगी येईल त्याचा भार हि फार मधुर वाटेल. परंतु त्यांत काय भरलें आहे हें ज्याला माहीत नाहीं त्याला तो दगडाच्या बोजासारखा च वाटेल. म्हणून जो लोकांचे जवळ शंकित मनानें जाईल त्याला त्यांच्याकडून उत्तर मिळणार नाहीं, जो श्रद्धेनें जाईल त्याला च मिळेल.

यापुढें कामाची जबाबदारी गांधी-विचाराचे आधारानें काम करणाऱ्या संस्थांवर च जाईल असें मला वाटतें. मी तर ईश्वराला सरळ सांगेन कीं, 'मीं सहा वर्षेपर्यंत हें आंदोलन पसरविलें. जर यापुढें हि हें काम पसरावें असें तुला वाटत असेल तर तूं आपल्या दुसऱ्या भक्तांना जाग्रत कर. जर हें आंदोलन पसरण्याची तुझी इच्छा नसेल तर ती तुझी इच्छा. त्यांत मी कांहीं करूं शकत नाहीं.' जोंपर्यंत माझें मन, वाणी व पायांत ईश्वर शक्ति देईल तोंपर्यंत मी दुसऱ्याला जाग्रत करण्याचा यत्न करीत राहीन. पण त्याचा प्रसार होण्याची काळजी करणार नाहीं. जेव्हां आम्हीं संचितनिधी-पासून मुक्त झालों, तंत्र मोडून टाकलें, तेव्हां याहून दुसरी कांहीं योजना आम्ही करूं च शकत नाहीं. मी निधिमुक्तीला फार महत्त्व देत नाहीं. त्याची तर ५-१५ दिवसांत योजना होऊं शकेल. संपत्तिदानामधून हि ती शक्य आहे. परंतु मुख्य गोष्ट ही कीं; 'आम्हांला तंत्र मोडावयाचें आहे.

मग कोणी विचारतील कीं, 'अशा स्थितींत शरीर च नष्ट झालें तर कसें होईल ? या शरीराला, सांगाड्याला, तंत्राला कायम ठेवलें असतें तर कांहीं काम जरूर झालें असतें. हें मला माहीत आहे. पण तें मर्यादित झालें असतें. अनंत अपार फैलावलें नसतें. म्हणून च आम्हीं तें तंत्र मोडलें. रोपट्याच्या-भोंवतीं कुंपण घालतों पण तें रोपटें वाढल्यावर कुंपण काढून टाकतों. तसें च आम्हीं हें केलें आहे. म्हणून जगांत गांधी-विचाराचे जितके लोक आहेत, जितक्या संस्था आहेत. त्या सर्वांनीं या कार्याची जबाबदारी उचलली पाहिजे. गांधी-विचार एकांगी विचार नाहीं. तो तर समग्र विचार आहे. इतर दुसरीं कामें करीत असतां ही गोष्ट जोडायला येईल. यासाठीं वेगळ्या संघटनेची आवश्यकता नाहीं.

आम्हीं हा एक नवीन धोका पत्करला आहे. याचा परिणाम असा होईल कीं, कदाचित् हें आंदोलन सुकून जाईल अथवा खूप फैलावेल, व्यापक होईल. आम्हीं परमेश्वराचें नांव घेऊन पाऊल उचललें आहे. त्याला जो परिणाम व्हावयाचा असेल तो होऊं दे. जे मित्र दुसरीं कामें करीत असतील त्यांनीं त्यांच्याबरोबर हें हि काम उचलावें. ही च आमची गांधी-विचारवाल्यांकडे मागणी आहे. मी हें जरा हक्कानें च आपणांस मागत आहे. कारण आपण आमचे समानधर्मी आहांत, एक विचार मानणारे आहांत, गुरुबंधु आहात.

गांधीग्राम (मदुरा)
२९-११-'५६

## कर्जाचा प्रश्न

: ३ :

एका मित्रानें असा प्रश्न विचारला आहे कीं, " ग्रामदान मिळाल्यावर आणि व्यक्तिगत मालकी नष्ट झाल्यावर कर्जाचें काय होणार ? " समजा, कोणी प्रेमानें कर्ज देणारा निघाला तर ठीक; पण तसा तो निघाला नाहीं तर कसें होईल ? तसें च आज जें कर्ज घेतलेलें आहे त्याचा प्रश्न कसा सुटणार ? हा प्रश्न सर्वांनीं मिळून सोडवावा. १५०० गांवांना ग्रामराज्य मिळालें आहे. तेथें सावकारांपाशीं जाऊन समजावलें जातें आणि कांहीं सावकार कर्ज सोडण्यास तयार होतात हि. कांहीं कर्ज परत हि केलें जातें. हें सर्व होतें च. सर्व जमीन एक झाली म्हणून सर्व मिळून जें देतील तें च दिलें जाईल. परंतु बाबाचें यावर वेगळें च उत्तर आहे. तें उत्तर तुम्ही देऊं शकणार नाहीं.

आपण जाणतां च कीं, भिन्न भिन्न राष्ट्रांच्या नांवांवर कर्जांचे खगोलार्थी ( ॲस्ट्रॉनॉमिकल ) आंकडे आहेत. एक अब्ज रुपयांचे सहा-सात आंकडे होतात. कधीं कधीं कर्जांचे १०–१२ आंकडे होतात. पण त्यामुळें काय होणार ? ते तर कागदावर लिहिण्यासाठीं आहेत. जेथें राष्ट्राचा प्रश्न येतो तेथें सर्वच्या सर्व कर्ज निरुपयोगी ठरतें या कर्जांचा अर्थ तरी काय ? आम्हीं पैसे दिलेल्याचा उपयोग झाला आणि चांगला उपयोग झाला. आतां कर्ज कसलें उरलें ? तुमच्या पैशाचा लोकांनीं उपयोग केला. तो पैसा उपयोगासाठीं च होता. तरी हि हे अवश्य पाहिलें जाईल कीं, ज्या लोकांनीं तें कर्ज दिलें त्यांचें जीवन हि चांगल्या प्रकारें चालावें. त्यांना उपाशी मरण्याची पाळी येऊ नये. बाकीचें कागदावर च राहील हें बाबाचें उत्तर.

### नैतिक आन्दोलन व संस्था

एक चौथा प्रश्न असा आहे कीं, आध्यात्मिक व नैतिक आन्दोलन थोड्या दिवसानंतर थंड पडतें. त्यानंतर त्याला पक्कें करण्यासाठीं एक तर संस्था करावी लागते अथवा कायदा. पण त्यामुळें त्याचा आत्मा च नष्ट होतो.

कायदा या संस्था बनविली नाहीं तर नैतिक आन्दोलनाचा वेग क्षीण होत जातो. आणि जर बनविली तर ती गोष्ट च नाहींशी होते. अशा परिस्थितींत काय करावें ?

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ।।

धर्म नाश पावत आहे असें जेव्हां ईश्वराला दिसतें तेव्हां धर्माच्या उन्नतीसाठीं तो अवतार घेतो. एकदां जी गति मिळते ती हळूहळू कमी होते. हा न्याय फक्त नैतिक आन्दोलनाला च लागू नाहीं तर प्रत्येक वस्तूला च लागू आहे. आम्हीं चेंडू फेंकला तर तो जोरानें जातो पण हळूहळू त्याचा वेग कमी होतो, त्याला वारंवार गति देणें भाग पडतें. तें तर नैतिक आंदोलन नव्हे. चेंडूची गति द्यायची असली तर ती हि वारंवार द्यावी लागते.

आपण रोज स्नान करतां तेव्हां शरीर स्वच्छ होतें. दुसऱ्या दिवशीं शरीर घाण होतें तेव्हा पुन्हां स्नान करतो. शरीरानें घाण होण्याचें व्रत घेतलें आहे व आम्हीं त्याला स्वच्छ करण्याचें व्रत घेतलें आहे. अशा आमचा व शरीराचा झगडा चालू आहे. शेवटीं कधीं कधीं मनुष्य स्नान केल्याशिवाय मरतो. तेव्हां शरीर जिंकतें व मनुष्य पराभूत होतो. तेव्हां मित्र त्याचें व्रत चालू ठेवण्यासाठीं त्याच्या मृत देहाला प्रथम स्नान घालतात व नंतर अग्नि देतात. कारण ते आपल्या मित्राचें व्रत शेवटपर्यंत चालू ठेवू इच्छितात. अशा तऱ्हेनें नैतिक आन्दोलनाची गति कमी झाली तर संस्था अथवा कायदा करावा हा त्याचा उपाय नव्हे. पुन्हा गति देणें हा च त्याला उपाय. गति देणारा कोणी पुरुष निर्माण होतो च. ही च परमेश्वराची करणी आहे.

गांधी-ग्राम ( मदुरा )
३०-११-'५६

## मानवाचें मूळ जमिनींत असावें : ४ :

मानवाला सर्वांत मोठी धोक्याची गोष्ट जर कोणती असेल तर ती म्हणजे जमिनीपासून वेगळें केलें जाणें. ज्याप्रमाणे प्रत्येक वृक्षाचें मूळ जसें जमिनींत असतें तसा च प्रत्येक मनुष्याचा संबंध जमिनीशीं असला च पाहिजे. मनुष्याला जमिनीपासून वेगळें करणें वृक्षाला जमिनीपासून वेगळें करण्यासारखें च आहे. आम्ही वर्तमानपत्रांत वाचतो कीं, अमेरिकेंत दर दहा मनुष्यांत एक मनुष्य मानसिक आजारानें पिडित आहे. याचें कारण तेथे मनुष्य जमिनीपासून वेगळा केला जात आहे. माझा असा विचार आहे कीं, मनुष्याचें जीवन जितकें पूर्ण होईल तितका तो सुखी होईल. भूमिसेवा पूर्ण जीवनाचें एक अनिवार्य अंग आहे. शेतीमुळें मोकळी हवा व सूर्यप्रकाश मिळतो. त्यानें आरोग्यलाभ होतो. शेतीमुळें मानसिक आनंद मिळतो, बुद्धि तीव्र होते. शेती परमेश्वरसेवेचें सर्वांत मोठें साधन आहे. जितक्या लोकांना पूर्ण जीवनाची संधि मिळेल तितकी समाजात शांति व समाधान नांदेल. म्हणून प्रत्येकाला कमींत कमी एक चतुर्थांश एकर तरी जमीन मिळेल अशी गावाची रचना करावयास पाहिजे.

### शेत हें उपासना, व्यायाम आणि ज्ञानाचें मन्दिर

समजा कीं, देशाला खाणींची जरूरी आहे असें निश्चित ठरलें. तर मी अशी योजना आंखीन कीं, खाणींत काम करणाऱ्यांसाठीं दहा मैलांवर चांगलीं घरें बांधलीं जावींत. त्यांच्या आसपास शेती असावी. त्यांना मोटारींतून खाणीपर्यंत आणलें जावें. तेथें त्यांनीं दोन तास काम करावें आणि नंतर मोटारीनें परत जाऊन शेतातील मोकळ्या हवेत काम करावें. त्यांना खाणींतील घाणेरड्या हवेंत आठ आठ तास काम कां करावें लागावें? कोणी मंत्री आपल्या मुलाला खाणींत आठ तास काम करावयास पाठवील काय? आम्ही जशी आमच्या मुलांसाठीं योजना करूं तशी च ग्रामयोजना केली पाहिजे. कांहीं लोकांनीं फक्त शेती करावी व बाकीच्यांनीं दुसरे धंदे

करावे ही रचना चांगली नाहीं. प्रत्येकाला दररोज २-३ तास शेतांत काम करण्याची संधि मिळाली च पाहिजे. नंतर उरलेल्या वेळांत त्यांनीं दुसरा उद्योग करावा. शेतकी मूलगामी सेवा आहे. शेत हें एक सुंदर उपासना-मंदिर आहे. शेत हें एक उत्तम व्यायाम-मंदिर आहे. शेत हें एक उत्तम ज्ञान-मंदिर आहे.

गांधी-ग्राम (मदुरा)
३०-११-'५६

## गांधीवाल्यांनीं आपल्या पायांवर उभें राहावें : ५ :

या गांवीं चांगलें कार्य चाललें आहे हें ऐकून मला फार आनंद वाटला. आज हि एका नवीन कार्याचा आरंभ होणार आहे. या सर्व कार्यांचे बाबतींत विचार करताना माझ्या मनात दुसरे च विचार येत होते. गांवांतील लोक दुःखी, दरिद्री आहेत ही गोष्ट खरी आहे आणि त्यांना बाहेरची मदत मिळाली पाहिजे हें हि योग्य आहे. शहरांतील लोकांना त्यांची सेवा करण्याची प्रेरणा झाली पाहिजे कारण त्याना आजपर्यंत खेड्यांकडून भरपूर मिळाले आहे. म्हणून मीं शहरवाल्यांना अनेक वेळां सांगितलें आहे कीं, तुम्हीं 'ग्राम-सेवक' झाले पाहिजे आणि खेड्यांतील लोकांना हि सांगतो कीं, तुम्हीं 'भगवत् सेवक' झाले पाहिजे. गांववाले ईश्वरसेवक झाल्यावर च शहरांतील लोकांनीं त्यांची सेवा करावी हें च ठीक होईल. परंतु त्यानीं परमेश्वराला विसरावें आणि आपला च स्वार्थ पाहात रहावें आणि दुसऱ्यांनीं त्यांची सेवा करावी असें झाल्यास त्यांना कांहीं हि लाभ होणार नाहीं.

### दुसऱ्यासाठीं केलेल्या त्यागानें च उन्नति

येथील लोकांना पैशाची जरूरी आहे. कोणीं यांना अंबर चरखा दिला आणि हे कांतू लागले. परंतु यांत गांववाल्यांनीं आपली शक्ति वाढविण्या-साठीं काय केलें ? बाहेरच्यांनीं तुम्हांस मदत केली यांत त्यांचे च कल्याण

आहे. तुमचें काय कल्याण आहे ? तुम्हांला २-४ पैसे जास्त मिळाले हा कांहीं फायदा नव्हे. जर गांवच्या लोकांनीं गांवासाठीं त्याग केला नाहीं तर गांवाची काय उन्नति झाली ? जे दुसऱ्यासाठीं त्याग करतात त्यांची च उन्नति होते.

## गांववाल्यांचे हातून धर्मकार्य व्हावें

आईबापांनीं मुलासाठीं त्याग केला, त्याला खाऊंपिऊं घातलें, तर आईबापांची उन्नति होते. पण मुलाची काय उन्नति होते ? असें म्हटलें जाईल कीं, मुलाला खावयास मिळतें, पण खावयास गाईच्या वासराला हि मिळतें. गाईच्या वासरासारखीं आमचीं मुलें जर नुसतीं खाणारींपिणारीं झालीं तर त्यांत त्यांची काय उन्नति होईल ? जेव्हां मुलें आईबापांचेसाठीं त्याग करतील तेव्हां च मुलाची उन्नति होईल. आईबापांची सेवा ते घेतात यांत त्याचा स्वार्थ आहे. मी गाईला खावयास घालतों आणि ती खाते. यांत माझी उन्नति होते. पण गाईची काय उन्नति होते ? तिला खाणें मिळतें. पण खाणें मिळण्यानें काय ती कायमची जिवंत राहील ? खाऊन खाऊन तिचीं इंद्रियें थकून जातील आणि एक दिवस ती मरून जाईल. अशा च प्रकारें गांवांतील लोक नेहमीं दुसऱ्याची मदत घेत राहतील तर जिवंत राहूं शकणार नाहींत. समजा कीं, येथील लोकांना बाहेरच्या लोकांनीं पुष्कळ मदत केली आणि हे लोक मरेपर्यंत जिवंत राहिले, कारण मरणानंतर जिवंत ठेवण्याची शक्ति कोणात हि नाहीं, तर मग मेल्यावर त्यांना कोणतें समाधान मिळेल ? त्यांना हे समाधान मिळेल का कीं, लोकांनीं आम्हांला खूप खाऊंपिऊं घातलें ? जेव्हां त्यांनीं दुसऱ्याला खाऊं घातलें असेल, दुसऱ्यासाठीं त्याग केला असेल, तेव्हां च त्यांना समाधान लाभेल. जेव्हां आपल्या हातून धर्मकार्य होतें तेव्हां च मरणाचे वेळीं त्याला समाधान मिळतें आणि तेव्हां च मनुष्याची उन्नति होते.

## दुसऱ्याच्या मदतीवर अवलंबून राहण्यांत धोका

माझ्या मनात नेहमीं असा प्रश्न निर्माण होतो कीं, गांवांतील लोक आपल्या शेजाऱ्यांपाजाऱ्यांसाठीं काय त्याग करतात ? सौंद्रम अम्मा येथें आली. तिनें एका बांधवाला अंबर चरखा दिला. तो आतां तुमचें सूत

गांधीग्रामांत नेईल; विणकराकडून विणून घेईल; मदुराईंत जाऊन विकण्याचें कष्ट करील आणि पैसे मिळाल्यावर तुम्हांला मजुरी देईल. ती इतकें सर्व कांहीं करील तर तिला मृत्यूनंतर स्वर्ग मिळेल. पण तुम्हांला काय मिळेल? गांवातील लोकांना दिसत आहे कीं, आपल्या गांवांतील एका गरिबाचें पोषण बाहेरचे लोक करीत आहेत आणि आम्ही या च गांवांत राहातों पण गांववाल्यांनीं तयार केलेली खादी विकत घेत नाहीं, तर त्यांना स्वर्ग कसा मिळेल? म्हणून आपल्या गांवीं तयार झालेली खादी च आम्ही वापरूं असा गावकरी निश्चय करतात तेव्हां मला आनंद होतो. या गांवांतील बंधुभगिनींना मजुरी मिळत राहील. आज सरकार खादीला मदत देत आहे. पण जर उद्या सरकार विचार करील कीं, 'आम्हीं खादीला कोठवर मदत करावी?' तर तुमचें कसें होईल? उद्यां महायुद्ध सुरु झालें आणि बाहेरून इथें येणारा आणि इथून बाहेर जाणारा माल बंद झाला तर पंचवार्षिक योजना मोडून पडेल व डॉक्टर सौंद्रमचें सर्व कार्य संपेल.

## स्वावलंबनाचें महत्त्व

मी महात्मा गांधींच्या आश्रमात रहात होतों. तेथें जवळ साबरमती नदी वहात होती. तिचें पाणी उन्हाळ्यांत आटत असे. त्या वेळीं पाण्याचा कांहीं भाग मुख्य प्रवाहापासून वेगळा होऊन त्याचें एक डबकें बनत असे. मी नदीला स्नानासाठीं जात असें तेव्हा डबक्यातील पाणी दिवसेंदिवस सुकून जात आहे असें दिसे. डबक्यामधील माशांना आनंदानें इकडे तिकडे उड्या मारताना पाहून माझ्या अंतःकरणाला दुःख होत असे. मला वाटे कीं, डबक्याचें पाणी मुख्य प्रवाहापासून वेगळे झाले आहे तेव्हा आतां त्यांचें कसें होणार? मला त्या माशांची दया आली आणि मी तें डबकें मुख्य प्रवाहाशीं जोडून दिलें त्यामुळे मासे इतके आनंदी झाले कीं, नाचतबागडत ते मुख्य प्रवाहाकडे धांवले 'कम्युनिटी प्रॉजेक्ट' एक मोठें डबकें आहे. सरकारच्या मार्फत त्यात भरपूर पाणी आलें आहे. परतु महायुद्ध सुरू होतां च तो मुख्य प्रवाह वाहण्याचें बद होईल आणि हें डबक्यातील पाणी हि संपून जाईल. मग ही आम्मा आपलें सूत घेऊन जाणार नाहीं. मग तुम्ही काय कराल? म्हणून जे गांव आपल्या पायावर उभें रहात नाहीं

त्याला बाहेरून किती हि मदत मिळाली तरी तें टिकूं शकणार नाहीं; परंतु पुढें अधिक च दुःखी होईल. ज्या गांवाला मदत मिळत नव्हती तें आपआपलें काम कसें तरी निभावून नेत होतें आणि निभावून नेईल हि. परंतु ज्यांना मदत मिळते ते आज मजेंत आहेत. परंतु मदत कमी होतां च अत्यंत हवालदिल, अनाथ होतील. म्हणून तुम्हीं दोन गोष्टी लक्षांत ठेवल्या पाहिजेत. (१) आपल्या उन्नतीच्या बाबतींत आपण विचार करणें. दुसऱ्यांनीं दिलेली मदत घेऊन खात रहाण्यांत आपली उन्नति नाहीं, तर दुसऱ्यासाठीं त्याग करण्यानें च होईल. (२) जें गांव फक्त बाहेरच्या मदतीवर च अवलंबून असेल तें धोक्यांत येईल.

### पैशानें भांडणें वाढतात

तुमच्या गांवीं चरखे वाढले आणि तुम्हांला जास्त पैसे मिळूं लागले, तर येथें भांडणें सुरू होण्याची भीति आहे. कताईच्या बरोबर प्रेम आलें पाहिजे. गांधीजींनीं म्हटलें होतें कीं, 'कताई अहिंसेचें, प्रेमाचें, चिन्ह आहे.' परंतु गांवांत चरखा चालू आहे म्हणून कताई चालते असें म्हटलें जाणार नाहीं. ती अहिंसावाली नव्हे तर पैसेवाली कताई होईल. पैसे आल्याबरोबर च बुद्धीमध्यें दोष निर्माण होतो. ही गोष्ट आम्ही कल्पनेनें सांगत नाहीं. कम्युनिटी प्रॉजेक्टमध्यें काम करणाऱ्या एका नेत्यानें मला आपला अनुभव सांगितला कीं, गांवाला जितका पैसा मिळतो तितक्या प्रमाणात भांडणें वाढतात, कमी होत नाहींत. हा दोष बाहेरून मिळणाऱ्या मदतीचा नाहीं, तर आम्हीं पैशाला महत्त्व दिलें आहे या गोष्टीचा आहे. श्रम आणि प्रेम यांना महत्त्व दिलें नाहीं. जर गांववाले आपल्यासाठीं कापड तयार करून तें च वापरण्याचा निश्चय करतील आणि शिलक राहिलेलें सूत बाहेर पाठवतील तर त्या गावांत शक्ति निर्माण होईल. आज गांवांत शक्ति नाहीं. फक्त बाहेरच्या शक्तीवर च तेथें काम होत आहे.

लोकांच्या हातात फक्त पैसा अधिक येण्यानें काम होत नाहीं. अमेरिकेंतील लोकांच्याजवळ जितका पैसा आहे त्याची बरोबरी जगांतील कोणता हि देश करूं शकत नाहीं. पण आज तेथल्या लोकांची काय स्थिति

आहे ? दर दहा मनुष्यांमागे एक मनुष्य मानसिक रोगानें पछाडलेला आहे. त्याला मॅनिआ म्हणतात. तेथें निरनिराळ्या प्रकारचे मॅनिआ आहेत. कोणी मुलगा परीक्षेत नापास झाला तर त्याचें डोकें बिघडतें. कोणाचें एखाद्या मुलीवर प्रेम होते आणि तिनें त्याचें प्रेम मानलें नाहीं म्हणून तो वेडा झाला. येथपर्यंत ऐकूं येतें कीं, मुलाने बापाजवळ खाण्याची वस्तु मागितली आणि बापानें ती दिली नाहीं तेव्हां मुलानें पिस्तुलानें बापास ठार मारलें. अमेरिकेंत घरोघरीं असें चालू आहे असें तुम्ही समजूं नका. तेथें सुद्धा पुष्कळ चांगले लोक आहेत. परमेश्वराच्या जगात चांगले लोक असतात च. तरी तेथें दहा मनुष्यात एकाला मानसिक रोग कां ? त्या ठिकाणीं पैशाची उणीव नाहीं परंतु पैसे अमाप आहेत. म्हणून च हें होत आहे.

## प्रथम पाया घाला

या गांवीं चागलें काम चालू आहे. त्याचा पाया चांगला असला पाहिजे. नाहीं तर एखाद्यानें सुंदर घर बाधलें, उंच उंच भिंती बनविल्या, त्यांवर सुंदर चित्रें कोरलीं परंतु पाया घातला नाहीं, नंतर पाऊस पडला, तर सर्वच्या सर्व भिंती चित्रादिकांसह कोसळून जातील. कांहीं लोक म्हणतात कीं आम्ही नंतर पाया बनवू. एका मुलानें आपल्या आईला स्वयंपाक करतांना पाहिलें. त्यानें पाहिलें कीं, स्वयपाकात चूल पेटविणें, भांडें ठेवणें, पाणी ओतणें आणि तादूळ घालणें या चार गोष्टी असतात. त्यानें प्रथम चूल पेटविली, नंतर त्यात तादूळ घातले, त्यावर पाणी ओतलें आणि त्यावर भांडे ठेवले. त्या च चार गोष्टी होत्या. पण प्रथम जे करावयाचें होतें तें केले नाहीं म्हणून भात तयार झाला नाहीं. ग्रामदान ग्रामराज्याचा पाया आहे. पाया पक्का करा आणि मग पहा कसें घर होते ! भूदानापूर्वी पधरावीस वर्षे खेड्यात काम केलें. खूप कष्ट करून हि आम्हाला पाहिजे तसें काम झाले नाहीं. याचें कारण जें काम आधीं करावयाचें होते ते आम्हीं नंतर केलें. प्रथम आम्हीं सूत कातणें सुरू केलें. त्यांत पेळू गिरणीचे होते. नतर लक्षात आलें कीं, आम्हाला पेळू केले पाहिजेत. परंतु कापूस यंत्रावर सरकी काढलेला होता. नंतर लक्षांत आलें कीं, त्यात कचरा

असतो. म्हणून कापूस पिंजणें सुरू केलें. नंतर लक्षांत आलें कीं, कापूस पाहिजे असेल तर जमिनीपासून सुरुवात केली पाहिजे. म्हणून भूदान सुरू झालें. १९२० सालीं कताई सुरू झाली. नंतर कापूस पिंजणें, कापूस निर्माण करणें आणि आता भूदान. मला माझ्या तीस वर्षांच्या कामांतून जी अक्कल मिळाली ती तुमच्यासमोर ठेवली आहे. आमच्यासारखे मूर्ख तुम्हीं होऊं नये अशी माझी इच्छा आहे.

गांधीग्राम ( मदुरा )
३०-११-'५६

## 'नई तालीम'चे तीन सिद्धान्त : ६ :

नवीन शिक्षणांत काम करणारे आपण अनुभवी लोक आहांत. येथील लोक फक्त तात्त्विक चर्चा करणारे नाहींत. कामाबरोबर विचारचर्चा हि करतात. जे लोक कामाबरोबर विचार-चिन्तन करतात त्यांच्या विचारांत सचोटी येते; म्हणून आपल्या प्रश्नांचीं उत्तरें मी व्यावहारिक दृष्टीनें देईन. आपले प्रश्न फार छान आहेत. त्यांचीं वेगवेगळीं उत्तरें देण्याची जरूरी नाहीं. प्रश्नांचा भाव लक्षात घेऊन उत्तर देतो. आपल्या प्रश्नाच्या मर्यादेंत राहाण्याचा प्रयत्न करीन.

### अहिंसेबद्दल प्रेम पण हिंसेवर श्रद्धा

नव्या शिक्षणामागें एक निष्ठा आहे. ती निष्ठा अहिंसेची आहे. आज जगांत असा कोणी मनुष्य नाहीं, असा समाज नाहीं, कीं ज्याला अहिंसा पसंत नाहीं कारण ही गोष्ट फार च गोड आहे; परंतु असें असून हि जेथे व्यवहाराचा संबंध येतो तेथें लोकांची श्रद्धा अहिंसेवर बसत नाहीं. लोकांचे हृदयात अहिंसेबद्दल अवश्य प्रेम आहे; पण आज ही श्रद्धा कशावर असेल तर ती हिंसेवर. आईवडील मुलांना समजाविण्याचा प्रयत्न करतात. जर त्यांची समजूत झाली नाहीं तर धाकदपटशा दाखवितात आणि त्यानें

झालें नाहीं तर मोठीं शस्त्रें काढलीं जातात. त्यांनीं हि काम पूर्ण झालें नाहीं तर अधिक तीव्र शस्त्र काढलें जातें. अशा प्रकारें अहिंसेसाठीं हि तीव्र, तीव्रतर आणि तीव्रतम विचार होतील तर ती नाममात्र अहिंसा राहील, वैचारिक अहिंसा होणार नाहीं. यासाठीं अहिंसेमध्यें सौम्य, सौम्यतर, सौम्यतम अशी च विचाराची पद्धति असली पाहिजे.

कर्मपरायण लोक नेहमीं प्रेमानें बोलतात आणि समजावितात. जेव्हां समोरील मनुष्याला समजत नाहीं तेव्हां एकदम आवाज चढतो. याचें च नांव हिंसेची प्रक्रिया. आमच्या प्रेमपूर्ण समजाविण्यानें जर परिणाम झाला नाहीं तर तीव्र समजाविण्यानें कसा होणार? यासाठीं आमचें प्रेम पुरेसें पडत नसेल तर आम्हांला अधिक प्रेम करण्याची इच्छा झाली पाहिजे. ही गोष्ट मी सर्व समाजासाठीं सांगत आहें. राजनीति, व्यापार, व्यवहार, सामाजिक क्षेत्र, कुटुंब– सर्वांसाठीं हें लागू होतें. हा च शिक्षणाचा मूलभूत सिद्धान्त आहे. हा विचार जर स्पष्ट होईल तर नवीन शिक्षणाचें पुढील कार्य समजणें सोपें जाईल. आम्हांला ही गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवली पाहिजे कीं, अहिंसा म्हणजे न मारणें, न पिटणें, शस्त्र खालीं ठेवणें या गोष्टी नव्हेत. त्या नकारात्मक आहेत. अहिंसेची प्रक्रिया या सर्वांहून भिन्न आहे; म्हणजे ती भावात्मक म्हणजे च प्रेमस्वरूप आहे.

### विचारांत व्यापक आणि कर्मयोगांत विशिष्ट

दुसरी गोष्ट अशी कीं, ज्याला आम्ही 'आम्ही' असे म्हणतों ते कोण आहे? त्याच्यांत कांहीं विचाराचा अंश आहे व कांहीं शरिराचा. जर आम्ही या दोन्हींच्या मिलापाचा विचार करूं तर आमचें कर्तव्य स्पष्ट होईल. आमची नजर फार दूर पाहूं शकत नाहीं. जर चष्मा लावला तर जरा अधिक दूरचें पाहूं शकेल. तरी हि त्याची एक मर्यादा आहे च. अशा प्रकारें हात, कान, पाय यांच्या शक्तीला मर्यादा आहे च. म्हणून आमचें कर्तव्यक्षेत्र शरिराच्या आसपास राहील. जीवनाची सारी रचना आसपासच्या लोकांच्या सेवेच्या विचारानें च झाली पाहिजे. सेवेचें हें एक सूत्र आहे. विचारानें आम्ही फार दूरवरचें पाहूं शकतों. जमिनीवर बसल्या बसल्या आकाशांतील चिंतन करूं शकतों. चिंतनाची शक्ति पुष्कळ व्यापक

## नव्या शिक्षणांत 'ब्रेड लेबर' (शरीरपरिश्रमानें च उपजीविका) याचा सिद्धान्त

तिसरा विचार फार मोठा आहे. जर आम्हांला तो समजला नाहीं तर नवीन शिक्षणांतील कर्मासाठीं असणारें आग्रहाचें रहस्य समजणार नाहीं. आज आम्ही जगाचें निरनिराळ्या प्रकारचें काम करतों. कोणी वकील आहे तर कोणी व्यापारी, कोणी प्रोफेसर, कोणी मंत्री, कोणी शेतकरी तर कोणी कांहीं. हें सर्व काम समाजासाठीं लाभदायक मानलें जातें. हें प्रामाणिकपणानें करणाऱ्याला योग्य लोकसेवक मानलें जाईल. आजचा समाज ज्याप्रमाणें बनला आहे त्याप्रमाणें त्यांत कांहीं दोष नाहीं. परंतु नवीन शिक्षण फक्त आजचा समाज लक्षांत घेऊन सेवा करण्याचें शिक्षण नव्हे. पुढें जो समाज तयार करावयाचा आहे त्या दृष्टीनें विचार करणारें 'नवीन शिक्षण' आहे.

त्या समाजाच्या आचरणाचें एक मोठें सूत्र असें आहे कीं, प्रत्येकानें आपल्या शरीराच्या आहारासाठीं शारीरिक परिश्रम केले पाहिजेत. दुसरें तिसरें बौद्धिक काम करून शरिराला खाऊं घालणें उत्तम धर्म नव्हे. शरीराचें पोषण शरीर-परिश्रमानें च केलें पाहिजे. याला च इंग्रजींत ब्रेड लेबर म्हणतात. भगवद्गीतेंत याला च यज्ञ असें नांव दिलें गेलें आहे. निढळाच्या घामानें च प्रत्येकानें आपली भाकरी मिळविली पाहिजे असें च खिस्तानें हि म्हटलें आहे. नवीन शिक्षणांत हा एक मूलभूत सिद्धान्त आहे. हें तत्त्व जे पूर्णपणें मान्य करीत नाहींत ते नवीन शिक्षण हि पूर्णपणें मान्य करणार नाहींत. नवीन शिक्षणांत कोणत्या हि क्रियेद्वारा ज्ञान प्राप्त करणें येवढी च गोष्ट नाहीं शिक्षणशास्त्रांतील कित्येक विचार करणारे सांगतात कीं, ज्ञानप्राप्तीसाठीं कांहीं ना कांहीं काम केलें पाहिजे. आम्हीं असें च गणित शिकवलें तर तें हवेंत उडून जाईल. पण कांहीं व्यावहारिक काम करतांना त्यामार्फत गणित शिकवूं तर मुलें सहज समजूं शकतील. हा अगदीं सामान्य शिक्षणपद्धतीचा विषय आहे. हें नवें शिक्षण नव्हे. आमचा असा दृढ विचार आहे कीं, आपल्या शरिराची उपजीविका शरीरपरिश्रमानें प्राप्त करणें हा धर्म आहे. जर आम्ही तसें

### नव्या शिक्षणांत 'ब्रेड लेबर' (शरीरपरिश्रमानें च उपजीविका) याचा सिद्धान्त

तिसरा विचार फार मोठा आहे. जर आम्हांला तो समजला नाहीं तर नवीन शिक्षणांतील कर्मासाठीं असणारें आग्रहाचें रहस्य समजणार नाहीं. आज आम्ही जगाचें निरनिराळ्या प्रकारचें काम करतों. कोणी वकील आहे तर कोणी व्यापारी, कोणी प्रोफेसर, कोणी मंत्री, कोणी शेतकरी तर कोणी कांहीं. हें सर्व काम समाजासाठीं लाभदायक मानलें जातें. हें प्रामाणिकपणानें करणाऱ्याला योग्य लोकसेवक मानलें जाईल. आजचा समाज ज्याप्रमाणें बनला आहे त्याप्रमाणें त्यांत कांहीं दोष नाहीं. परंतु नवीन शिक्षण फक्त आजचा समाज लक्षात घेऊन सेवा करण्याचें शिक्षण नव्हे. पुढें जो समाज तयार करावयाचा आहे त्या दृष्टीनें विचार करणारें 'नवीन शिक्षण' आहे.

त्या समाजाच्या आचरणाचें एक मोठें सूत्र असें आहे कीं, प्रत्येकानें आपल्या शरीराच्या आहारासाठीं शारीरिक परिश्रम केले पाहिजेत. दुसरें तिसरें बौद्धिक काम करून शरिराला खाऊ घालणें उत्तम धर्म नव्हे. शरीराचें पोषण शरीर-परिश्रमानें च केलें पाहिजे याला च इंग्रजींत ब्रेड लेबर म्हणतात. भगवद्गीतेत याला च यज्ञ असें नांव दिलें गेलें आहे. निढळाच्या घामानें च प्रत्येकानें आपली भाकरी मिळविली पाहिजे असें च खिस्तानें हि म्हटलें आहे. नवीन शिक्षणांत हा एक मूलभूत सिद्धान्त आहे. हें तत्त्व जे पूर्णपणें मान्य करीत नाहींत ते नवीन शिक्षण हि पूर्णपणें मान्य करणार नाहींत. नवीन शिक्षणात कोणत्या हि क्रियेद्वारा ज्ञान प्राप्त करणें येवढी च गोष्ट नाहीं शिक्षणशास्त्रांतील कित्येक विचार करणारे सांगतात कीं, ज्ञानप्राप्तीसाठीं कांहीं ना कांहीं काम केलें पाहिजे. आम्हीं असें च गणित शिकवलें तर तें हवेंत उडून जाईल. पण कांहीं व्यावहारिक काम करताना त्यामार्फत गणित शिकवूं तर मुलें सहज समजूं शकतील. हा अगदीं सामान्य शिक्षणपद्धतीचा विषय आहे. हें नवें शिक्षण नव्हे. आमचा असा दृढ विचार आहे कीं, आपल्या शरिराची उपजीविका शरीरपरिश्रमानें प्राप्त करणें हा धर्म आहे. जर आम्ही तसें

करीत नसूं तर दुसऱ्यांच्या खांद्यावर बसतों. मग आम्ही हिंसेंतून मुक्त होऊं शकत नाहीं. आपण हा विचार बरोबर या चुकीचा आहे असें म्हणा, पण नवीन शिक्षणाच्या मुळाशीं हा च विचार आहे. तसें पाहिलें असतां लोक व्यायामासाठीं शरीरपरिश्रम करणे चांगलें समजतात आणि ज्ञान-प्राप्तीसाठीं ' प्रोजेक्ट ' ( योजना ) प्रमाणें काम करणें चांगलें आहे. अशा प्रकारें जें काम करतात तें काम च आहे. पण तें ब्रेड लेबर नव्हे. नवीन शिक्षण ब्रेड लेबर या सिद्धान्तावर आधारित आहे आणि त्यावर श्रद्धा ठेवतें.

### जीवनांत श्रमांचें स्थान

लोक आम्हांला विचारतात कीं, " बाबा, आपण पायीं यात्रेचा इतका आग्रह कां धरतां ? " ह्याला कित्येक कारणें आहेत; परंतु एक कारण हें सुद्धां आहे कीं, आम्हांला थोडे शारीरिक परिश्रम झाले पाहिजेत असें वाटतें. हें माझें ' ब्रेड लेबर ' ( भाकरी कष्ट ) आहे. लोक मला खायला देतात आणि मी १०–५ मैल चालतो आणि समजतो कीं, माझ्या हातानें काहीं ' ब्रेड लेबर ' ( भाकरी कष्ट ) झालें. अशा प्रकारे यात्रेच्या बरोबर मीं ' ब्रेड लेबर 'चें नातें जोडून दिलें आहे. मागील तीस वर्षांपर्यंत तर ' ब्रेड लेबर 'च्या सिद्धान्तावर माझें जीवन चाललें आहे. साधारण आठ तास माझें काम होत च होतें; परंतु कधीं कधीं जास्त हि होत असे. कधीं शेती, कधीं पाणी शिंपडणें, दळणें, भंगीकाम, कताई, विणाई, धुलाई, सुतारकाम इत्यादि निरनिराळ्या प्रकारचें काम मी सतत कांहीं तास तीस वर्षे करीत होतों. त्यामुळें आमच्या बुद्धीची शक्ति पुष्कळ वाढली. आम्ही आज असें सांगूं इच्छीत नाहीं कीं, जो रात्रंदिवस शरीर-परिश्रम करेल त्याची बुद्धि तीव्र होईल. कोणती हि वस्तु ' जास्त ' होते तेव्हा त्याचा विकास थांबतो. आम्ही हे सांगूं इच्छितों कीं, ज्या जीवनामध्यें शरीर-परिश्रमांचा चागला अंश आणि त्याच्या च बरोबर चिंतन पण असेल तेथें चागला बुद्धिविकास होईल.

आमचा हा च अनुभव आहे. लहानपणीं आमची स्मरणशक्ति जरा चांगली होती, परंतु आज ६२ व्या वर्षीं ती स्मरणशक्ति लहानपणापेक्षां

अधिक तीव्र झाली आहे. जी गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगती आहे ती आम्ही विसरत नाहीं. कधीं कोणत्या पुस्तकांत चांगला विचार वाचला आणि तो पटला तर तो त्या भाषेच्या बरोबर आमच्या ध्यानांत राहातो. ह्याचीं कित्येक कारणें आहेत; परंतु हें कारण अवश्य आहे कीं, जीवनांत शरीर-परिश्रमांचा अंश आहे. आम्ही सांगूं इच्छितों कीं, फक्त कर्माच्याशिवाय ज्ञान होऊं शकत नाहीं. म्हणून कामाच्या द्वारा ज्ञान दिलें जावें येवढें च नवीन शिक्षण नव्हे; परंतु शरीर-परिश्रमानें उपजीविका प्राप्त करण्याच्या एका मोठ्या सिद्धान्ताला मान्य करून त्याच्या च आधारावर हें नवीन शिक्षण तयार झालें आहे.

**उत्तम राज्याचें लक्षण**

आतां पद्धतीचे बाबतींत मी कांहीं सांगणार आहे. हल्लीं सर्वांत श्रेष्ठ्चें शास्त्र म्हणजे राज्य-शास्त्र आहे. राजनीतिशास्त्रज्ञ सांगतात कीं, जे राज्य-सत्ता चालवीत नाहींत ते सर्वश्रेष्ठ होत. जे कमींत कमी सत्ता गाजवतील ते अधिकांत अधिक चांगलें राज्य होय. जेथें व्यवस्था केली जात आहे असें दिसून हि येत नाहीं असें एखादें राज्य असेल तर तें सर्वोत्तम राज्य होय. आज ईश्वराचें राज्य कशा प्रकारें चालू आहे. त्यांनीं अशी सुंदर व्यवस्था केली आहे कीं, स्वतः कोठल्या कोपऱ्यांत जाऊन झोंपला आहे न कळे. त्यानें निरनिराळ्या प्रकारची शक्ति आणि बुद्धि सर्व प्राणिमात्रांत वांटली आहे. तें एक परिपूर्ण विकेंद्रीकरण आहे आणि त्या च बरोबर सर्वांचा सहयोग करण्याची प्रेरणा हि आहे. त्याचा परिणाम असा होतो कीं परमेश्वर आहे किंवा नाहीं याची शंका लोकांना येऊं लागते. परमेश्वराच्या योजनेची सर्वांत मोठी खुबी ही च आहे कीं, परमेश्वर आहे कीं नाहीं असें म्हणण्याचें धाडस लोक करतात. फक्त असा संशय घेत नाहींत, तर नास्तिक होऊन ईश्वर नाहीं च असें हि म्हणतात.

असें घडलें पाहिजे कीं, दिल्लींत भारताचें उत्तम राज्य चालावें आणि कोणी पहावयास गेलें तर कोण राज्य चालवत आहे हें हि त्याला दिसूं नये. पार्लमेंट दिसूं नये. त्या मोठमोठ्या इमारती दिसूं नयेत. 'राज्य करणारे कोठें आहेत' असें विचारलें असतां उत्तर मिळावें कीं, 'ते

शेतांत काम करीत आहेत. ' जर विचारलें कीं, ' काय ? हे च राज्यकर्ते आहेत ? ' तर उत्तर मिळावें, ' हां. हे च. आतां च त्यांचें काम संपलें म्हणून ते शेतांत झाडाखालीं बसून आपसांत गप्पागोष्टी करीत आहेत. ' ' काय बधु, इराणवर हल्ला झाला आहे. त्या बाबतींत काय करावें ? त्यासाठीं काय सल्ला दिला जावा ? ' इत्यादि चर्चा चालावी. त्यांना विचारलें गेलें, ' आपण काय करीत आहा ? ' तर त्यांनीं उत्तर द्यावें कीं, ' आम्ही जगाचे राज्यकर्ते आहोंत आणि हिंदुस्थानचे हि. म्हणून शेतीचें काम संपल्यावर फुरसतीचे वेळीं आम्हांला या गोष्टींचा विचार करावा लागतो. ' ' विचार करून आपण काय करता ? ' ' सल्ला देतों. ' ' नंतर काय होतें ? ' ' जर लोकांना तो पसंत पडला तर तो मान्य करतात आणि पसंत पडला नाहीं तर अमान्य करतात. ' अशा प्रकारें जग फार चांगलें चाललें आहे असें जेव्हां दिसून येईल तेव्हां च त्याला उत्तम राज्य म्हणावें लागेल. आज तर अशी परिस्थिति आहे की, पंडित नेहरूंना दिल्लींतून हलविण्याची गोष्ट निघाली तर सर्व देश अशान्त, भीतिग्रस्त होईल. असा प्रश्न येतो कीं, मग राज्य कोण चालविणार ?

याशिवाय आज अशी स्थिति आहे कीं, पं. नेहरूंना हिंदुस्थानचें राज्य चालवण्यासाठीं सोळा तास काम करावें लागतें. पण ईश्वराला जगाचें राज्य चालविण्यासाठीं किती तास काम करावें लागतें ? हिंदूंना हा प्रश्न विचारला तर ते म्हणतील कीं, परमेश्वर क्षीरसागरांत झोपला आहे. तो कांहीं हि करीत नाहीं. याचा अर्थ असा कीं, राज्य चालविणें ही कांहीं क्रिया नाहीं. तो एक विचार, एक चिंतन आहे. चिंतनानें च जगाचें राज्य चाललें पाहिजे. क्रियेचें, योजनेचें जितकें कमी प्रमाण असेल तितकें राज्य चांगलें चालेल. ज्या राज्यांत शिपाई नाहींत, शस्त्रसामग्री नाहीं, लोकांसाठीं कोणत्या हि प्रकारची शिक्षा नाहीं तरी हि जे लोक सत्ता चालवतात, उत्तम सल्ला मान्य करतात, नीतीचा प्रभाव आपल्या मनावर होऊं देतात, तें च उत्तम राज्य होय.

## गुप्त शिक्षण हें च सर्वोत्तम शिक्षण

राज्याचा हा न्याय आम्हीं शिक्षणाला हि लागू करतों. जेथें शिक्षण

दिलें जात आहे व घेतलें जात आहे, पण त्याची जाणीव हि होत नाहीं, तें च सर्वोत्तम शिक्षण होय. आपण काय काम करीत आहां असें विचारलें असतांना असें सांगितलें जातें कीं, मीं भोजन करीत आहें, झोपलों आहें, खेळत आहें किंवा वाचत आहें. असें कोणी सांगत नाहीं कीं, मी "श्वासोच्छ्वास घेत आहें," जरी या झोपणाऱ्या, बोलणाऱ्या-वाचणाऱ्या या जेवणाऱ्यांची श्वास घेण्याची क्रिया निरंतर चालू आहे बाहेरच्या दुसऱ्या कामाचें च नांव घेतलें जातें. अशा प्रकारें नवीन शिक्षणांत विद्यार्थी व शिक्षक काय करीत आहेत असें विचारलें असतां "आतां शेतांत काम करीत आहेत, आजाऱ्यांची सेवा करीत आहेत, अथवा गांवाची सेवा करीत आहेत" असें उत्तर मिळावें. ज्ञान दिलें जात आहे या मिळत आहे असा जेथें भास होतो तेथें कृत्रिमता येते.

'आपण काय पीत आहां?' असा प्रश्न विचारला असतां असें उत्तर मिळतें कीं, 'दूध किंवा चहा'. कोणी हि असें म्हणत नाहीं कीं, मी दूध-साखर, चहा-साखर पीत आहें. साखरेची गोडी दूध या चहांत मिसळली आहे. दिसण्यांत असें दिसतें कीं तो दूध या चहा पीत आहे परंतु तो गपचूपणें साखर पीत असतो. शिक्षण हि असें च साखरेसारखें असावें. त्याचें काम अगदीं गुप्तपणें चालावें. दिसण्यांत असें दिसते कीं, हात, नाक, कान, डोळे, जीभ काम करीत आहेत, पण वास्तविकपणें आत्मा च काम करतो. आपले कान ऐकत आहेत व माझी जीभ बोलत आहे हें खरें आहे. जर हे कान या जीभ येथें कापून ठेवले तर ते बोलतील ऐकतील का? यावर असे दिसेल कीं, जरी दिसण्यात ते ऐकताना बोलतांना दिसले तरी फक्त जीभ बोलत नाहीं व कान ऐकत नाहींत. वास्तविकपणें आंत जें एक आत्मतत्त्व आहे तें च बोलतें व ऐकतें. पण तें गुप्त आहे. अशा च प्रकारें सर्वोत्तम नवीन शिक्षण तें च होईल कीं, जें गुप्त आहे. जें शिक्षण जितकें प्रकट दिसेल तितकी च त्यांत उणीव समजली जाईल.

गांधी-ग्राम (मदुरा)
३०-११-'५६

# सेवेच्या मार्गानें सत्तेची समाप्ति 

(तामीलनाडचे प्रमुख भूदान-कार्यकर्ते आणि जिल्हा संयोजक यांच्यापुढें दिलेलें भाषण)

## क्रांतिकारी निर्णय

पळणी येथें सर्वसेवासंघानें जो ठराव केला तो मोठा क्रांतिकारी आहे. अलीकडे कोणत्या हि कामाला क्रांतिकारी म्हणण्याचा रिवाज पडला आहे; पण हा ठराव तसला नाहीं; हा पूर्ण अर्थानें क्रांतिकारी आहे. आतांपासून क्रांति, भूदान-समित्या आणि जिल्हा भूदान-समित्या राहाणार नाहींत. ज्याला आपण ऑर्गनायझेशन (संघटन) तंत्ररचना म्हणतों तें सर्व आतां खतम होऊन जाईल. त्या ठरावाचा हा च सर्वांत मोठा भाग आहे. त्याचा दुसरा भाग असा आहे कीं भूदानाच्या कामाकरितां केंद्रीय गांधी-निधीकडून पैसा मिळत होता तो आतां आपण घेणार नाहीं, ही एक महत्त्वाची गोष्ट आहे. पण तंत्रमुक्तीच्या तुलनेनें तिचें महत्त्व कमी आहे, कारण केंद्रीय निधि सोडला तरी ठिकठिकाणीं संपत्तिदानांतून पैसा मिळूं शकतो. परंतु त्यांतून स्थानीय शक्ति उत्पन्न होते हा मोठा फरक आहे. *पण भूदान-समित्या बंद केल्या हा त्या ठरावाचा मुख्य भाग आहे.* त्या समित्यांऐवजीं आम्हीं सर्वच्या सर्व आंदोलन जनतेवर सोंपवून दिलें आहे. वेगवेगळ्या राजकीय पक्षांना भूदान पाहिजे आहे; तर आतां त्यांनीं भूदानाला जोर लावावा. ठिकठिकाणीं शिक्षणसंस्था आहेत, ग्रामपंचायती आहेत. त्या सर्वांनीं या कामाला जोर लावावा या-प्रमाणें सर्वांनीं हि जोर लावावा. परंतु ठिकठिकाणीं एखादा असा माणूस पाहिजे कीं, जो जिल्ह्यात अधिकारपदावर नसून सेवक मात्र राहील. आज जे संयोजक आहेत ते मालकासारखे सत्ताधारी नाहींत. तरी हि ते अधिकारी मानले जातात; कारण त्यांच्या हातीं एक समिति होती. परिणाम असा होत होता कीं, लोक म्हणत, "*तो संयोजक आहे आणि ती समिति*

आहे. ते भूदानाचें काम करतील च." बाबा येत आहे. त्याचा संदेश गांवोगांवीं पोहोंचवायचा आहे. तें काम कोण करील? तर म्हटलें जाईल कीं, "भूदान-समिति आणि तो संयोजक करील." यामुळें आमची शक्ति कमी झाली होती असें मी समजतों.

## विकास आणि निरोध यांचीं दुहेरी साधनें

हें आंदोलन कोण्या पार्टीचें नाहीं कॉंग्रेसचा अध्यक्ष येईल तर तो कॉंग्रेसवाल्याकडून व्यवस्था करील. प्रजासमाजवादी पक्षाचा पुढारी येईल तर तो आपल्या लोकांचेकडून व्यवस्था करील. लोक त्यांत सामील होतील, पण व्यवस्थेची जबाबदारी आपली आहे असें मानणार नाहींत. ती त्या पक्षवाल्यांची आहे असें समजतील. याप्रमाणें च बाबाच्या कामाची जबाबदारी भूदान-समितीची आहे, आमची नाहीं, असें लोक समजतील तर भूदानकार्य हि एक पक्ष बनून जाईल. यावर कोणी असें विचारील कीं, 'तुम्ही हें सर्व जाणत होतां तर मग हें तंत्र उभें तरी कां केलें?' त्याचें कारण असें आहे कीं, अशा समितिविना कामाची सुरुवात करणें मुष्किल झालें असतें. बाबाच्या हातांत कसली हि संस्था नाहीं म्हणून आरंभीं तशी योजना करावी लागली. परंतु एक वर्षापूर्वीपासून च हें तंत्र मी तोडूं इच्छीत होतों. विजवाडा येथील बैठकींत च मी म्हणालों होतों कीं, 'हें सर्व तंत्र तोडून टाका आणि हें आंदोलन जनतेवर सोंपवून द्या.' त्या वेळीं च जर तसें केलें असतें तर आज आमची शक्ति खूप वाढली असती असें मला वाटतें. परंतु त्या वेळीं आमच्या सोबत्यांना वाटलें कीं, शक्ति वाढण्याऐवजीं क्षीण होईल. म्हणून हळूहळू भूदानसमित्या बंद करूं. गेलें वर्षभर मी चिंतन करीत होतों.

मला असें सांगायचें आहे कीं, असल्या गोष्टी हळू हळू बंद होत नाहींत. त्यांना एकदम च तोडावें लागतें. ईशावास्य उपनिषदामध्यें सांगितलें आहे कीं, 'मनुष्याला विकास आणि निरोध अशी दुहेरी साधना करावी लागते.' आपण रोज सकाळीं प्रार्थनेमध्यें ईशावास्य म्हणतों. ईशावास्य उपनिषदाच्या थोड्याशा श्लोकांमध्यें आम्हांला जितका परिपूर्ण विचार दिसतो तितका जगांतल्या दुसऱ्या कोठल्या हि साहित्यांत मिळत नाहीं. 'गीता' ही एक

स्थानगा च ग्रंथ आहे. 'कुरल' हि मोठा नाहीं. परंतु त्यांत हजार पांचशें श्लोक आहेत. पण इशावास्यांत फक्त १८ श्लोक आहेत. पतंजलीचीं योगसूत्रें १९५ आहेत. तो छोटा ग्रंथ आहे. पण इशावास्याशी बरोबरी करूं शकत नाहीं. इशावास्यात जीवनाकरितां काय काय आवश्यक आहे त्याचा पूर्ण नकाशा या १८ श्लोकांत दाखविला आहे. त्यांत सांगितलें आहे कीं, 'कांहीं विकास आणि कांहीं निरोध पाहिजे.' इतकीं वर्षें विकास करण्याची खटपट केली, आतां निरोधाची संधि आली आहे. याप्रमाणें पुन्हां विकास सुरू होईल, नंतर निरोध. याप्रमाणें आपलें काम चालेल.

## जिल्हासेवकानें मध्यबिंदूवर रहावें

मी म्हणालों होतों कीं, 'एकदा जुना सांचा नाहींसा करा; मग नवा कसा करायचा हें आपल्याला सुचेल. नाहीं तर आम्हांला अक्कल च येणार नाहीं.' या ठरावाचा अर्थ आपण नीटपणें समजून घेतला पाहिजे. यापुढें एक एक जिल्ह्याकरितां एक एक मनुष्य राहील. त्याच्या हातीं कसली हि संस्था किंवा संचित निधि असणार नाहीं. कुठल्या संस्थेचें साहाय्य मिळावें अशी हि योजना नाहीं. जगलांत आमच्या विचाराचा एक एक बचा सोडून देऊं, मग तो तेथें आपलें नशीब पाहील. त्या जिल्ह्याकरितां असा एखादा हि *माणूस मिळणार नाहीं तर त्या ठिकाणीं आमचें* काम चालणार नाहीं असें आम्हीं समजू. तेथल्या लोकांना काम करायची इच्छा असेल तर ते करू शकतील. पण आमच्या वतीनें तेथें कोणी माणूस असणार नाहीं. प्रत्येक जिल्ह्यात काम चाललें च पाहिजे अशी कांहीं आमच्यावर जबरदस्ती नाहीं. आम्हाला थोडी च निवडणूक लढवायची आहे कीं त्याकरितां प्रत्येक जागेकरिता मनुष्य पाहिजे? अशा मनुष्याजवळ काय काय गुण असावेत यासंबंधीं थोडें सांगतो.

तो सगळ्यांचें सहकार्य मिळवील. प्रत्येकाच्या अंतःकरणांत जी ज्योति आहे ती त्याला दिसावी इतकें त्यानें प्रेममय झालें पाहिजे. म्हणून तो सर्व पक्षांचा सहयोग प्राप्त करील असें म्हणणें हि एक चुकीचा शब्दप्रयोग आहे. कारण तो काय प्राप्त करणार आहे? त्याला कांहीं मिळवायाचें नाहीं. तो लोकांकडून च काम करवील. तो लोकांच्या मागें कामाचा तगादा

राहील. असा सर्व लोकांशीं मिळून-मिसळून वागणारा मनुष्य पाहिजे. ज्याला सगळ्यांवर प्रेम करायचें आहे त्याजवर एका च पक्षाशीं संबंध न जोडण्याची जबाबदारी येते.

एक वर्तुळ आहे. त्यावर अ, ब, क, ड, प इत्यादि दहा पंधरा बिंदु आहेत. आपल्याला जर त्या सर्व बिंदूंपासून समान अंतरावर रहायचें असेल व सर्वांच्यावर सारखें प्रेम करायचें असेल तर आपण कोठें राहिलें पाहिजे? वर्तुळाच्या परिघावर राहूं तर कोणाच्या बरोबर ज्यास्त दोस्ती होईल तर कोणाशीं कमी. म्हणून त्यानें वर्तुळाच्या मध्यबिंदूवर राहिलें पाहिजे. तो या संस्थेंत नाहीं, त्या संस्थेंत हि नाहीं, असा त्याचा नकारात्मक व्यवहार राहील. तो मध्यस्थ राहील. म्हणून कुठल्या हि राजकीय पक्षांत राहणार नाहीं आणि जेथें निवडणुकी वगैरे होतात अशा कुठल्या हि संस्थेचा सदस्य होणार नाहीं. निवडणुकीचा अर्थ च हा आहे कीं, कांहीं थोड्या लोकांनीं आपल्याला पसंत केलें आणि कमी लोकांनीं नापसंत केलें तर आपण निवडून येतों. आता आपण सर्वांची सेवा करूं तर एकावन्न लोक म्हणतील कीं, 'हा लायक मनुष्य आहे. याच्या सेवेचा आपण स्वीकार करूं' आणि एकूणपन्नास लोक म्हणतील कीं, 'हा कुचकामाचा माणूस आहे.' परतु असली गोष्ट सर्वोदयाच्या दृष्टीनें कामाची नाहीं.

## मनु राजा कसा झाला

मनुमहाराज राजा कसे बनले याविषयीं एक जुनी कहाणी आहे. मनुमहाराज जंगलामध्यें तपश्चर्या आणि भगवताचें भजन करीत बसले होते. त्या काळीं कोणी राजा नसे. परंतु प्रजेमध्यें फार गडबड होत होती; म्हणून लोकांना वाटलें कीं, मनुमहाराज आमचे राजे होतील तर फार बरें होईल. मग लोक त्याच्याकडे गेले आणि म्हणूं लागले, "कृपा करून तुम्हीं आम्हांला मार्गदर्शन करावें." मनु म्हणाले, "मी आज येथें बसलों आहें आणि प्रत्येक जाणाऱ्याला मार्ग दाखवीत आहे. परंतु लोक त्या मार्गानें जात नाहींत त्याला मी काय करूं? मी भलाईचा रस्ता दाखवीत राहिलों आहें." मार्गदर्शन करणें हें तर साइन पोस्टचें काम आहे. तो या बाजूला मदुरा आहे अशी दिशा दाखवील; परतु तिकडे कोणाला जायचें च नसेल तर

तो गार्डन पोस्ट फोनाना हात पकडून त्याला त्या रस्त्यानें नेऊन जाईल का!" लोक म्हणाले, "तुम्हीं स्वर्गाचा रस्ता दाखविला ही गोष्ट खरी आहे, परंतु तो अगदीं अरुंद आहे. नरकाला जाण्याचा रस्ता चांगला मोठार रोड आहे; म्हणून त्या रस्त्यानें च आम्ही जाऊं इच्छितों!" म्हणून मनु म्हणाले, 'ठीक आहे, तुमची मर्जी.' पण लोक म्हणूं लागले कीं, 'आपण राजे झाले च पाहिजे. तर च आमचें काम चालेल.' तेव्हां मनु पुन्हां म्हणाले, "माझ्या दोन अटी आहेत. त्यांपैकीं एक अट ही कीं, लोकांनीं एकमतानें मनु राजा पाहिजे असें सांगितलें पाहिजे. तर च मी ही जबाबदारी घ्यायला तयार होईन. एक हि व्यक्ति तसें म्हणायला तयार नसेल तर मी राजा होणार नाहीं. माझी दुसरी अट अशी कीं, मला बरे-वाईट कांहीं कायदे करावे लागतील. त्या सर्वांची जबाबदारी, त्याचें सारें पापपुण्य, तुमचें च असेल. हे तुम्हांला मान्य असेल तर मी राजा बनायला तयार आहें." लोकांनीं त्या अटी मान्य केल्या आणि मनु राजा बनला—एवं मनुः राजा अभवत्।

### सेवेच्या द्वारें सत्तेची समाप्ति

आम्ही एका हि मनुष्यावर आमची सेवा लादणार नाहीं. यावर कोणी विचारील कीं, "आम्हांला सर्व लोक पसंत करणार नाहींत तर आम्ही सेवा च करणार नाहीं का?" त्याचें उत्तर असें कीं, "आम्ही सेवा जरूर करूं; पण निवडणूक लढवून नाहीं, निवडणुकीशिवाय च सेवेकरितां निवडणुकीची काय जरूरी आहे?" बाबा साडेपाच वर्षे सेवेकरिता पदयात्रा करीत फिरत आहे. त्याला कोणीं निवडलें? त्यानें च आपले स्वतःला निवडले. लोक त्याला असें म्हणत नाहींत कीं, 'तुम्हीं येथून चालते व्हा. आम्हांला तुमची सेवा नको. आम्हीं तुम्हाला निवडणार नाहीं.' पण येथें निवडणुकीचा प्रश्न च कोठें आहे? कोणी भला माणूस आजाऱ्याजवळ जाऊन म्हणेल कीं, 'माझ्यापाशीं औषध आहे, तें पाहिजे तर तुम्हांला देतों.' तर तो आजारी माणूस असें म्हणेल का, कीं 'तुमच्या मदतीची मला जरूर नाहीं? मी तुला निवडून दिलेलें नाहीं.' कोणी हि दुःखी जीव औषध घेईल च. सेवेकरितां निवडणुकीची जरूरी नाहीं हें जाणून तो कार्यकर्ता

निवडणुकीनें मिळणारें कोठलें हि स्थान किंवा जबाबदारी घेणार नाहीं. तो लोकनीति मानील आणि सरळ लोकसेवक बनेल. सरकारच्या साह्यानें लोकांना बदलण्याऐवजीं लोकांच्या मदतीनें तो सरकार च बदलून टाकेल. असा आमचा दुसरा मार्ग आहे.

आम्ही सरकारी सत्तेनें लोकांना बदलूं अशा वृत्तीनें सर्व राजकीय पक्ष काम करीत आहेत. आम्ही त्यांच्यावर टीका करणार नाहीं. त्यांच्यासारखे विचार करणारे लोक जास्त आहेत. आमचा समाज छोटा आहे. सत्तेच्या साहाय्यानें च सेवा करतां येते असें मानणारा मोठा समाज आज दुनियेंत आहे; पण आम्ही म्हणतों कीं, 'सेवेच्या च मदतीनें आम्ही सत्ता खतम करून टाकूं.' पण आणखी एक पंथ आहे. तो म्हणतो कीं, "सेवेच्या मदतीनें आम्ही सत्ता प्राप्त करून घेऊं. आज आमच्या हातीं सत्ता नाहीं. सेवा करतां करता ती आमच्या हातीं येईल."

कांहीं लोक बाबाला विचारतात कीं, 'बाबा, आमचा तुमच्यावर विश्वास आहे. पण तुमच्या चेल्यांचा काय भरंवसा? भूदानाचें काम करतां करतां ते केव्हां निवडणुकीला उभे राहतील हें कांहीं सांगतां यायचें नाहीं.' मी म्हणतों, 'सर्वांची परीक्षा १९५७ मध्यें होऊन जाईल. त्या वेळीं कांहीं लोक इकडून तिकडे जातील, तर कांहीं लोक तिकडून इकडे येतील.' आतां च ओरिसाचे माजी मुख्य मंत्री नवबाबू तिकडून इकडे आले. त्यांनीं मुख्य मंत्र्याच्या जागीं रहावें असें च सर्वांना वाटत होतें. ते तेथें असल्या-मुळें सरकारी काम सुलभ झालें होतें यात शंका नाहीं. तरी हि त्यांना त्या कामांत सार वाटलें नाहीं म्हणून ते इकडे आले. जे सेवेच्या साधनानें सत्ता प्राप्त करण्याचा विचार राखतात आणि मग सत्ता प्राप्त झाल्यावर सत्तेच्या साह्यानें सेवा करूं इच्छितात ते दोन्ही एका च प्रकारचे आहेत. आमचा तिसरा च मार्ग आहे.— सेवा सेवा–सेवा आणि तिच्या साह्यानें सत्तेची समाप्ति. याचें नांव आहे जनशक्तीचा विचार. मी याला लोकनीति म्हणतों. आमचे जे कांहीं कार्यकर्ते राहतील त्यांची दृष्टि अशी लोक-नीतीची च असेल.

### त्रिविध निष्ठावान जिल्हासेवक

आमचा माणूस सर्वांवर प्रेम करील आणि सर्वांपासून अलग राहील, ही त्याची गोष्ट योग्यता होईल. अशी त्याला योग्यता असली पाहिजे. त्याची दुसरी योग्यता अशी असली पाहिजे कीं, तो सत्य – अहिंसेवर विश्वास ठेवील आणि आपलें जीवन अपरिग्रही हि बनविण्याचा प्रयत्न करीत राहील. त्याची तिसरी योग्यता अशी कीं, सेवा करतांना अंतःकरणांत कांहीं गुप्त उद्देश तो ठेवणार नाहीं. तो केवळ सेवेकरितां च निष्कामसेवा करीत राहील. अशी त्रिविध निष्ठा ज्याच्यामध्यें आहे आणि आपला अधिकांत अधिक समय जो या कामाला देईल, असा एक एक मनुष्य प्रत्येक जिल्ह्याकरितां पाहिजे.

### पळणी निर्णयाचे तीन संभाव्य परिणाम

आम्हीं भूदानसमित्या बंद करण्याचा जो निर्णय घेतला आहे त्याचे तीन परिणाम होऊं शकतात.

( १ ) सर्वच्या सर्व आंदोलन बंद होऊन जाईल. जें सर्वांचें काम असतें तें कोणी न करीत नाहीं.

( २ ) सर्व च लोक उठतील आणि कामाला लागतील. तसें पाहिलें तर सर्व च गोष्टी परमेश्वराच्या मर्जीवर अवलंबून असतात. परंतु त्यानें कांहीं अंश आमच्यावर हि सोंपविला आहे. परंतु या दोन्ही गोष्टी ईश्वराच्या इच्छेवर च अवलंबून आहेत. असा हि संभव आहे कीं, आतां कोणाला प्रेरणा मिळणार नाहीं. एक नाटक होऊन जाईल. बाबा मूर्ख आहे म्हणून तो फिरत राहील. बाकी सर्व काम खतम होऊन जाईल. आणि ईश्वराची इच्छा असेल तर सर्व लोक कामाला लागतील.

( ३ ) तिसरा परिणाम असा होऊं शकतो कीं, सर्व रचनात्मक कार्यकर्ते – मग ते कोणच्या हि पक्षांत असोत – ते एकदम जागे होतील. येथें गांधीग्राम म्हणून एक संस्था आहे. आजपर्यंत ते समजत, कीं भूदानाचे काम करायला भूदान समित्या आहेत. त्या समित्या जेवढी मदत मागतील तेवढी आम्ही देऊं. परंतु आतां त्यांची मदत मागायला कोणती समिती च नाहीं. तेव्हां ती जबाबदारी आतां आपली च आहे असें ते समजून जातील. रचनात्मक

काम करणारे असें मानणार नाहींत तर ते आपल्या कामाच्या श्रद्धेचें मूळ च कापून टाकतील. म्हणून आतां ते लोक जाग्रत होतील आणि आपआपल्या कामाबरोबर च भूदानाचें हि काम करतील.

नई तालीमवाले विचार करतील की, आम्हांला गांवोगांवीं नई-तालीम सुरू करायची आहे. परंतु जोंपर्यंत आजची विषमता नाहींशी होत नाहीं तोंपर्यंत गांवच्या सर्व मुलांना समान पोषण आणि रक्षण मिळणार नाहीं. अशा परिस्थितींत त्यांना शिक्षण तरी कसें देतां येईल? म्हणून आर्य-नायकमजी माझ्याबरोबर गेले सहा-सात महिने फिरत आहेत. आतां यापुढें भूदानाचें काम आपलें च काम आहे अशा सूचना ते आपल्या सर्व संस्थांना देणार आहेत.

याप्रमाणें खादीवाल्यांना हि माहीत आहे कीं, भूदान-आंदोलन तितकें वाढल्यानंतर हि जर बंद होईल तर खादी हि बंद होऊन जाईल. गेल्या ४–५ वर्षांत सर्वोदयविचाराची प्रतिष्ठा वाढली आहे म्हणून च सरकारनें खादीला मान्यता दिली आहे. मग सरकार म्हणेल की, " आम्हीं खादीला मदत दिली पण त्यांत पैसा फार खर्च होतो आणि काम कांहीं होत नाहीं. खादी ही टिकणारी कांहीं वस्तु नाहीं. म्हणून जेथें अतिशय बेकारी असेल तेथें तेवढे चरखे चालवावेत; बाकीच्या ठिकाणीं गिरण्या." असें झालें म्हणजे सरकारच्या आधारावर चालणारें खादी काम खतम होऊन जाईल. म्हणून आतां गांधी-विचारावर निष्ठा असणाऱ्या सर्व लोकांचा आत्मा जाग्रत होईल.

### आकाशाकरितां कोठडी नाहीं

सर्वसेवासंघाशिवाय ज्या दुसऱ्या घटनात्मक संस्था आहेत त्यांच्यामध्यें ही त्रिविध निष्ठा असेल तर आम्ही त्यांना मान्यता द्यावी. अशा सर्व संस्था आपल्या कामाबरोबर च भूदानाचें हि काम करतील. आपल्या घरीं झोंपण्याकरितां खोली असते. जेवण्याकरितां असते, धान्य ठेवण्याकरितां कोठी असते. परंतु आकाशाकरितां वेगळी कोठडी असते का? आकाशा-करितां वेगळी खोली असत नाहीं. प्रत्येक खोलींत आकाश असतें च.

त्याप्रमाणे च भूदानाकरितां स्वतंत्र संस्था असणार नाहीं. प्रत्येक घर आणि प्रत्येक संस्था त्याची च आहे.

गांधीग्राम (मदुरा)
३०-११-'५६

## हिंदी चिनी भाई भाई असें केव्हां होईल ? : ८ :

आम्हीं जमिनीची मालकी नाहींशी करण्याचा जो अखिल भारतीय संकल्प केला आहे त्यांत आपण शामील झालें पाहिजे. आम्ही जमिनींची मालकी नाहींशी करूं. जमीन सर्वांची करून देऊं. कारखाने वगैरेंचा हि लाभ सर्वांना मिळावा असें आम्हाला पाहिजे आहे. मालक-मजूर भेद नाहींसा करून आम्ही भाऊ भाऊ होऊं.

आत्तां च चीनचे प्रधानमंत्री चाँओ हिंदुस्थानांत आले आहेत. तर दिल्लीमध्यें हिंदी-चिनी भाई-भाई अशा घोषणा होत आहेत. बुल्गानिन आला होता तेव्हां हिंदी-रुसी भाई-भाई अशा घोषणा होत होत्या. मी म्हणतों कीं, 'अरे, प्रथम तुम्ही गावचे शेजारी शेजारी तर भाई भाई बना. जर हे शेजारी भाई भाई बनले नाहींत तर 'हिंदी चिनी' आणि 'हिंदी रुसी' भाई भाई बनूं शकतील काय? आम्ही 'वंदे मातरम्' म्हणतो. पण रवींद्रनाथ टागोर म्हणत कीं, 'वंदे भ्रातरम्' म्हणण्याची जरूरी आहे. आपण आपल्या भावाला च भाऊ मानलें नाहीं तर काय आईला सुख होईल? भारतमाता आम्हां सर्वांची जर माता आहे, आम्ही सर्व भाऊ भाऊ आहों, तर भावाला भावाचा हक्क मिळाला च पाहिजे. आपल्या देशांत जी काहीं जमीन आणि संपत्ति आहे ती सर्वांची आहे आणि सर्वांकरितां आहे.

३-१२-'५६

प्रश्नः—भूदान आणि संपत्तिदान यांचे काय सिद्धान्त आहेत ?

## दरिद्रनारायणाला प्रत्येक घरीं प्रवेश मिळावा

उत्तरः—भूदानाची बरीच प्रगति झाल्यावर मीं संपत्तिदानयज्ञ सुरू केला. भूदानाचा सिद्धान्त असा आहे कीं, परमेश्वराने जमीन सर्वांकरितां केली आहे; म्हणून सर्वांनीं काम करावें आणि वांटून खावें. ज्याना दुसरा धंदा नाहीं आणि जे शेती करूं इच्छितात अशा भूमिहीन मजुरांना जमीन मिळाली पाहिजे. आज ज्यांच्या हातीं जमीन आहे ते तिचे मालक नाहींत, ट्रस्टी आहेत; म्हणून जमिनीवर काम करायला तयार असणारा मागायला आला कीं त्याला जमीन देणें हें ट्रस्टीचें कर्तव्य आहे. त्याप्रमाणें च संपत्तिदानाचा सिद्धान्त असा आहे कीं, प्रत्येक मनुष्यानें – मग तो श्रीमंत असो वा गरीब – आपल्या संपत्तीचा एक भाग समाजाला द्यावा. मीं म्हटलें च आहे कीं, 'दरिद्रनारायणाला, समाजाच्या प्रतिनिधीला, म्हणजे मला तुमच्या घरीं स्थान पाहिजे. आज मी कुणाच्या हि घरीं जाऊन खायला मागूं लागलों तर हिंदुस्थानच्या कोणत्या हि घरांतून मला नकार मिळणार नाहीं. लोक मजवर इतकें व्यक्तिगत प्रेम करीत आहेत; पण मी व्यक्ति नाहीं, दरिद्रनारायणाचा प्रतिनिधि आहे. मला कोणीं निवडलेलें नाहीं. ईश्वरानें च दरिद्रनारायणाचा आणि समाजाचा प्रतिनिधि मला बनविलें आहे. माझी इच्छा आहे कीं, प्रत्येक घरीं दरिद्रनारायणाला प्रवेश मिळावा. उपकार म्हणून नाहीं तर त्याचा हक्क च आहे असें समजून त्याचा भाग त्याला मिळावा. हें आपलें कर्तव्य आहे असें समजावें.

## घरांत प्रवेश, व्यापारांत नाहीं

श्रीमंतांची संपत्ति त्यांच्या हातीं एक ट्रस्ट म्हणून आहे. म्हणून दरिद्रनारायणाच्या प्रतिनिधीला प्रत्येक घरांतून संपत्तीचा एक हिस्सा मिळाला पाहिजे. मी तुमच्या घरांत दाखल होऊं इच्छितों, व्यापारांत नाहीं. एखादे

वर्षी व्यापारांत नुकसान झालें तरी हि व्यापारी आपल्या कुटुंबाला खायला घालतो न. त्यांत मला हि भाग मिळाला पाहिजे. तुमच्या घरीं पांच व्यक्ति असतील तर मी सहावा होतों. तुम्ही तीन असाल तर मी चौथा. हा एक सिद्धान्त म्हणून, हक्क म्हणून, माझी इच्छा आहे कीं, हिंदुस्थानांतल्या प्रत्येक गांवीं, प्रत्येक घरीं दरिद्रनारायणाचा हा हक्क मान्य केला जावा. हे कांहीं एकदा देऊन टाकायचें दान नाहीं, कीं एकदां देऊन टाकलें कीं सुटका होईल. ज्याप्रमाणें आपण नेहमीं खात असतों त्याप्रमाणें नेहमीं देत राहिलें पाहिजे. मीं हिस्याची मागणी केली आहे. तो लहानसा हिस्सा नाहीं, तर भावाच्या हिस्याची मागणी केली आहे. व्यापारी लोक शंभर रुपयांच्या फायद्यांतून चार आणे दानधर्म करतात. तसला हा दानधर्म नाहीं. ही दाराशीं भीक मागायला आलेल्या भिकाऱ्याची मागणी नाहीं, घरांत राहणाऱ्याची मागणी आहे. म्हणून योग्य हिस्सा सतत देत राहिलें पाहिजे.

**प्रश्नः—**भूमिहीनांना मोफत जमीन देण्याऐवजी त्यांच्याकडून कांहीं थोडेंसे घेऊन ती दिली, तर त्यांना श्रद्धा वाटेल आणि जबाबदारीचें भान होईल.

**भूमिहीनांवर पुत्रवत् प्रेम करा**

**उत्तरः—** ह्या विचारांत कांहीं तथ्य आहे. परंतु भूदानयज्ञांत आम्ही आपल्या वतीनें गरीबाला कांहीं देत नाहीं. गावची सर्व सभा भू-हीनांच्या मतानें च जमीन देईल. म्हणून ज्याला जमीन मिळेल त्याला आपली जबाबदारी समजेल. दुसरी गोष्ट अशी कीं, जर तो जमीन कसणार नाहीं तर ती त्याच्या हातांत राहणार नाहीं. शिवाय आमचें सर्व काम विश्वासावर आणि प्रेमावर चाललें आहे. ज्या भूमिहीनाना जमीन मिळेल ते पुढें संपत्तिदान हि द्यायला तयार होतील. त्यांच्याकडून करार करून पैसे घेण्याऐवजी मागाहून त्यानें संपत्तिदान दिलें तर तें जास्त चांगलें होईल. याचें चांगलें उदाहरण मध्यप्रदेशांत मिळालें. तेथल्या लोकांनी देणारा आणि घेणारा या दोघांना हि बोलावलें आणि म्हटलें, "आतां ही चळवळ पुढें चालविणें तुमचें काम आहे." आश्चर्याची गोष्ट अशी कीं, घेणाऱ्यांपैकीं पुष्कळसे लोक

सभेला आले होते. त्यांनीं हि गांवासाठीं कांहीं दिलें पाहिजे ही गोष्ट त्यांच्यापुढें मांडली तेव्हां त्यांनीं हि प्रेमानें संपत्तिदान देण्याचा निश्चय केला. मग देणारे आणि घेणारे दोघे हि कामाला बाहेर पडले आणि त्यांनीं एका दिवसांत १५ हजार एकर जमिनीचें वांटप केलें. याप्रमाणें भूमिहीनांचा संपर्क आम्ही सोडणार नाहीं. ते आमच्या परिवारांत दाखल झाल्यावर आम्ही त्यांच्या मानसिक उन्नतीचा विचार करूं. तुम्ही आपली इस्टेट आपल्या मुलाला देतां तो त्याचा चांगला उपयोग करील अशी आशा करतां. याकरितां तुम्ही त्याला शिक्षण देऊन त्याच्यावर भरंवसा ठेवतां. त्याप्रमाणें तुम्हीं भूमिहीनांवर पुत्रवत् प्रेम करून त्यांना जमीन दिली तर त्यांना तिचा चांगला उपयोग करण्याची प्रेरणा मिळेल.

प्रश्नः—तुमचें सरकारवर वजन आहे तेव्हां सरकारवर वजन घालून जमिनीसंबंधीं कायदे कां करून घेत नाहीं? व्यर्थ कां पायीं फिरत आहां? **कायदा कां नको?**

उत्तरः—( १ ) मीं प्रथम च सांगितलें आहे कीं, मला जनशक्ति उत्पन्न करायची आहे. सरकारकडून काम झालें तर जनशक्ति उत्पन्न होऊं शकत नाहीं.

( २ ) कायद्यानें जमीन काढून घेऊन वाटली तर जमीनमालक दुःखी होतील. त्यांच्यांत आणि भूमिहीनांत द्वेष उत्पन्न होईल. कोर्टांत खटले चालतील. पण प्रेमानें जमीन वाटली जाईल तर समाजांत प्रेम आणि सहयोग उत्पन्न होईल. मीं तर जमीन देणाऱ्याकडून भूमिहीनाकरितां बैल-जोडी, बीं वगैरे दुसरीं साधनें मागतों आणि ते देतात हि. सरकार कायद्यानें जमीन काढून घेईल. पण वर बैलाची मागणी करूं शकेल का? उलट सरकारला जमीनदारांना मोबदला द्यावा लागेल.

( ३ ) कायद्यानें जमीन काढून घेऊं तर सरकारला चांगली जमीन मिळेल का? लोक आपली वाइटांतील वाईट जमीन च सरकारला देतील. भूदानांत हि कांहीं खराब जमीन मिळाली आहे. पण चांगली हि जमीन मिळते आणि ती प्रेमानें मिळते. सरकारला मात्र केवळ खराब जमीन च मिळेल.

( ४ ) कायदा होणार ही गोष्ट ऐकतां च लोक आधीं च आपआपसांत जमीन वांटून घेतात. त्यामुळें सरकारच्या हातीं कांहीं लागत नाहीं. याला मी कायद्याचें नाटक म्हणतों.

( ५ ) सीलिंग नेहमीं लहान च असते. सरकार ३० एकरांचें सीलिंग ठरविण्याचा विचार करीत आहे; पण मी तर दोन-चार एकरवाल्यांकडून हि दान मागतों.

( ६ ) समजा, सरकारनें कायदा केला तर त्याचा परिणाम गांवा-गांवांत द्वेष आणि असंतोष उत्पन्न होण्यांत होईल. मग महायुद्ध सुरू झालें तर वस्तूंच्या किंमती वाढून आणखी हि असंतोष वाढेल. अशा स्थितींत तुमचें सरकार टिकेल का?

( ७ ) जे काम जनशक्तीनें होतें तें सरकारी शक्तीनें कसें होईल ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. आईने मुलाला प्रेमानें धपाटा दिला तर मुलगा तें सहन करतो; तसा दुसरा कोणीं मारला तर तो गप्प बसेल का? त्याप्रमाणें भूदानानें जे काम बनू शकतें तें सरकारकडून होणार नाहीं. एक प्रेमाची प्रक्रिया आहे तर दुसरी हिसकावून घेण्याची. तुम्ही यज्ञांत तुपाची आहुति देतां तर काय तुपाच्या डब्याला आग लावून दिली तर तो यज्ञ होईल? कोणीं ब्रह्मचर्याचें व्रत घेतलें तर त्याच्या अंगीं जें तेज येईल तें काय जेलमध्यें २० वर्षे राहणाऱ्या चोराला ब्रह्मचर्यानें प्राप्त होईल? प्रेमानें होणाऱ्या कामाची बरोबरी हिसकावून घेण्याच्या कामाबरोबर करतां याचें मला आश्चर्य वाटतें. भूदानांत केवळ जमीन मिळत नाहीं, प्रेम हि वाढतें. आतां ग्रामदानें हि होऊं लागलीं आहेत. सरकारकडून ग्रामदान होऊं शकेल का? लोकशक्तीनें बनणारी वस्तु आणि सरकारकडून लादली गेलेली वस्तु यांमध्यें किती अंतर आहे याचा जरा विचार करा.

( ८ ) तुम्ही समजतां कीं, बाबाचें सरकारवर वजन आहे; पण जें वजन आहे तें बाबा त्याचा विशेष उपयोग करीत नाहीं म्हणून आहे; पण बाबा तें वजन आणण्याचा प्रयत्न करील तर तें वजन पडणार नाहीं. तुम्ही सन्याशाचा आदर करता, त्याला जेवू घालता, पण तो तुमच्या मुलाला च संन्यास देऊं लागला तर तें तुम्हाला आवडेल का? म्हणून बाबाचें

सरकारवर जें वजन आहे तें सर्व लोकांचे परिवर्तन करण्याइतकें मोठें नाहीं. स्वराज्यानंतर ज्यांनीं जमिनी मिळविल्या त्यांच्या च हातांत आज सरकार आहे. असलें सरकार हें काम करूं शकेल का ? ज्या डहाळीवर तें बसलें आहे तें ती डहाळी तोडून टाकूं शकत नाहीं.

( ९ ) कायदा नेहमीं लोकमताच्या मागें मागें चालतो. जी गोष्ट प्रजेला मान्य नाहीं ती कायद्यानें लादली जाऊं शकत नाहीं. लोकमत तयार होण्यापूर्वी अल्प लोकमताच्या आधारावर कायदा केला तर तो अमलांत आणणें कठीण जातें. १४ वर्षांच्या वयापूर्वी लग्न करायचें नाहीं असा कायदा आहे. परंतु आज हि १४ वर्षांपेक्षां लहान हजारों मुलींचीं लग्नें होत आहेत. स्पर्शास्पर्श मानणें कायद्यानें गुन्हा आहे तरी हि काशी-विश्वनाथाच्या मंदिरांत हरिजनांना प्रवेश मिळत नाहीं. गांवोगांवीं हरिजनांची स्थिति खराब च आहे.

( १० ) भूदान धर्मचक्रप्रवर्तनाचें काम आहे. त्यांत गांवोगांवीं घरोघरीं जाऊन प्रत्येक मनुष्याला प्रेमानें विचार समजावून देण्याचें काम चाललें आहे. हल्लीं चळवळ करणारे लोक १०–५ मोठ्या शहरांत फिरून येतात; पण गांवोगांवीं कोण जातो ? सर्वोदयविचाराच्या प्रचाराचें व्यापक कार्य भूदानांतून चालू आहे. त्याबरोबर च खादी, ग्रामोद्योग, नई तालीम अशीं हि कामें चालू आहेत. या सर्व गोष्टी कायद्यानें होऊं शकत नाहींत.

पट्टीवीरम्पट्टी
१३–१२–'५६

# तमिळनाड ग्रामदानाकरितां विशेष अनुकूल : १० :

मी जेव्हां ओरिसांत कोरापुट जिल्ह्यामध्यें फिरत होतों तेव्हां तेथें शेकडों ग्रामदानें मिळत होतीं. तेव्हां तामीलनाडचे पुढारी म्हणाले होते कीं, 'बाबाला तमिलनाडमध्यें कांहीं जमीन मिळेल पण ग्रामदान होण्याचा संभव कमी आहे; कारण तेथें जमीन महाग आहे आणि लोकांना तिची आसक्ति हि फार आहे. तेथले लोक केवळ श्रद्धेनें काम करीत नाहींत. चांगला पूर्ण विचार करून च करतात.' त्याचा अर्थ एवढा च झाला कीं, येथले लोक बुद्धिमान आहेत म्हणून ग्रामदान होणार नाहींत. तिकडे झालें तें मूर्ख लोकांचेकडून झालें. परंतु त्या वेळीं मीं तमिलनाडचे प्रमुख भूदानकार्यकर्ते जगन्नाथन् यांना पत्र लिहिलें होतें कीं, 'तामिलनाडमध्यें पुष्कळ ग्रामदान होईल. तेथली हवा हिंदुस्थानच्या दुसऱ्या प्रांतापेक्षां ग्रामदानाला ज्यास्त अनुकूल आहे.' त्या वेळीं मी तमिलनाडमध्यें फिरत नव्हतों; ओरिसांत असल्याअसल्या तें पत्र लिहिलें होतें.

तामिलनाडची हवा ग्रामदानाला जास्त अनुकूल कां आहे याचीं कांहीं कारणें आहेत (१) येथलीं लहान लहान गांवें हि एखाद्या मंदिराच्या आसपास वसलेलीं आहेत. गावांत गवताच्या लहान लहान झोंपड्या असतील पण त्यांच्यामध्यें एक सुंदर मंदिर अवश्य असेल. येथल्या लहान गांवांमध्यें हि इतकीं मोठीं मंदिरें असतात तेवढीं उत्तर हिंदुस्थानातल्या मोठ्या शहरांत हि असत नाहींत. याचा अर्थ असा कीं, जणूं काय गांव देवाला च अर्पित झालें आहे. गांवाची सारी जमीन आणि संपत्ति यांचा मालक परमेश्वर आणि गांवांत राहणारे सर्व लोक त्याचे सेवक अशी भावना यामागें आहे.

(२) तमिळ भाषेमध्यें प्राचीन काळापासून आजपर्यंत 'कुरळ' पासून 'भारतीयार'पर्यंत जितकें चांगलें साहित्य निघालें त्या सर्व साहित्यांत जमिनीची मालकी मान्य केलेली नाहीं. जमिनीवर मनुष्याची

मालकी नाहीं, सर्वांची आहे. सर्वांनी मिळून काम करावें आणि वांटून खावें. या विचाराचीं शेंकडों वचनें तामिळ साहित्यांत मिळतील.

( ३ ) भारताची संस्कृति शुद्ध स्वरूपांत तामिळनाडमध्यें च दिसून येते. तीवर उत्तरेकडून बाहेरचे हल्ले झाले. परिणाम असा झाला कीं, भारतीय संस्कृति उत्तरेकडून हटत हटत दक्षिणेंत येऊन स्थिर झाली. म्हणून भारतीय संस्कृतीचा शुद्ध विचार तामिळनाडमध्यें मिळतो. संगीताचें च उदाहरण घ्या. उत्तर भारत संगीतांत दुसऱ्या संगीताचें मिश्रण आहे. त्यामुळें कांही वाईट झालें असें नाहीं, त्यांत भर च पडली आहे; परंतु मला इतकें च सांगावयाचें आहे कीं, दक्षिणी संगीतांत मिश्रण नाहीं. येथील लोकांच्या जीवनांत जो साधेपणा दिसतो तो हि भारतीय संस्कृतीचा गुण आहे; म्हणून येथें ग्रामदान जरूर मिळेल असें मीं दीड वर्षापूर्वी च लिहिलें होतें. आतां येथें त्याचा अनुभव हि येऊं लागला आहे.

यतवक्कुंडु ( मदुरा )
४-१२-'५६

## प्रेमाक्रमण : ११ :

आतां च तुम्हीं माणिक्यवाचकरूचें भक्तिमय भजन ऐकलें. त्यांत भगवंताच्या प्रीतीचें वर्णन ऐकलें. स्वतः भगवान् आईप्रमाणें भक्तांचा शोध करून त्यावर कृपा करतो. मुलगा कोठें दुनियेमध्यें भटकत असो, आपल्या खेळांत दंग असो; तर आई त्याला शोधायला स्वतः जाते आणि म्हणते, ' अरे, किती वेळ खेळत बसायचें ? तुला भूक नाहीं का लागली ? जेवायची वेळ झाली आहे, चल घरीं.' ती स्वतः च जाऊन त्याला हुडकते, त्याला भूक लागल्याचें सांगते आणि घरीं नेऊन खायला घालते. हें प्रीतीचें लक्षण आहे. मुलाला भूक लागेल तेव्हां तो येईल घरीं आणि मागेल तेव्हां मी देईन असा ती विचार करीत नाहीं, स्वतः च शोधायला जाते. जेथे प्रेम

असतें तेथें अशा प्रकारची स्थिति असते. हिंदुस्थानांत अशा प्रकारची प्रीति प्रकट व्हावी अशी माझी इच्छा आहे.

## देशामध्यें प्रेमाची उणीव

पूर्वी परमेश्वरानें ज्याला ज्ञान दिलें ते स्वतः च अज्ञानी लोकांना शोधीत फिरत असत. स्वतः गांवोगांव फिरत. ते तर ज्ञानाचे समुद्र होते आणि आपल्या घरीं बसून राहिले असते तरी ते त्यांना शोभलें असतें. "मी एके ठिकाणीं बसलो आहे. ज्याला यायचें आहे व ज्ञान मिळवायचें आहे त्यानें येऊन विचारावें म्हणजे मी त्याला सांगेन" असें ते म्हणूं शकले असते. परंतु ते तसें करीत नसत. ते सर्व हिंदुस्थानांत गांवोगांवीं फिरत आणि लोकांना बोलावून भगवंताची भक्ति आणि ज्ञानाच्या वार्ता समजावून देत. अलीकडचे ज्ञानी लोक कॉलेज आणि युनिव्हर्सिटीमध्यें असतात. ते स्वतः कधीं जनतेकडे जात नाहींत. लोक त्यांच्याकडे जातील, फी देतील, तेव्हां ते ज्ञान देणार. असें कां? त्यांच्याजवळ ज्ञान नाहीं? नाहीं. ज्ञान तर आहे पण प्रेम नाहीं. प्रेम असतें तर ते स्वतः च लोकांचेकडे जाऊन त्यांना ज्ञान देते. चरायकरितां गाय जंगलांत जाते. सध्याकाळ होतां च धावत घराकडे परत येते आणि आपल्या वासराला पाजून स्वतः तृप्त होते. हिंदुस्थानांत आज ज्ञान नाहीं असें नाहीं. परंतु जनतेवरचें उत्कट प्रेम प्रकट होत नाहीं.

## श्रीमंतांनीं स्वतः च गरिबांना दान द्यावें

त्याप्रमाणें च ज्यांच्याजवळ संपत्ति आहे त्यांनीं स्वतः च गरिबाचा शोध केला पाहिजे. ज्यांना मदतीची जरूरी असेल त्यांना शोधून मदत केली पाहिजे. देवानें आपल्याला इतकी संपत्ति दिली आहे तेव्हां तिचा उपयोग गरिबांच्या सेवेकरतां च केला पाहिजे. आज देशांत बरेंचसे श्रीमंत लोक आहेत. दुसऱ्या देशांत जितके श्रीमंत लोक आहेत तितके कदाचित् येथें नसतील पण कांहीं आहेत च. ते देतील किंवा नाहीं या भीतीनें लोक त्यांच्याकडे जाऊन मागायला हि भितात. मग त्या संपत्तीचा उपयोग काय? गरिबांनीं मागितल्यावर आम्हीं दिलें तरी त्यात प्रेमाची उणीव च राहील. म्हणून स्वतः च गरिबाचा शोध घ्यायला गेलें पाहिजे. दुःखी लोक कोठें

आहेत तें शोधून त्यांचें दुःख दूर करण्यांत आपल्या संपत्तीचा उपयोग केला पाहिजे. असें आपण करू तर किती आनंद होईल.

आतां च ४०-४२ मध्यें एक महायुद्ध झालें. जर्मनीचे लोक जग जिंकायला बाहेर पडले आणि लढतां-लढतां शेवटीं हरले. त्यांचे ५-५० लाख लोक ठार झाले. ते मोठे शूर आणि शक्तिशाली होते. युद्धाकरितां आणि दुनिया जिंकण्याकरितां कोट्यवधि रुपयांचा रोज खर्च करीत होते. जर त्यांनीं हे सर्व रुपये दुनियेच्या सेवेकरितां खर्च केले असते तर त्यांना मरावें लागले नसतें आणि त्यांनीं दुनिया जिंकली असती. आपल्या संपत्तीचा उपयोग गरिबांचें जीवन सुखी करण्याकरिता आहे ही गोष्ट श्रीमंतांना सुचेल तर बाबाला फिरावें लागणार नाहीं. ते च गावोगांवीं जातील, गरिबांना शोधतील आणि त्यांना मदत करतील.

## विद्या, संपत्ति आणि शक्तीबरोबर च प्रेमाची जरूरी

एखाद्या मनुष्याचें शरीर परमेश्वरानें बळकट केलें असलें तर तो आपल्या शक्तीनें दुसऱ्याला पीडा देऊं शकतो किंवा दुबळ्याचा बचाव हि करूं शकतो. तो दुसऱ्यांना त्रास देईल तर लोक त्याला शाप देतील आणि दुसऱ्याचा बचाव करील तर लोक त्याची स्तुति करतील. जगामध्यें अनेक प्रकारचे लोक जन्माला आले आहेत. ही च भगवंताची करणी आहे. कोणी श्रीमंत, तर कोणी दरिद्री, तर कोणी बळकट, तर कोणी दुबळा, तर कोणी ज्ञानी, तर कोणी अज्ञानी. ज्ञानी, संपत्तिवान आणि शक्तिशाली लोकांनीं आपलें ज्ञान, संपत्ति आणि शक्ति यांचा उपयोग अज्ञानी, गरीब आणि दुबळ्या लोकांकडे स्वतः जाऊन त्यांना मदत करण्याकडे केला पाहिजे. असें व्हायला विद्या, संपत्ति आणि शक्ति यांच्याबरोबर च प्रेम हि असायला पाहिजे.

## छातीवरून धोंडा दूर व्हावा

जगामध्यें ईश्वराची सर्वांत मोठी कोणती देणगी असेल तर ती प्रेम ही आहे. ज्याच्या हृदयांत प्रेम प्रकट झालें त्याच्यावर भगवंताचा वरदहस्त आहे असें निश्चित समजावें. अशा प्रेमी लोकांना शोधत मी फिरत आहें. प्रत्येक गांवीं असे प्रेमी लोक आहेत असें मला वाटतें. एवढें च नाहीं तर

प्रत्येकाच्या हृदयांत प्रेम आहे असा माझा विश्वास आहे. पण त्या प्रेमाच्या झऱ्यावर दगड बसलेला आहे. ज्याच्या अन्तःकरणांत प्रेम नाहीं अशी एक हि व्यक्ति जगांत नाहीं. परमेश्वराने अशी युक्ति च केली आहे कीं, मुलाचा जन्म होतां च लहानपणापासून च त्याला प्रेमाच्या अनुभव येतो, प्रेमाचें शिक्षण मिळतें. प्रेमाची उणीव नाहीं. पण लोभ, मोहाचा दगड त्यावर राहिलेला आहे. तो दगड हलवायचा माझा प्रयत्न आहे. पण मी हें कसें करूं शकेन ? म्हणून मी ईश्वराची प्रार्थना करतों कीं, परमेश्वरा, तूं जें प्रेम दिलें आहेस तें प्रकट होऊं दे. ते लोभ, मोहाचे दगड त्यावरून बाजूस कर.

### जमीन सर्वांची, केवळ शेतकऱ्यांची च नाहीं

गांवोगांवीं जमीन आहे. प्रत्येक गांवीं पाणी आहे, हवा आहे. हवा, पाणी सर्वांना पाहिजे. परमेश्वराने सर्वांसाठीं ती बनविली आहे पाहिजे त्यानें हवा, पाणी घ्यावें त्याप्रमाणें जमीन हि सर्वांना मिळाली पाहिजे. ६०-७० वर्षांपूर्वी तर हिंदुस्थानांत असें च होतें. गावाची सर्व जमीन गांवाची च होती. कांहीं लोक शेती करीत; कांहीं सुतार, कुंभार, चांभार किंवा लोहाराचें काम करीत. त्यांना आपल्या कामाबद्दल पैसा मिळत नसे. ते प्रत्येकाच्या घरचें काम करीत. शेतकऱ्यानें बोलावतां च सुतार त्याच्या घरचें काम करून देत असे. एखाद्याच्या घरीं जास्त काम निघेल तर जास्त करी, कमी असेल तर कमी. कोणीं बोलविलें नाहीं तर त्याच्याकडे जात हि नसे. या कामाकरितां त्याला पैसा मिळत नसे. पण गांवच्या पिकाचा एक वाटा त्याला मिळे. एखाद्या वर्षीं पीक कमी आलें तर कमी वाटा मिळे. जास्त आलें तर जास्त. याप्रमाणें गांवाच्या सुखदुःखांत त्याचा भाग होता. परन्तु त्याला वाटा देणें भाग आहे असें मानलें जात असे.

याचा अर्थ असा झाला कीं, जमीन सर्वांची आहे. कांहीं लोक शेती करीत म्हणून त्यांची च तेवढी जमीन असें नसे. अलीकडे जमीन तिच्या मालकाची मानली जाते; त्याच्या उलट कसेल त्याची जमीन असें कम्युनिस्ट म्हणतात; पण जमीन सर्वांची आहे ही गोष्ट पुष्कळांच्या ध्यानांत आलेली नाहीं. जमीन केवळ शेतकऱ्यांची आहे असे म्हणणें चुकीचें आहे. सोयीकरितां कांहीं लोक शेती करतात तर कांहीं लोक दुसरें काम; पण कांहीं

लोक शेती करीत नाहींत म्हणून त्यांचा जमिनीवर हक्क नाहीं असे नाहीं. बाबा आणि भांडवलवाले व कम्युनिस्ट यांच्या विचारांत हा फरक आहे. समजा, या गांवीं जमीन जास्त आहे आणि लोक कमी आहेत; आणि शेजारच्या गांवीं लोक जास्त आणि जमीन कमी, तर त्या गांवच्या लोकांना जमीन दिली पाहिजे; कारण जमीन सर्वांची आहे. केवळ मालकांची किंवा शेतकऱ्यांची नाहीं. लोकांना हा विचार पटेल आणि सर्व जमीन गांवची असें ते मानतील तर समाजाची नैतिक पातळी उंचावेल आणि हिंदुस्थानच्या सांपत्तिक उन्नतीचा मार्ग खुला होईल.

## प्रेमाचा पेला भरला नाहीं

तपश्चर्या शुद्ध असेल तेव्हां मनुष्याचें हृदयपरिवर्तन होतें. साडे-पांच वर्षें ही तपश्चर्या चालू आहे. हजारों कार्यकर्ते या कामाला लागले आहेत. त्यामुळें लोक विचार समजून घ्यायला राजी झालेले आहेत. त्यांच्याकडे जायला हि प्रेम पाहिजे. गांवोगांवीं फिरणें, लोकांच्याकडे जाणें, त्यांना समजावून देणें हें सर्व प्रेमाशिवाय होऊं शकत नाहीं. ग्रामदान आणि भूदान यामुळें असा पाया तयार होईल कीं, जो सरकार हि करूं शकणार नाहीं असें माझें म्हणणें आहे.

प्रत्येक गांवीं ग्रामदान झालें पाहिजे. मी कधीं निराश होत नाहीं. जो निराश होतो त्याला आम्ही ' नास्तिक ' म्हणतों, आणि ' आस्तिक 'ची व्याख्या ही आहे कीं, जो हृदयांतल्या ज्योतीवर विश्वास ठेवतो. मी पूर्ण विश्वास आणि श्रद्धा ठेवून तुमच्याकडे आलों आहे. मी तुमच्या गांवीं कोणी हि भूमिहीन राहूं देणार नाहीं. आज कांहीं ठिकाणीं जागृति झाली आहे. तेथले भूमिहीन लोक आम्ही जमीन घेतल्याशिवाय राहाणार नाहीं असें म्हणत आहेत हें मला चांगलें वाटलें. मुलगा म्हणतो, ' आई, मला भूक लागली आहे. मला खायला दे च '. भूमिहीनांमध्यें भुकेची भावना उत्पन्न झाली आहे ही चांगली गोष्ट आहे; पण जमीनवाले स्वतः च भूमिहीनांना जमीन देऊं लागतील तर ते अधिक चांगलें होईल. जमीनदार, संपत्तिवान् आणि शिक्षित यांच्या बाजूने च प्रेमाची चढाई व्हावी अशी माझी इच्छा

आहे. आमच्या देशांत असें जरा कमी घडतें. प्रेमी लोकांमध्यें प्रेमाचें आक्रमण करण्याची वृत्ति नसते; पण प्रेमानें गप्प कसें बसावें ? जो गप्प बसतो त्याचें अंतःकरण प्रेमानें पूर्ण भरलेलें नाहीं असें म्हणावें लागतें. पेल्यांत पाणी भरलें म्हणजे तो पुरा भरल्याशिवाय वाहूं लागणार नाहीं. त्यांत न मावण्याइतकें पाणी भरलें म्हणजे वाहूं लागतें. त्याप्रमाणें च प्रेमाचा पेला पुरा भरलेला नाहीं म्हणून प्रेम आक्रमणशील होत नाहीं.

एकेकाचें अंतःकरण प्रेमानें भरभरून टाकायचें असें बाबानें ठरविलें आहे तें भरून जाईल तेव्हां वाहायला लागेल. दुसरें उदाहरण कशाला ? बाबाचें स्वतःचें उदाहरण घ्या. तो साडेपांच वर्षे सतत फिरत आहे. त्याला ४० लाख एकर जमीन मिळाली आहे. बाबाच्या पोटाकरितां एखादा एकर पुरे आहे. बाबाचें शरीर दुबळें आहे. मधून मधून तो आजारी पडतो. तरी फिरत आहे. कारण आंतून प्रेमाची प्रेरणा आहे ती त्याला बसूं देत नाहीं. त्यामुळें लोकांच्या अंतःकरणाला त्याच्या म्हणण्याचा स्पर्श होतो. एका पाश्चात्त्य लेखकानें बाबावर एक लेख लिहिलेला आहे. त्यानें दुसरें वर्णन केलें आहे तें बाजूला ठेवूं, पण बाबाला लाखों एकर जमीन मिळाली पण बाबानें आपल्यासाठीं कांहीं ठेवलें नाहीं याचें त्याला आश्चर्य वाटतें. पण बाबाला लाखों एकर जमीन का पाहिजे ? तो ५-५० एकर मिळवून कोठेंतरी बसून जाता आणि त्यानें चांगलें पीक काढून पोट भरलें असतें. हा जो रोमॅंटिसिझम आहे तो प्रेमाचा प्रभाव आहे. तो त्याला बसं देत नाहीं, फिरवीत आहे.

### प्रेमाची प्रेरणा

परवा च आमच्या एका मित्राशीं बोलत होतों. मध्यें एकदा आजारी पडलों होतों म्हणून त्याला काळजी वाटून तो म्हणाला, " पूर्वी तुमचे पाय बळकट दिसत. हल्लीं कमजोर दिसूं लागले आहेत. " पण बाबाच्या पायांत मास आहे, त्यांत जोर नाहीं. प्रेमाच्या प्रेरणेचा जोर आहे. त्याला विश्वास आहे. जोंपर्यंत त्याचे पाय चालूं शकतील तोंपर्यंत तो चालत च राहील. पण बाबा फिरत राहील आणि तुम्ही बसून रहाल तर काय तुमचें भलें होईल ?

कधीं हि नाहीं. तुम्ही हि उभे राहा. बाबाचें काम हातीं घेऊं लागा, तेव्हां तुमचें भलें होईल. भूदानसमिति आहे ती काम करील असा इतके दिवस म्हणणें करतां येत होता. पण ती किती गांवीं पोहोंचेल? जमीन तर गांवो-गांवीं आहे. आम्हीं १ जानेवारीपासून भूदानसमित्या बंद करून टाकल्या आहेत. आतां तर तुम्हीं च उठून काम केलें पाहिजे. प्रत्येकानें आपला आपला हिस्सा प्रथम दिला पाहिजे.

## भूमिवितरणानंतर ग्रामपंचायत

हें काम मीं विचार केल्याशिवाय हातीं घेतलेलें नाहीं. खादी, ग्रामोद्योग, गोसेवा, नई तालीम, हरिजन सेवा, मुलींचें शिक्षण आदि सर्व कामें बाबानें तीस वर्षे केलेलीं आहेत. तें सारें सोडून भूदानासाठीं बाबा कां फिरत आहे असें तुम्हीं विचारूं शकतां. त्याचें उत्तर म्हणून मी एक गोष्ट सांगतों. एक शेतकरी होता. त्याच्या शेतांत पाण्याची व्यवस्था नव्हती. मध्यें दोन वर्षे पाऊस पडला नाहीं म्हणून त्यानें विहीर खोदायला सुरुवात केली. तेव्हा लोक विचारूं लागले, 'अरे, तूं शेतकरी असून खोदायचें काम कां करीत आहेस? शेती करायचें सोडून दिलेंस कीं काय?' बिचारा शेतकरी याला काय उत्तर देणार? तो एवढें च म्हणाला, 'बाबांनो, मी उत्तम शेतकरी आहे म्हणून शेती सोडून विहीर खोदीत आहे. विहीर तयार झाल्यानंतर मग माझी शेती पहा.' बाबानें हि खादी, ग्रामोद्योग वगैरे काम बाजूला ठेवलें आहे कारण तो विहीर खोदीत आहे. गांवोगांवचे लोक ग्रामदान देतील तेव्हां तुमचें काम संपलें असें बाबा त्यांना सांगणार नाहीं. आतां तुमचें काम सुरू झालें असें तो सांगेल. आतां तुम्हांला खादी, ग्रामोद्योग, गोसेवा, नई तालीम, ग्रामपंचायत, गावाचें दुकान, गांवांतले तंटे गांवांत च मिटवणें वगैरे कामें तुम्हांला करावी लागतील.

गांवोगांवीं पंचायत स्थापन व्हावी असा सरकारचा आज प्रयत्न आहे. त्यांनीं पंचायतीसंबंधीं माझें मत विचारलें तेव्हां मीं म्हटलें, "गोष्ट चांगली आहे पण प्रथम काय केलें पाहिजे याचा तुम्ही विचार करत नाहीं. प्रथम च पंचायत बनविणें चुकीचें आहे. जोंपर्यंत गांवच्या जमिनीचें वांटप

होत नाहीं, जोपर्यंत गांवच्या संपत्तीची विषमता कमी करण्याचा प्रयत्न केला जात नाहीं, तोपर्यंत ग्रामपंचायत बनविणें म्हणजे ती जमीनदार आणि संपत्तिवाले यांच्या हातीं ठेवण्यासारखें आहे. ज्यांच्या ताब्यांत जमीन, संपत्ति आणि विद्या आहे आणि कॉंग्रेस आणि सरकारवर वजन आहे त्यांच्या च हातीं ग्रामपंचायतीची सत्ता आली. यामुळें गांवच्या शोषणाची पूर्ण व्यवस्था झाली. म्हणून प्रथम जमिनीचें समान वांटप झालें पाहिजे. नंतर सर्वांच्या संमतीने ग्रामपंचायत बनावी. असली ग्रामपंचायत 'सेवकांची ग्रामपंचायत' होईल."

## आजची त्रासदायक पंचायत

एक माणूस भात शिजवीत होता. त्यानें प्रथम चूल पेटविली. मग त्याच्यावर भांडें ठेविलें. मग त्यात पाणी घातलें. नंतर तांदूळ वैरले. मग भात तयार झाला. दुसऱ्या माणसानें पाहिलें कीं, भात बनवायला चूल, भांडें, तांदूळ आणि पाणी या चार वस्तूंची जरूरी आहे. त्यानें प्रथम चूल पेटविली. त्यांत तांदूळ टाकले. मग पाणी ओतलें आणि शेवटीं चुलीवर भांडें ठेविलें तर काय भात तयार होईल? त्या च चार वस्तू आहेत पण क्रम बदलल्यावर भात बनूं शकला नाहीं. म्हणून प्रथम ग्रामदान, नंतर ग्रामपंचायत झाली पाहिजे. तेव्हा च ती ग्रामपंचायत कल्याणकारी आणि वरदान होईल. आजच्या विषम परिस्थितींत ग्रामपंचायत बनविणें याचा अर्थ काहीं लोकांच्या हातीं दुसऱ्यांच्यावर सत्ता चालविण्याचा अधिकार देणें आहे. आजचे राज्यकर्ते म्हणतात कीं, "प्रत्येक गावीं लौकरांत लौकर ग्रामपंचायत बनली पाहिजे. कारण आम्हाला सत्तेचें विकेंद्रीकरण करायचें आहे. सर्व सत्ता दिल्लीमध्यें रहावी हे चांगलें नाहीं." हे म्हणणें ठीक आहे. परंतु आजच्या स्थितींत सत्तेचें विकेंद्रीकरण करणें याचा अर्थ हा च होतो कीं, मद्रासमध्यें राहणाऱ्या ५० वाघाना एकेक गांव सुपूर्द करणें असा आहे. त्याना एका जागीं न ठेवता अर्धी गावें वांटून देण्याजोगें आहे. म्हणून हल्लींच्या स्थितींत गांवाला सत्ता देणें म्हणजे प्रत्येक गावाला त्रास देण्याची योजना बनविण्यासारखें आहे. पंचायत सत्ता चालविणारी संस्था न होता सेवा करणारी संस्था झाली पाहिजे. म्हणून प्रथम ग्रामदान आणि नंतर

ग्रामपंचायत बनली पाहिजे. हें तुम्ही कराल तेव्हां प्रेमाची गोष्ट तुमच्या लक्षांत येईल. म्हणून मी परमेश्वराची प्रार्थना करतों कीं, हें सर्व करण्याची प्रेरणा आणि सद्बुद्धि देवो.

कल्लुपट्टी (मदुरा)
५-१२-'५६

## प्रत्येक कुटुंबानें एक कार्यकर्ता द्यावा : १२ :

साडेपांच वर्षें झालीं, भूदानाचें काम देशाच्या प्रत्येक जिल्ह्यांत चाललें आहे. त्याकरितां सर्वसेवासंघानें एक एक जिल्हा भूदानसमिति बनवली होती. तिच्याकरितां पैशाची कांहीं मदत दिली जात होती. तर कित्येक ठिकाणीं स्थानिक व्यवस्था हि झाली होती. आता आंदोलन इतकें पसरल्यानंतर सर्वसेवासंघानें निर्णय केला आहे कीं, जानेवारीपासून प्रांतांच्या व जिल्ह्याच्या भूदानसमित्या बंद करण्यांत याव्या.

### जनक्रांतीचें कार्य करण्याकरितां संस्थामुक्ति

हा ठराव ऐकून पुष्कळांना आश्चर्य वाटलें. कारण हल्लीं जो विचारप्रवाह चालू आहे त्याच्या अगदीं उलट ही गोष्ट आहे. काँग्रेस, समाजवादी, साम्यवादी वगैरे पक्ष आपली संघटना प्रत्येक तालुक्यांत, प्रत्येक जिल्ह्यांत, प्रत्येक प्रांतांत मजबूत करण्याचा प्रयत्न करतात. परंतु भूदानामध्यें तर अगदीं च उलटें झालें आहे. प्रत्येक प्रांतांत आणि जिल्ह्यांत सर्वसेवासंघाकडून एक एक संयोजक नेमण्यांत आला होता. प्रत्येक जिल्ह्यांत भूदानसमिती हि बनविण्यांत आली होती. त्या सर्व तोडण्यांत आल्या आहेत. हल्लींच्या वातावरणांत खरोखर च ही एक आश्चर्यकारक घटना घडली आहे. परंतु हें आंदोलन सर्व जनतेचें आंदोलन बनावें म्हणून सर्वसेवासंघानें हा निर्णय दिला. आजच्या कित्येक राजकीय संस्था पुष्कळ मोठ्या आहेत

तरी त्या ' पार्टीज ' आहेत. तिच्यामध्ये सर्व जनतेचा समावेश होत नाहीं. पुष्कळ मोठ्या पार्टीमध्ये पुष्कळ लोकांचा समावेश असेल पण सर्व जनतेचा असत नाहीं. ' सर्वसेवासंघाची इच्छा आहे कीं, भूदानयज्ञ-आंदोलन सर्व जनतेचें असावें आणि प्रत्येक मनुष्यानें-प्रत्येक कुटुंबानें तें आपलें कर्तव्य समजावें सर्वसेवासंघानें यांत कांहीं आपली जबाबदारी न नाहीं असें मानलें असा त्याचा अर्थ नाहीं. ज्याप्रमाणें हिंदुस्थानची जबाबदारी आहे, प्रत्येक कुटुंबाची आहे, त्या च प्रमाणे सर्वसेवासंघाची हि आहे. आंदोलनाला गति देण्याकरिता आम्हीं प्रथम कांहीं थोडें संघटन केलें होतें. परंतु देश-व्यापी अहिंसात्मक लोकक्रांतीचें कार्य संस्थांच्या सांच्यांत बद्ध राहून होऊं शकत नाहीं. त्याकरितां त्या कामाची मुक्तधारा वाहिली पाहिजे. तें बंधनांत राहिलें तर त्याचा मोठा तलाव होईल, पण समुद्र होणार नाहीं.

## सर्वसेवासंघाच्या परिवाराकडून दान

सर्वसेवासंघ हि इतरांच्याप्रमाणें आपली जबाबदारी ओळखत आहे. तो एक मोठें कुटुंब आहे. एखादें कुटुंब पाच व्यक्तींचें असतें, एखादें दहा व्यक्तींचें असते तर एखादें ५० व्यक्तींचें असतें. सर्वसेवासंघाच्या वतीनें जें संमेलन होतें त्याला ३–४ हजार प्रतिनिधी येतात. बाकीचे प्रेक्षक असतात. हे ३–४ हजार लोक सर्वसेवासंघाचें कुटुंब आहे. ह्या कुटुंबानें भूदानाकरिता आपल्या वतीनें प्रत्येक जिल्ह्याकरितां एक एक मनुष्य द्यावा. त्याच्या हातीं कांहीं सत्ता असणार नाहीं. कांही समिति असणार नाहीं. तो एक ' सेवक ' होईल. याप्रमाणें प्रत्येक कुटुंबानें आपल्या वतीनें एक एक मनुष्य द्यावा. एखाद्या कुटुंबात पांच भाऊ असतील व चार भाऊ घरचा कारभार चांगला चालवूं शकत असतील तर त्यानें पांचवा या कामा-करितां द्यावा. जो उत्तम परिपक्व विचारांचा असेल तो च कुटुंबानें या कामाकरितां द्यावा. याप्रमाणे देशातील कुटुंबांचेकडून एक एक मनुष्य मिळेल तर हिंदुस्थानांत ५० लाख कार्यकर्ते होतील. आमच्या धर्मानें तर अशी रचना केली होती कीं, ४०–४५ वर्षांच्या वयानंतर पतिपत्नीनें बहिण-भावासारखें रहावें आणि घरचा कारभार मुलावर सोंपवून समाज-सेवेला लागावें. त्याला वानप्रस्थाश्रम म्हणत. वनांत जाणें असा त्याचा अर्थ

नाहीं, तर समाजसेवा करावी असा आहे. कुटुंब-सेवा तर बाकीचे लोक करतील. याप्रमाणें प्रत्येक कुटुंबाकडून नाहीं, प्रत्येक गांवांतून जरी एक माणूस मिळाला तरी हि पांच लाख कार्यकर्ते होतील.

## प्रत्येक कुटुंबानें कार्यकर्ता द्यावा

ही तर लहान कुटुंबांची गोष्ट झाली. पण शाळेसारखे मोठे परिवार हि असतात. एखाद्या शाळेंत १६ शिक्षक आहेत असें समजा. तर तें त्यांचें एक कुटुंब झालें. त्यांना जर भूदानविचार पसंत पडला, त्यांनीं त्याचें अध्ययन केलें, तर ते १६ शिक्षक मिळून आपल्यापैकीं एखादा जो भूदान-प्रेमी असेल त्याला या कामाकरितां देऊं शकतात. प्रत्येक जणानें आपल्या पगारांपैकीं पाच रुपये दिले तर त्याच्याकरता ७५ रुपये होतील. याचा अर्थ असा होईल कीं, आमच्या शाळेच्या कुटुंबावरून भूदानाच्या पवित्र कार्याकरितां एक माणूस दिला. याप्रमाणें पंचायती आणि वेगवेगळ्या रचनात्मक संस्था हि आपापल्या संस्थेकडून त्याच्या पगारासकट एक एक माणूस देऊं शकतील. मग त्याच्या कामाचें सर्व पुण्य त्या संस्थेला मिळेल. भूदानाची आवड असणाऱ्या संस्था हें करूं शकतील. ज्यांना तें काम नको आहे आणि समजलेलें नाहीं त्यांच्यावर याचा भार नाहीं. ही गोष्ट मीं येथल्या कॉंग्रेसवाल्यांच्यापुढें ठेवली तेव्हां त्यांनीं प्रांतीय कॉंग्रेस वतीनें एक मनुष्य दिला. पण याप्रमाणें जिल्हा कॉंग्रेस कमिटी, तालुका कमिटीकडून एक एक मनुष्य मिळूं शकतो. असा मनुष्य या कामांत पडेल तर त्याचें पुण्य त्या संस्थेला जरूर मिळेल. पण त्यानें आपल्या पक्षाचा प्रचार करतां उपयोगी नाहीं. कोणी व्यापारी फर्म असेल तर तिच्याकडून हि एखादा मनुष्य मिळूं शकेल. याप्रमाणें या कामाकरतां देशाची इच्छाशक्ति अनुकूल होईल तर जागोजाग कार्यकर्ते उभे होतील.

सर्वसेवासंघाकडून जो मनुष्य नेमला जाईल तो काम करील. तो त्या जिल्ह्याचा अधिकारी असेल असें कोणी समजत असेल तर तें चूक आहे. आणि त्याच्या हातीं सत्ता तरी काय असणार ? त्याच्या हातीं कांहीं फंड नाहीं, समिति नाहीं, आज्ञा देण्याचा अधिकार हि नाहीं. २५ लाख लोकसंख्येच्या एका जिल्ह्याला आम्हीं एक मनुष्य दिला तर त्याचा उपयोग

एवढा च होईल कीं, लोक त्याला सल्ला विचारतील आणि तो लोकांचे मागें तगादा लावील. बाकीच्या वेळीं तो इकडे तिकडे फिरत च राहील. सर्वसेवासंघाकडून भूदानाकरितां एवढी मदत मिळेल. बाकी सर्व आंदोलन लोकांच्या हातीं च सोंपविलें जाईल.

## तारकदेवतेला नैवेद्य दाखवा

मदुरा जिल्ह्यांत मला असें वातावरण दिसलें कीं, लोकांचें मन भूदान-ग्रामदानाला तयार आहे. कोणीं जाऊन लोकांना विचार समजावून सांगितला तर लोकांचे मन त्याकरितां तयार होऊन जातें. त्याचें एक च कारण आहे असें कोणी म्हणत नाहीं; परंतु साडेपांच वर्षांपासून परमेश्वराच्या नांवानें हवेमध्यें ही गोष्ट पसरली गेली आहे आणि तिनें प्रत्येकाच्या हृदयाला स्पर्श केला आहे. १९१८ सालीं सर्व हिंदुस्थानांत इन्फ्ल्युएन्झाची साथ पसरली होती. त्या वेळीं जवळ जवळ प्रत्येक कुटुंबांतला एक एक माणूस आजारी पडला होता. आमच्या घरच्या तीन व्यक्ति आजारी पडल्या. त्यांतल्या दोन मरण पावल्या. याप्रमाणें इन्फ्ल्युएंझानें प्रत्येक घराला प्रसाद दिला. चार महिन्यांत ३० कोटी लोकांपैकीं ६० लाख मरण पावले. त्याच्या दुप्पट आजारी पडले. हिंदुस्थानातल्या लोकांनीं इन्फ्ल्युएंझाला इतके लोक दिले तर भूदानाला देणार नाहींत का? जशी इन्फ्ल्युएंझाची हवा पसरली ती कशी पसरली हें कोणाला माहीत नाहीं त्याप्रमाणें च भूदानाची हवा पसरत आहे. भूदान, ग्रामदान झालें पाहिजे. जमिनीचा कोणी मालक नाहीं ही गोष्ट देशातलीं मुलें हि बोलूं लागलीं आहेत. अशा स्थितींत कार्यकर्ता कामाला लागेल तर त्याचा प्रभाव साऱ्या जगावर पडेल. प्रेमाच्या मार्गानें जमिनीचा प्रश्न सोडविण्याची युक्ति हिंदुस्थानला साधली तर हिंदुस्थानची नैतिक शक्ति वाढेल आणि सारी दुनिया नाशापासून वांचेल.

सर्व कुटुंबांतले लोक याचा विचार करून आपल्यापैकीं एक माणूस भूदानाच्या कामाला देतील अशी मला आशा आहे. १०–५ वर्षे देण्याची गोष्ट नाहीं, वर्ष-दीड वर्षांची आहे. याप्रमाणें झालें तर इन्फ्ल्युएंझापेक्षां या आंदोलनाची गति कमी होणार नाहीं. त्या ठिकाणीं मरायचें होतें; येथें तारावयाचें आहे. मारकदेवतेला तुम्ही आपला नैवेद्य समर्पण केला तर

आतां तारकदेवतेपुढें केवढा द्याल याचा विचार करा. बाबा तर प्रेमाकरितां फिरत आहे; कारण त्याला केवळ भूदानाचें कार्य करायचें नाहीं; भूदानानतर गरिबांना जमीन द्यायची आहे, त्यांचे संस्कार सुधारायचे आहेत, ग्रामराज्याची स्थापना करायची आहे, सर्वत्र नई तालीम सुरू करायची आहे. ग्रामदान तर पाया आहे. त्याच्या आधारावर सर्वोदयाचें मंदिर बांधावयाचें आहे.

नेनी ( मदुराई )
९-१२-'५६

## सर्वोदय म्हणजे शासनमुक्ति : १३ :

या प्रदेशांत सर्वोदयाचा विचार मानणारे कमी नाहींत. राजकीय पक्षांमध्यें आणि सरकारांत काम करणाऱ्यांमध्यें हि सर्वोदयावर श्रद्धा ठेवणारे बरेच सज्जन आहेत; परंतु सर्वोदयाचा एक मूलभूत विचार अजून लोकांना समजावयाचा आहे. तो सर्व जगाला अजून समजायचा आहे तसा च तामिळनाडला हि.

### सर्वत्र स्वतंत्र राज्यसंस्था

जगामध्यें लोकांनीं एक राज्यसंस्था बनवली आहे. पहिली ती एका व्यक्तीच्या हातीं असे. तिला राजेशाही म्हणत. एका काळीं सर्व जगांत अशी राजेशाही चालू होती. पूर्वीच्या काळीं वेगवेगळ्या देशांमध्यें विशेष संपर्क नव्हता. दिल्लीवाल्यांना रोमचें ज्ञान नव्हतें. रोमवाल्यांना दिल्लीचें नव्हतें. परंतु दोन्ही प्रदेशांत राजे च राज्य करीत होते. पूर्वी चीन, हिंदुस्थान आणि दुसऱ्या देशांत हि राजे राज्य करीत होते. जगातल्या सर्व लोकांनीं एकत्र बसून ते पसंत केले होते असें नाहीं. त्या वेळीं वेगवेगळ्या देशांचा एकमेकांशीं विशेष परिचय हि नव्हता असें मीं आतां च सांगितलें आहे. कांहीं व्यापारी इकडून तिकडे जात असत खरे, परंतु ते थोडे होते. कांहीं प्रवासी हि येत जात. ह्यू-एन्-त्संग चीनहून इकडे आला होता

आणि इकडून हि परमार्थ नांवाचा मनुष्य तिकडे गेला होता. याप्रमाणें विचारांची कांहीं थोडी देवाण-घेवाण होत होती. पण वेगवेगळ्या देशांतल्या राज्यसंस्था बनल्या त्या स्वतंत्रपणें च बनल्या. त्या स्वाभाविकपणें च बनल्या. लोकांना असें च वाटे कीं, चांगला राज्यकारभार चालायला राजा असला च पाहिजे.

## बेडूक आणि राजा

एक जुनी गोष्ट आहे. एकदां बेडकांना आपल्याला राजा असावा अशी इच्छा झाली. त्यांना वाटलें राजाशिवाय आपली व्यवस्था ठीक होत नाहीं. म्हणून 'परमेश्वरा, आम्हांला कुणी राजा पाठवून द्या' अशी त्यांनीं देवाची प्रार्थना केली. परमेश्वरानें त्यांची प्रार्थना ऐकली आणि एक बैल पाठवून दिला. बैल खालीं उतरला तेव्हां ५-५० बेडूक त्याच्या पायांखालीं चिरडून मेले. तेव्हां ते देवाला म्हणाले, 'असला राजा आम्हांला नको. दुसरा कोणी-तरी पाठवा.' देवानें एक मोठा दगड वरून खालीं टाकून दिला. त्याच्या-खालीं २०० ते ४०० बेडूक खतम झाले. तेव्हां ते फार घाबरले आणि पुन्हां देवाला म्हणाले, 'तुम्हीं आमच्यावर मोठें संकट च टाकलेंत!' देवानें उत्तर दिलें, 'मीं बैल पाठवला ते माझें वहान होतें. त्यानें तुमचें काम झालें नाहीं तेव्हां मी ज्या स्फटिक शिळेवर बसतों ती पाठविली. ती हि तुम्हांला चांगली वाटत नाहीं. आतां आणखी कोठला राजा पाठवूं? म्हणून राजाशिवाय च तुमचें काम चांगलें चालेल असें समजा.' तेव्हां बेडकांनीं राजाचें नांव सोडून दिलें.

## राज्यसंस्थेचें निर्माण आणि विलयन

मनुष्याची हि अशी च स्थिति आहे. जागोजागीं राजांची मागणी होत गेली. पहिले जे राजे झाले ते जबाबदार असत. पुराणामध्यें मनु महाराजांची गोष्ट आहे. मनु जंगलांत तपस्या करीत होते. ते महाज्ञानी होते. तत्त्व-ज्ञानाच्या चिंतनांत दंग होते. कोणी राजा नसल्यामुळें लोकांचा कारभार चांगला चालत नव्हता. म्हणून कोणी राजा असेल तर बरें असें त्यांना वाटलें. चला, आपण मनूकडे जाऊं. त्यांचे पुढारी मनूकडे गेले आणि त्यांना म्हणाले, 'महाराज, तुम्ही आमचे राजे बनलांत तर आमचें काम

होईल. म्हणून कृपा करून आमचे राजे व्हा.' मनु महाराजानें दोन अटी सांगितल्या. ते म्हणाले, 'तुम्ही सर्व लोक एकमतानें मला मान्यता द्याल तर मी राजा होईन. बहुमतानें होणार नाहीं. एकावन लोक पसंत करतील आणि एकूणपन्नास विरुद्ध असतील तर मी राजा होणार नाहीं. ९९ पसंत करतील आणि एक विरुद्ध असेल तरी हि राजा होणार नाहीं. त्या परिस्थितींत मी सल्ला देईन, पण राजा होणार नाहीं. ही एक अट झाली. दुसरी अट अशी कीं, राजा झाल्यामुळें मला जें पाप लागेल त्याची जबाबदारी तुमच्यावर राहील. कारण 'राज्यान्ते नरकप्राप्तिः।'— जो राज्य करील तो सरळ नरकांत जाईल. म्हणून त्या पापाची जबाबदारी तुम्हीं घ्याल तर मी राजा होईन, नाहीं तर नाहीं.' म्हणून लोकांनीं तें कबूल केलें आणि मनु राजा झाला.

याप्रमाणें मनूनें तर उत्तम राज्य चालविलें. परंतु त्याच्यानंतर दुसरा कोणी राजा व्हावें असा प्रश्न उत्पन्न झाला. कारण मनु कधीं तरी मरणार च होता. मनूनंतर त्याच्या मुलानें राजा व्हावें असें ठरविण्यांत आलें. पुत्र-परंपरेनें राजा व्हावें असा निश्चय झाला. त्यामध्यें कधीं चांगले राजे झाले, कधीं वाईट हि. युधिष्ठिर, अशोक, कृष्णदेवराय वगैरे चांगले राजे झाले. अकबर हि एक फार चांगला आदर्श राजा झाला. ह्या लोकांना चांगल्या राजाचा अनुभव आला. परंतु हा अनुभव कधीं गोड तर कधीं कडू हि होता. अकबर झाला तर औरंगजेब हि झाला. मीं चांगल्या राजांचीं च तेवढीं नांवें सांगितलीं. आता वाईट राजांचीं नांवें सांगून त्यांना अमर करूं इच्छीत नाहीं. पण सार एवढें च कीं, लोकांना बरे वाईट दोन्ही अनुभव आले. केव्हां कसला राजा येईल याचा भरंवसा राहिला नाहीं. म्हणून सर्व लोकांनीं आपलें नशीब एका राजाचे हातात सोपविणें चुकीचें आहे असा विचार करून लोकांनीं हिंदुस्थानांतल्या सर्व राजांचें विसर्जन केलें. जुने राजे 'राजप्रमुख' बनले. आतां तर 'राजप्रमुख' हि संपले. आतां फक्त त्यांचीं 'प्रीव्ही पर्स' वांचली आहे.

### लोकशाहीमध्यें राज्यसंस्थेचें च प्रतिबिंब

राजांच्या ऐवजीं राज्यसंस्था पाहिजे कीं नाहीं असा आतां प्रश्न उभा

आहे. पाहिजे असेल तर ती राज्यसंस्था कशा प्रकारची असावी ? आज तर पांच वर्षांतून एकदां निवडणूक होते. ५१ लोकांचें एक मत पडलें आणि ४९ लोकांचें दुसरें तर ५१ लोकांच्या मतावर च राज्य चालतें. पण असें कां ? राजसत्तेवर ४९ लोकांचें प्रतिबिंब कां पडूं नये ? याचें काय उत्तर आहे. ४९ लोकांना कांहीं विचार च नाहीं का ? सर्वांच्या विचारांचें मिश्रण होऊन राज्य चालावें ही स्वतंत्र गोष्ट आहे. परंतु येथें तर गणपति करून राज्य चालतें. ती हि एक प्रकारची शिरगणति आहे. केवळ रावणाला दहा मतांचा अधिकार राहील आणि बाकीच्या सर्व लोकांना एक च मताचा अधिकार राहील. ही काय राज्यव्यवस्था आहे ?

लोक निवडून येतात त्यांत कांहीं चांगले असतात, कांहीं वाईट. राजांच्या काळीं कांहीं चांगले राजे असत, कांहीं वाईट. 'मी प्रजेच्या घतीनें हें सर्व करीत आहे' असा दावा मात्र त्या काळीं राजे करूं शकत नसत. गोळीबार केला तर तो आपल्या जबाबदारीवर करीत. पण आजचें सरकार गोळीबार करील तर म्हणेल कीं, "लोकांच्या हिताकरितां च गोळीबार केला." याचा अर्थ असा झाला कीं, आज जो गोळीबार होतो त्याची पूर्ण जबाबदारी जनतेवर पडते. राज्यसंस्थेमध्यें आणि लोकशाहीमध्यें एवढा च फरक पडला, ज्यास्ती नाहीं. आतां एक मुख्य मंत्री होतो आणि तो आपलें मंत्रिमंडळ बनवितो. मुख्य मंत्री पसंत करील ते च लोक मंत्रिमंडळांत राहूं शकतात. ही तर अगदीं राजांच्यासारखी च व्यवस्था झाली. म्हणजे एक राजा आणि त्याचे थोडे सरदार अशी च ही स्थिति आहे. पूर्वीं हि राजा एकटा च राज्य करीत नव्हता. त्याला हि दुसऱ्या मंत्र्यांची जरूरी पडे च. अकबराच्या मंत्रिमंडळात ९ मंत्रि होते. त्यानें तोडरमल, अब्दुल फैझी वगैरे मंत्रि निवडले आणि सर्वांनीं मिळून राज्य चालविलें.

### केंद्रित सत्तेचे दोष

आतां मुख्य मंत्रि चांगला असेल तर राज्य चांगलें चालेल. त्याची अक्कल जाईल तर तुम्ही सर्व नष्ट व्हाल. आज सगळ्या जगाला आग लावण्याची शक्ति आईक, बुल्गानिन, ईडन, चाओ आणि माओ यांच्या हातीं आलेली आहे. यांच्यापैकीं एकाची हि बुद्धि फिरली तर तो दुनियेला

आग लावूं शकतो. जगाला आग लावायला चार पांच लोकांच्या एकमताची हि जरूरी नाहीं. कोण्या एखाद्याचें हि डोकें फिरलें तर पुरे आहे. परंतु जगांत शांति राखायची असेल तर त्या सर्वांचें एकमत व्हावें च लागेल. किती भयानक स्थिति आहे. जगांतल्या २५० कोटी लोकांनीं आपली सत्ता आठ-दहा लोकांच्या हातांत सोंपवून दिलेली आहे. हल्लीं सर्वत्र या च आईक, माईक आणि चाऊ-माऊसंबंधीं चर्चा चालते. यांनीं च वर्तमानपत्रें भरलेलीं असतात. कारण हे लोक केव्हां आग लावून देतील कोणास ठाऊक. म्हणून लोक घाबरले आहेत. सुवेझ कालव्याचा प्रश्न आतां थोडा मुद्दं लागला आहे. तो सुटला नसता तर तुमची ४४०० कोटी रुपयांची पंचवार्षिक योजना खतम झाली असती. गांवोगांवच्या लोकाना कष्ट सोसावे लागले असते. किमती चढल्या असत्या आणि कोणाच्या हातांत कांहीं राहिलें नसतें.

दोन दिवसांपूर्वी वर्तमानपत्रांत वाचलें कीं, कोयमतूर जिल्ह्यांतील धारापूर गांवीं लोण्याचा भाव सहा रुपयांवरुन चार रुपये झाला. आतां त्या बिचाऱ्या लोणीविक्यांची काय स्थिति होईल? लढाई चालू नाहीं तेव्हां ही स्थिति आहे; तर महायुद्ध सुरू झाल्यावर किंमती कुणीकडे जातील कोणाला सांगता येणार नाहीं. हिंदुस्थानांतल्या खेड्यांतले लोक दुःखी होतील. या सर्वांचे एक मात्र कारण हें च आहे कीं, भलें-बाईट करण्याचा अधिकार एका व्यक्तीच्या हातीं सोंपविला आहे. आजचें चित्र तर असें आहे कीं, प्रत्येक खेड्यांत कसें काम चालावें याची योजना दिल्लींत बनते आणि ज्यांनीं कधीं खेड्याचें दर्शन हि घेतलें नाहीं असले लोक ती बनवतात. ते च ठरवितात कीं जेवढे विणकर आहेत त्यांनीं दारूच्या दुकानासारखा लायसेन्स घेतला पाहिजे. ही आहे लोकांनीं निवडून दिलेल्या सरकारची योजना.

## विकेंद्रित सत्तेनें च शांति

आज बिहारमध्यें दारूबंदी नाहीं. तेथें गंगेसारखी दारूची नदी वाहात आहे. पण तेथें गोवधबंदी आहे. इकडे तुमच्या मद्रासमध्यें दारूबंदी आहे; पण गोवधबंदी नाहीं. हे दोन प्रांत एकाच देशांतले आहेत. पण इतका

फरक को ? गायी कापाव्या असें येथलें लोकमत आहे ? आणि दारूची नदी वाहावी असें बिहारचें लोकमत आहे ! लोकमताचा कांहीं प्रश्न च नाहीं. लोकमतानें कांहीं चालत नाहीं. ५१ लोकांची ४९ लोकांवर ५ वर्षें सत्ता चालायची आहे. ४९ लोकांचे कांहीं चालणार नाहीं. या ५१ लोकांमध्येंहि त्यांच्या पार्टी बैठकींत बहुमतानें च ठराव पास होईल. म्हणजे ५१ पैकीं २६ लोकांचें चालेल. २५ चें नाहीं. मौजेची गोष्ट आहे कीं, १०० पैकीं ४९ लोक प्रथम खतम झाले आणि ५१ ला महत्त्व मिळालें. पार्टी बैठकीमध्ये हि ५१ पैकीं २५ खतम झाले आणि २६ ना मत प्राप्त झाले. म्हणजे १०० लोकांवर २६ चें राज्य चालेल. त्यांच्यावर हि एक पार्टी व्हिप असतो च. त्यानें कांहीं गोष्टींविषयीं गप्प बसायला सांगितलें तर सर्वांना गप्प रहावें लागतें. ही पार्टीची शिस्त आहे. शिवाय प्रधानमंत्रि आपल्या इच्छेप्रमाणे लोक निवडेल. आपले प्रधानमंत्रि शहाणे आहेत ही परमेश्वराची कृपा आहे. पण आपण मात्र राजांच्या वेळेसारखें पराधीन च आहोत. म्हणून राज्यव्यवस्था विकेंद्रित होऊन जाईल तेव्हां च जगांत खरी शांति आणि खरी स्वतंत्रता मिळेल.

याचा अर्थ हा झाला कीं, लोकाचा कारभार खेड्यांतल्या लोकांच्या च हातीं असावा. आपल्या गावांत कोणती वस्तु यावी, कोणती येऊं नये, हें गांववाल्यांनीं च ठरवावें. गांवाची सर्व सत्ता गांवकऱ्यांच्या हातीं असावी. गावाचा कारभार पक्षपद्धतीच्या बहुमतानें न चालतां सर्वसंमतीनें चालावा. गांवाचें संयोजन करण्याकरतां कांहीं प्रमुख लोक असतील त्यांच्या हातीं भौतिक सत्ता असणार नाहीं, नैतिक शक्ति असेल. ते दोन गांवांत तन्टे असतील तर मध्यें पडतील आणि परदेशाशीं संबंध ठेवतील. असल्या तन्ट्यांचीं कामें त्यांच्या हातीं असावीं. याप्रमाणे राजसत्ता जेव्हां विकेंद्रित होईल तेव्हां लोकांत शांति होईल. गांवात जी सत्ता चालेल ती सत्ता असणार नाहीं, ती सेवा असेल. सर्व मिळून सर्वांची सेवा करतील.

## सर्वोदय म्हणजे शासनमुक्ति

सर्वोदय काय आहे हा विचार लोकांना समजला नाहीं म्हणून मी हें सर्व सांगत आहें. 'सर्वोदय' म्हणजे चांगलें राज्य किंवा बहुमताचें राज्य

नव्हे. सर्वोदय म्हणजे शासनमुक्ति किंवा सत्तेचें विकेंद्रीकरण होय. कोणतें हि काम बहुमतानें होणार नाहीं. सर्वसंमतीनें आणि गांवच्या जनशक्तीनें झालें पाहिजे. तमिलनाडमध्यें दुसऱ्या प्रांतापेक्षां श्रद्धाबुद्धि कमी नाहीं. येथें सर्वोदयाविषयीं प्रेम आहे. पण सर्वोदय काय आहे हें स्पष्ट झालेलें नाहीं. जें काम लोकशक्तीनें होईल त्यानें च सर्वोदय होईल, हें ज्ञान अजून तामिलनाडमध्यें झालेलें नाहीं. पुष्कळ लोकांची बुद्धि अजून राजकारणांत अडकलेली आहे.

## सरकार तोडून टाका

हे सर्व राज्यकर्ते जर शरीरपरिश्रम करूं लागतील तर दुनियेचा कारभार चांगला चालेल. आज तर हे लोक थोडेंसें च काम करतात आणि पुष्कळशी सुट्टी घेत असतात. प्रोफेसरला सहा महिने सुट्टी असते. विद्यार्थ्यांना तीन तीन महिने सुट्टी असते. अशा तऱ्हेच्या अनेक सुट्ट्या असतात.

मीं एकदां असें सुचविलें होतें कीं, या राज्यकर्त्यांना दोन वर्षें सुट्टी देऊन टाकावी आणि पहावें त्यांच्याशिवाय देशांत काय काय गडबड होते ती! लोणी बनवणारा मग लोणी विकणार नाहीं का? भाजी विकणारा भाजी विकायला आणणार नाहीं? आणि ती विकत घेणारा ती विकत घेणार नाहीं? लग्नें होणार नाहींत? मुलें जन्माला येणार नाहींत आणि मरणारीं मरणार नाहींत? आया आपल्या मुलांना पाजणार नाहींत? लोक आपलें अंगण झाडणार नाहींत? आईबाप आपल्या मुलांना रामायणांतल्या गोष्टी सांगणार नाहींत? आज जें सर्व चाललें आहे त्यांपैकीं काय होणार नाहीं तें सांगा. तंटे होणार नाहींत म्हणून वकिलांना काम राहणार नाहीं. त्यांची कांहींतरी दुसरी व्यवस्था करावी लागेल. परंतु सरकारनें दोन वर्षें सुट्टी घेतली तर या राज्यकर्त्यांशिवाय जगाचें चालणार नाहीं हा जो भ्रम आहे तो नाहींसा होईल. सूर्य उगवला नाहीं तर जगाचा नाश होईल. दान आणि तप झालें नाहीं, परमेश्वरकृपेनें पाऊस पडला नाहीं, तर जग चालणार नाहीं. ईश्वराच्या कृपेच्या पात्रताची आवश्यकता आहे, सरकारची नाहीं.

परंतु हल्लीं तामिलनाडमध्यें उलटी च गोष्ट बोलली जात आहे. येथले लोक म्हणतात कीं, आम्हांला ईश्वर नको, सरकार पाहिजे. नशीब बिचाऱ्यांचें ! ईश्वराच्या मागें लागले आहेत तो नाहींसा करण्याच्या मागें लागले आहेत; पण सरकार तोडण्याची गोष्ट करूं शकत नाहींत. बंधू हो, ईश्वराच्या मागें कां लागतां ? तो एका कोपऱ्यांत बसला आहे. त्यानें तुमचें काय बिघडलें ? तो आहे म्हणाल तर आहे, नाहीं म्हणाल तर नाहीं. जो बिचारा तुमच्या म्हणण्यावर च अवलंबून आहे त्याच्या मागें हात धुवून लागलां आहांत ही आश्चर्याची गोष्ट आहे. पण जी सत्ता तुमच्या डोक्यावर चढून बसलेली आहे, जिच्याखालीं तुम्ही चिरडून जात आहां, ती मात्र डोक्यावर घेऊन बसलां आहांत. याला काय शहाणपण म्हणावें हें मला समजत नाहीं. ईश्वर बिचारा गरीब आहे तुम्हीं तो नाहीं म्हटलेंत तरी तो सहन करतो. त्याच्या मागें कां लागलां आहांत ? आणि जें सरकार तुमच्या डोक्यावर प्रतिक्षण नाचतें आहे तें डोक्यावर कां घेऊन बसलां आहांत ? मी केवळ हिंदुस्थान सरकारची किंवा मद्रास सरकारची गोष्ट करीत नाहीं. त्याची चर्चा करण्याचें कांहीं कारण नाहीं. मी त्यांचें अस्तित्व च मानत नाहीं. तुम्हीं निवडले आहेत म्हणून तें सरकार तेथें बसलें आहे. मी तुम्हां लोकांची च किंमत मानतों. धनगर मेंढ्यांचें रक्षण करतो. एकदां मेंढ्यांना मताधिकार दिला तेव्हांपासून मेंढ्या अमका धनगर आमचा आहे असें निवडूं लागल्या. आतां निवडलेला धनगर मेंढ्यांचें रक्षण करतो आहे. तुम्हीं स्वतंत्र धनगर निवडला म्हणून काय ? पण त्या मेंढ्या त्या मेंढ्या च. आम्हांला धनगर नको असें जेव्हां त्या म्हणतील तेव्हा त्यांचें मेंढ्यापण नाहींसे होऊन त्या मानव बनतील. याचें नांव आहे सर्वोदय आणि याचें च नांव शासनमुक्ति.

वोडीनायकल्लुर ( मदुराई )
१०-१२-'५६

# ग्रामदान म्हणजे ग्रामस्वराज्य



आजपर्यंत आम्हांला सुमारें १५०० ग्रामदानें मिळालीं आहेत. ते लोक सुखी झाले आहेत यांत शंका नाहीं. जेव्हां सर्व गांव एक होतो तेव्हां सर्वांच्या सम्मिलित अकलेने काम होतें. म्हणून सर्वांनीं मिळून सुखी होण्याचा रस्ता मोकळा होतो. तरी हि 'ग्रामदान द्याल तर सुखी व्हाल; म्हणून ग्रामदान द्या' असें वचन मी लिहीत नाहीं. स्वराज्यासंबंधीं लोकांना समजावितांना इंग्रजांचे राज्यांत सुख असलें तरी तें आम्हांला नको, स्वराज्य पाहिजे, असें आम्ही म्हणत होतों. आम्हांला स्वराज्यात कमी खायला मिळालें आणि परदेशी सत्तेत पुरे खायला मिळालें तरी तें पारतन्त्र्य आम्हाला नको. इंग्रजी राज्य असतांना परकी सत्ता होती, आणि पुरें खायला हि मिळत नव्हतें, अशीं दोन्ही संकटे होतीं. दोन्ही दुःखें होतीं म्हणून प्रश्न च नव्हता; परंतु दोन्ही नसतीं आणि खायला-प्यायला पुरें मिळालें असतें तरी हि आम्हीं स्वराज्य मागितलें असतें. ग्रामदानाला हि ही च गोष्ट लागू आहे. ग्रामदान म्हणजे स्वराज्य. आज ग्रामराज्य आहे कोठें ? आज तर स्वराज्याचें पार्सल लंडनहून दिल्लीला आलें आहे आणि जास्तींत जास्ती दिल्लीहून मद्रासला, कदाचित् मदुरेला आलें असावें. तें गावोगांवीं पोहोंचलेलें नाहीं. जोंपर्यंत गांवोगांवीं स्वराज्य पोहोंचलेलें नाहीं तोंपर्यंत मद्रास, मदुरेमध्यें स्वराज्य आलें तर त्याचा गांववाल्यांना काय लाभ होईल ?

## शेफील्डची सुरी आणि बकरा

एक गांव होतें. तेथे कसाई लोक रहात असत. ते शेफील्डच्या सुरीनें बकरे कापत. मग स्वराज्य आले तेव्हां ठरविण्यात आलें कीं, शेफील्डच्या सुरीऐवजीं अलिगडच्या सुरीनें बकरे कापावेत. तरी हि बकरे ओरडत च राहिले. तेव्हा कसाई म्हणूं लागले, 'काय मूर्ख आहेत ! शेफील्डची सुरी सोडून अलिगडच्या सुरीनें कापतों तरी ओरडतात च !' हे ऐकून बकरा

## ग्रामदानामध्यें धर्म, अर्थ आणि विज्ञानाचा विचार : १५ :

ग्रामदान हा एक अत्यंत परिशुद्ध धर्मविचार आहे. मला असें हि सांगायचें आहे कीं, तो एक अत्यंत आधुनिक अर्थशास्त्रीय विचार आहे, अत्यंत परिशुद्ध वैज्ञानिक विचार आहे. याचा अर्थ यामध्यें धर्मविचार, अर्थविचार आणि विज्ञानविचार तीन्ही एकत्रित झाले आहेत. तीन्ही विचारांच्या कसोटीवर ग्रामदानाचा विचार खरा ठरला आहे.

### ग्रामदानाचा धर्मविचार

धर्म म्हणतो कोणा एकाला हि दुःख झालें तर त्याच्या दुःखांत सर्वांनीं भाग घेतला पाहिजे. गांवात कोणाला उपास पडला तर सर्वांनीं उपास करावा म्हणजे आपण कमी खाऊन कोणाला च उपास पडूं देऊं नये. तांदुळाच्या ढिगांतून एक शेर तांदूळ काढला तर तेथें एक शेराचा खड्डा पडतो. पण विहिरींतून एक बादलीभर पाणी काढलें तर तेथें बादलीच्या आकाराचा खड्डा पडत नाहीं. पहिल्याप्रमाणें च पाणी अगदीं समतळ असतें. थोडीशी पातळी कमी होते. ह्या दोन्हींमध्ये फरक आहे. पाण्याच्या थेंबांत परस्परांमध्यें इतकें प्रेम असतें कीं, ते एकदम मदतीला धांवतात. विहिरींतून बादलीभर पाणी निघालें, तेथें खड्डा पडण्याचा प्रसंग आला, कीं बाकी सर्व थेंब तो खड्डा भरायला धांवत जातात. समाजांत हि या पाण्याच्या थेंबाप्रमाणें प्रेम असावें असें धर्म सांगतो. याच्या उलट ज्वारीच्या ढिगांत खड्डा पडूं शकतो. कारण ज्वारीचे दाणे आपल्याला वेगवेगळे मानतात. खड्डा भरायला मदत करीत नाहींत. त्यांत कांहीं थोडे महात्मे असतात, ते खड्डा भरण्याकरतां त्यात उडी घेतात. बाकीचे दाणे त्याची कांहीं पर्वा करीत नाहींत. ज्या समाजांतले लोक ज्वारीसारखे आहेत तेथे धर्म नाहीं आणि ज्या समाजरचनेंत पाण्याचा सद्भाव आहे तेथें धर्म आहे. तुमच्या गांवांतल्या पांच घरीं खायला नाहीं, तेथें खड्डा पडला आहे, तर बाकीच्या सर्व लोकांनीं त्यांच्या मदतीला धांवावें. स्वतः कमी खाऊन त्याना खायला

ग्रामदान हा एक अत्यंत परिशुद्ध धर्मविचार आहे. मला असें हि सांगायचें आहे कीं, तो एक अत्यंत आधुनिक अर्थशास्त्रीय विचार आहे, अत्यंत परिशुद्ध वैज्ञानिक विचार आहे. याचा अर्थ यामध्यें धर्मविचार, अर्थविचार आणि विज्ञानविचार तीन्ही एकत्रित झाले आहेत. तीन्ही विचारांच्या कसोटीवर ग्रामदानाचा विचार खरा ठरला आहे.

### ग्रामदानाचा धर्मविचार

धर्म म्हणतो कोणा एकाला हि दुःख झालें तर त्याच्या दुःखांत सर्वांनी भाग घेतला पाहिजे. गांवांत कोणाला उपास पडला तर सर्वांनीं उपास करावा म्हणजे आपण कमी खाऊन कोणाला च उपास पडूं देऊं नये. तांदुळाच्या ढिगांतून एक शेर तांदूळ काढला तर तेथें एक शेराचा खड्डा पडतो. पण विहिरींतून एक बादलीभर पाणी काढलें तर तेथें बादलीच्या आकाराचा खड्डा पडत नाहीं. पहिल्याप्रमाणें च पाणी अगदीं समतळ असतें. थोडीशी पातळी कमी होते. हा दोन्हींमध्यें फरक आहे. पाण्याच्या थेंबांत परस्परां-मध्यें इतकें प्रेम असतें कीं, ते एकदम मदतीला धांवतात. विहिरींतून बादलीभर पाणी निघालें, तेथें खड्डा पडण्याचा प्रसंग आला, कीं बाकी सर्व थेंब तो खड्डा भरायला धांवत जातात. समाजांत हि या पाण्याच्या थेंबाप्रमाणें प्रेम असावें असें धर्म सांगतो. याच्या उलट ज्वारीच्या ढिगांत खड्डा पडूं शकतो. कारण ज्वारीचे दाणे आपल्याला वेगवेगळे मानतात. खड्डा भरायला मदत करीत नाहींत. त्यांत कांहीं थोडे महात्मे असतात, ते खड्डा भरण्याकरतां त्यांत उडी घेतात. बाकीचे दाणे त्याची कांहीं पर्वा करीत नाहींत. ज्या समाजांतले लोक ज्वारीसारखे आहेत तेथें धर्म नाहीं आणि ज्या समाजरचनेंत पाण्याचा सद्भाव आहे तेथें धर्म आहे. तुमच्या गावांतल्या पांच घरीं खायला नाहीं, तेथें खड्डा पडला आहे, तर बाकीच्या सर्व लोकांनीं त्यांच्या मदतीला धांवावें. स्वतः कमी खाऊन त्याना खायला

द्यावें आणि तो खड्डा भरावा. याचें च नांव धर्म-विचार. याला च करुणा आणि प्रेम म्हणतात. हें परमेश्वराचें रूप आहे.

### ग्रामदानानें उपास करण्याची संधि मिळेल

ग्रामदानाच्या कामांत करुणा प्रत्यक्ष प्रकट होते. त्यामुळें दुसऱ्याच्या-करतां उपास करण्याची संधि मिळेल. हा पहिला लाभ आहे. मी हें आमचें मोठें भाग्य समजतों. आईनें मुलाकरितां उपास केला तर ती किती गौरवाची गोष्ट होते. आई स्वतः उपास करून मुलाला खायला घालते हें गृहस्थाश्रमाचें वैभव आहे. लग्न न झालेला तरुण रस्त्यांतल्या झाडावर आंबा लागलेला पाहील तर तोडून खाईल; पण लग्न झाल्यावर तो स्वतः खाणार नाहीं; मुलांच्याकरितां घरीं घेऊन येईल. गरीब मनुष्य लग्न करतो तेव्हां त्याचें उत्पन्न वाढतें का? लग्नाच्या पूर्वी घरीं जेवढें दूध येईल तें स्वतः च तो पिऊन टाकत असे; पण लग्न झाल्यावर तो मुलांच्या-करिता राखून ठेवतो, स्वतः पीत नाहीं. त्याला विचारलें कीं, 'तुला दूध मिळत नाहीं का?' तर तो सांगेल कीं, 'घरांत एक च गाय आहे, मुलांच्यापुरतें मिळतें, जास्त नाहीं.' 'पण तू कां पीत नाहींस?' असें विचारलें, तर तो सांगेल कीं, 'मुलांचा पहिला हक्क आहे.' याप्रमाणें त्यागाची कल्पना येते. म्हणून गृहस्थाश्रमाला धर्म मानलें आहे.

ज्याचें लग्न झालेलें नाहीं त्याला काहीं चांगली वस्तु दिसता च खाण्याची इच्छा होते; पण लग्न झालेल्या मुलांवाळांच्या गृहस्थाला स्वतः खाण्याची इच्छा होत नाहीं; तर घरीं नेण्याची होते. त्याला कोणीं विचारलें कीं, 'लग्न केल्यामुळें तुझें उत्पन्न किती वाढलें? आतां तुला खायला प्यायला अधिक चांगलें मिळतें का?' तर १०० पैकीं ९९ चें उत्तर हें च मिळेल कीं, 'आतां तितकें चांगलें मिळत नाहीं.' तरी हि त्यांत त्याला आनंद वाटतो. त्याग करण्याची संधि मिळते. ग्रामदानानें गावचें उत्पन्न वाढेल का? असें मला लोक विचारतात. आज जितकें चांगलें खायला मिळत आहे तितकें चांगलें मिळेल का? असें वचन मी काहीं त्यांना देऊं शकत नाहीं. एवढें च म्हणतों कीं, ग्रामदानानंतर आपल्या गांवाच्या दुःखी

लोकांच्या दुःखांत भाग घेण्याची संधि मिळेल. हा आहे ग्रामदानाचा धर्मविचार.

### ग्रामदानानें अर्थोत्पादनांत वाढ

आतां ग्रामदानाचा आर्थिक विचार करूं. आज गांवच्या जमिनीचे लहान लहान तुकडे झालेले आहेत. कोणापाशीं ज्यास्त जमीन आहे, कोणापाशीं कमी आहे, तर कोणापाशीं मुळीं च नाहीं. एखाद्या शेतांत उंचसखल भाग असेल तर त्यांत पीक चांगलें येईल का? उंचावरचें पाणी वाहून जाईल म्हणून पीक येणार नाहीं आणि खड्डयांत पाणी सांठून राहील म्हणून तेथलें पीक सडून जाईल. प्रत्येक शेतकऱ्याला माहीत असतें कीं, उंचवट्यावरची माती काढून ती खड्डयात टाकून शेत सपाट केलें तर च पीक चांगलें येईल. याप्रमाणें आज समाजात हि कोठें संपत्तीचे ढीग आहेत तर कोठें दारिद्र्याचे खड्डे आहेत अशा समाजांत चागलें अर्थोत्पादन होऊं शकत नाहीं. ज्या समाजात असे उंचवटे आणि खड्डे नाहींत, सर्वांची संपत्ति एकत्र होऊन समता आणि सहकार्य यांचा भाव जेथे येईल, तेथें च अर्थोत्पादन वाढेल

समतेचा अर्थ असा नाहीं कीं, सर्व सारखे होऊन जावें. हाताचीं बोटें कापून सारखीं करायचीं असा त्याचा अर्थ नाहीं. पांच बोटांत जेवढी समता आहे तेवढी समाजात असावी असें माझें म्हणणें आहे. बोटें लहान-मोठीं असतात. पण एक बोट एक इंच लांब तर दुसरें एक फूट असें असत नाहीं. असें होईल तर हाताने बादली उचलणे कठीण होईल. बोटांत लहानमोठेपणा कांहींसा आहे पण तीं जवळ जवळ समान आहेत. प्रत्येकांत वेगळी वेगळी शक्ति आहे आणि तीं सर्व मिळून काम करतात. म्हणून त्यांच्या हातून हजारों कामें होतात. पांच बोटें एकत्र येऊन च काम होतें. त्याप्रमाणें सर्वजण एकत्र येतील, सावधान राहतील आणि सहकार्य करतील, तर काम चागलें होईल. हा आहे अर्थविचार.

### ग्रामभावना आवश्यक

आज सर्व लोक बाहेरचा कपडा विकत घेतात, गांवच्या विणकराचा

घेत नाहींत. बिचारे विणकर बाहेर विकायला घेऊन जातात; तेथें खपला नाहीं म्हणजे सरकारपुढें रडत बसतात. परंतु विणकर आणि शेतकरी हे एकत्र येऊन निश्चय करतील कीं, 'शेतकरी जें सूत कातील तें च विणकर विणील आणि तें च विणलेलें कापड शेतकरी वापरील' तर दोघे हि जगतील. आज हि गांवांत विणकर आणि तेली आहेत. पण गांवचा विणकर गांवच्या तेल्याचें तेल महाग आहे म्हणून घेत नाहीं. शहरांतल्या गिरणीचें तेल घेतो. त्याप्रमाणें च गावचा तेली हि गांवच्या विणकराचा कपडा महाग म्हणून घेत नाहीं. शहरी गिरणीचा घेतो. दोघे हि एका च गांवीं राहतात. पण तेल्याचा धंदा चालत नाहीं व विणकराचा हि नाहीं. कारण दोघे हि एकमेकांला मदत करीत नाहींत. समजा, विणकरानें तेल्याकडून तेल विकत घेतलें तें थोडें महाग होतें म्हणून विणकराच्या खिशातले दोन जास्त पैसे तेल्याच्या घरीं गेले, मग तेल्यानें विणकराकडून कपडा विकत घेतला तो थोडा महाग होता तेव्हा तेल्याच्या घरातले दोन पैसे विणकराच्या घरीं आले तर काय फरक पडेल? याच्या घरातून त्याच्या घरीं गेले आणि त्याच्या घरांतून याच्या घरीं आले. वेळेवर दोघांना मदत मिळाली तर काय नुकसान झालें? माझ्या एका खिशातून मीं दुसऱ्या खिशात पैसे ठेवले तर त्यात माझें काय नुकसान होईल? कारण दोन्ही खिसे माझे च आहेत.

एका च गावात विणकर, शेतकरी, चाभार, तेली सर्व आहेत. परंतु तेल्याच्या तेलाला, विणकराच्या कपड्याला आणि चाभाराच्या जोड्याला गांवात गिऱ्हाईक नाहीं हा काय चमत्कार आहे? गावात इतके लोक आहेत ते का ग्राहक होत नाहींत? 'हा माझा गाव आहे' असा कोणी विचार करीत नाहीं हें त्याचें कारण आहे. गावात राहून आपल्या घरा-पुरता विचार केला तर गावाचें काम चालणार नाहीं. गावात देवीचा रोग आला तर तो सर्व गाव पछाडतो. त्याला तुम्ही थांबवूं शकता का? गांवांतल्या एका घराला आग लागली तर शेजारच्या घराला हि लागते. ती तुम्ही टाळूं शकता का? म्हणून सर्व गावाचें एक कुटुंब होईल तर काम होईल. ही जागा साफ असावी असें दोन घरवाल्यानीं ठरविलें पण दुसरे

दोन घरवाले त्यावर आपल्या मुलांना शौचाला बसवितात तर ती जागा साफ राहील का? चारी घरवाले मिळून ती साफ ठेवण्याचा निश्चय करतील तर च ती साफ राहील. म्हणून गांवाचें काम, गांवाची उन्नति आणि त्या-बरोबर च घराची उन्नति तेव्हां च होईल की जेव्हां गांववाले सर्व गांवाला आपला एक परिवार समजतील. ग्रामदानानें हें काम होईल हा त्याचा अर्थ-शास्त्रीय विचार आहे.

## ग्रामदानाच्यामार्गे विज्ञानाचा विचार आहे

आता विज्ञानाचा काळ आहे. या काळात आपण मिळूनमिसळून काम करणार नाहीं, वेगळे वेगळे राहूं, तर टिकणार नाहीं. कोणता हि देश दुसऱ्या देशाच्या मदतीशिवाय या विज्ञानाच्या काळांत टिकूं शकत नाहीं. कोणता हि प्रदेश दुसऱ्या देशाच्या मदतीशिवाय टिकणार नाहीं कोणतें हि गाव दुसऱ्या गावाच्या मदतीशिवाय आणि कोणतें हि घर दुसऱ्या घराच्या मदतीशिवाय टिकणार नाहीं. बाबा चष्मा वापरतो. चष्म्याशिवाय बाबाची यात्रा चालली नसती. कारण त्याशिवाय त्याला दिसत नाहीं. पण चष्मा बाबानें बनविला नाहीं, दुसऱ्यानें बनविला आहे. या विज्ञानाच्या काळांत आम्ही तुकडे करू शकत नाहीं. लहान लहान तुकडे बनूं तर टिकणार नाहींत. म्हणून राष्ट्राराष्ट्रात, प्रातांप्रातात, गावागावात सहयोगाची आवश्य-कता आहे. ग्रामदानाच्यामार्गे हा विज्ञानविचार आहे.

धर्मविचार करुणा शिकवितो, अर्थविचार उत्पादन वाढविणें शिकवतो, आणि सहकार्यानें शक्ति उत्पन्न होते हें विज्ञान शिकवितें. विज्ञानानें शक्तीचा शोध लागतो. अर्थशास्त्रानें संपत्ति आणि धर्मानें शुद्धीचा शोध लागतो. तीन हि कार्यें ग्रामदानानें साधतात.

काडुचिलारपुर
१८-१२-'५६

मदुरा जिल्ह्यामध्यें आम्हीं जास्तींत जास्ती ग्रामदानावर जोर दिला. सुमारें सात महिने मी तामिळनाडमध्ये फिरत आहे. ग्रामदानाविषयीं मी बोलत आलों आहें. परतु तामिलनाडमध्ये यापूर्वी विशेष काम झालें नव्हतें म्हणून वातावरण तयार करण्यात च इतके दिवस गेले. मी जेथें जाईन तेथें महिन्या दोन महिन्यांत सर्व काम होऊन जाईल अशी आशा करणें हें चूक आहे. जेथें पूर्वी च बीं पेरले असेल तेथे च मग कापणी करायला माणूस जाऊं शकेल. नाहीं तर प्रथम मेहनत करायला पाहिजे; बीं पेरलें पाहिजे; मग पीक येईल. त्याप्रमाणें आमचे ५-६ महिने पूर्वतयारींत च गेले. आतां कार्यकर्त्यांना चांगलें ज्ञान झालें आहे. तसें पाहिलें तर ग्रामदानांचें हें काम दुसऱ्या प्रांतांत दीड वर्षापूर्वी च सुरू झालें आहे. ओरिसांत १२०० पेक्षां ज्यास्त ग्रामदानें मिळून गेलीं आहेत. तेथें सर्व सेवासंघाचें काम हि सुरू झाले आहे. तरी हि तामिळनाडमधले विधायक कार्यकर्ते दुसऱ्या च कामांत गुंतले होते म्हणून त्यांना या कामीं फुरसत मिळत नव्हती किंवा हिंमत होत नव्हती.

कांहीं असो, गेलें दीड वर्ष त्यांनीं या कामीं विशेष लक्ष दिलें नाहीं. पण मी आल्यापासून येथें एक भावना निर्माण झाली आहे. हे लोक अजून हि विधायक कामांत गुंतलेले आहेत आणि मी रचनात्मक काम सोडून भूदानाचे मागें लागलों आहें. मीं तीस वर्षे रचनात्मक च काम केलें म्हणून मला त्याचा थोडा अनुभव आहे. परंतु जेव्हा मला दिसून आलें कीं, जोंपर्यंत जनमानस तयार होणार नाहीं, क्रांतीची भावना उत्पन्न होणार नाहीं, तोंपर्यंत रचनात्मक काम आमच्या अपेक्षेला अनुरूप होणार नाहीं.

**'प्रोटेक्शन'ची नीति**

गांधीजींना स्वराज्यप्राप्तीनंतर आशा होती कीं, स्वराज्यानंतर रचनात्मक काम सरकार च हातीं घेईल. परंतु त्याची घोर निराशा झाली.

त्याचे निराशेचे उद्गार मीं कितीतरी वेळां ऐकले आहेत. त्यांच्या मृत्यू-नंतर देशावर अनेक तऱ्हेचीं संकटें आलीं. त्यामुळें रचनात्मक कार्याकडे सरकारचें दुर्लक्ष झालें, तर मी त्यांना दोष देत नाहीं. परंतु आज हि सरकारची नीति गांधीजींना जशी पाहिजे होती तशी नाहीं. दुसऱ्या कोठल्या प्रकारानें देशांतले प्रश्न सुटले तर गांधीजींच्या च मार्गानें गेलें पाहिजे असें त्यांना वाटत नाहीं. परंतु आजपर्यंत जो अनुभव आला आहे त्यावरून खेड्यांच्याकरितां गांधीजींच्या योजनेखेरीज दुसरी योजना नाहीं.

मीं एकां च खेड्यांत १०-१५ वर्षें काढलीं आहेत. ५-५० लोक खादीधारी झाले. पूर्ण गांव किंवा अर्धा तरी खादीधारी बनला असा अनुभव नाहीं. ज्याप्रमाणें लोक आपल्याकरिता शेती करतात त्याप्रमाणें खादी आणि ग्रामोद्योग त्यांच्या जीवनाचें एक अंग झालें पाहिजे. त्याकरता दोन उपाय आहेत. एक तर त्यांच्या विरुद्ध ज्या गिरण्या उभ्या आहेत त्यांच्यावर सरकारनें अंकुश ठेवावा. ओपन कॉम्पिटीशनमध्यें या वस्तू टिकतील अशी आशा करणें व्यर्थ आहे. गावामध्यें ग्रामोद्योग चालू असतील तर त्याला सरकारकडून पूर्ण संरक्षण मिळालें पाहिजे. पण तसं होत नाहीं.

खरोखर पाहाता लोकांच्या हितासाठीं असें संरक्षण देणें सरकारचें कर्तव्य आहे. टाटांच्या लोखंडाच्या कारखान्याला आणि साखरेच्या कार-खान्यांना सरकारकडून किती संरक्षण मिळालें ? २०० वर्षांपूर्वी हिंदुस्थाना-तून इंग्लंडमध्यें खूप कापड जात होतें. त्या वेळीं हिंदुस्थानमध्यें गिरण्या तर नव्हत्या. लोक हातानें कातून च हातमागावर कापड विणत होते; परंतु येथले व्यापारी इतके दूर नेऊन कापड विकीत आणि ते स्वस्त व चांगलें हि लोकांना वाटत होतें. त्या वेळी वाहतुकीचीं सुलभ साधनें हि नव्हतीं. फार कष्टानें व्यापारी तेथें पोहोंचत. तरी हि त्याचें इंग्रजांना भय वाटलें; आणि इंग्लंडनें त्या व्यापाऱ्यांवर प्रतिबंध घातले. याप्रमाणें लोकहितासाठीं प्रतिबंध घालणें सरकारचें कर्तव्य आहे ही सर्वमान्य गोष्ट आहे. अर्थशास्त्राचा हि त्याला विरोध नाहीं. तरी हि ही गोष्ट सरकार करीत नाहीं; कारण

सरकारचा त्यावर विश्वास नाहीं. अशा स्थितींत ग्रामोद्योग कसे टिकतील? त्याकरितां दुसरा कांहींतरी उपाय पाहिजे.

## ग्रामोद्योगाकरितां ग्रामसंकल्प

मी तीस वर्षें या गोष्टीवर चिंतन करीत आलों आहें. त्यावरून मला त्याचा एक च उपाय सुचला आहे. तो म्हणजे लोकमत तयार व्हावें आणि लोकांनीं च ग्रामोद्योगाला संरक्षण द्यावें. गांवच्या लोकांनीं ग्रामसंकल्प करावा कीं, गांवच्या बाहेरच्या अमूक वस्तू आम्ही येऊं देणार नाहीं. हिंदुस्थानांतले लोक गाईचें मांस स्वस्त असलें आणि धान्य महाग असलें तरी गाईचें मांस खात नाहींत. याला महापुरुषांनीं एक भावना निर्माण केली. यांत सरकारचा कांहीं संबंध नाहीं. लोकांनीं च त्याचा निर्णय ठरवून टाकला. याप्रमाणें च लोक ग्रामोद्योगाविषयीं संकल्प करतील तर सरकारी संरक्षणाची कांहीं जरूरी नाहीं.

असा विचार करून च मी ग्रामसंकल्पाच्या शोधाला निघालों. त्यांत भूदानयज्ञाची संधि मिळाली. त्याचा कांहीं लाभ झाला. आरंभ लहान च होता. आपल्या जमिनीचा काहीं अंश द्या एवढा च होता. पुढें सहाव्या हिश्शाची मागणी सुरू झाली. मग तुमच्या गांवीं कोणी भूमिहीन राहूं नये असें म्हटलें आणि आतां सर्व गांवच्या गांव मिळावें अशी मागणी सुरू केली. व्यक्तिगत मालकी राहूं नये, गांवाची रहावी, असें मी सांगूं लागलों. याप्रमाणें लहानशा सुरुवातीपासून ग्रामदानापर्यंत पोंहोंचलों आहें. जमिनीवर व्यक्तीची मालकी असूं नये ही गोष्ट तर मी तेलगणांत हि बोलत होतों. पण त्यावर जोर दिला नव्हता. कारण तेव्हां तें घडणें संभवनीय नव्हतें. हळूहळू जनमानस तयार झाल्यावर मीं ग्रामदानाची मागणी सुरू केली.

ग्रामदानामध्यें गावाचा एक संकल्प होतो व त्यामुळें गांव आपली योजना आपण करूं शकतो. दिल्लीमध्यें कांहीं योजना झाली तरी तिचा गांवाशीं कांहीं संबंध असत नाहीं. परंतु गावचाल्यांनीं अमुक वस्तू आम्ही बनवणार असा निश्चय केला तर त्याप्रमाणें ते करूं शकतात. मग घरीं बनल्या गिरणीचा कपडा दोन आणे वार मिळत असला किंवा गिरणीचा

एजंट वापरून पाहायला फुकट देत असत्या तरी गांववाले तें कापड घेणार नाहींत. याला मी जनशक्ति म्हणतों. मदुरेमध्यें या जनशक्तीचें मला दर्शन होत आहे. रोज एक-एक, दोन-दोन झाल्याचें ऐकायला येतें. उत्तम जमिनी असलेलीं गांवें पूर्ण विचारान्तीं ग्रामदानांत येऊं लागलीं आहेत.

## वेगवेगळे नमुने

काल एकजण मित्र म्हणाले कीं, 'ग्रामदानाचा एक पूर्ण नमुना लोकांपुढें ठेवण्यांत यावा.' पण फोटो काढला तर एका च तऱ्हेचा निघतो. पण हातानें चित्र काढलें तर प्रत्येक चित्र वेगळ्या प्रकारचें बनतें. गिरणीचें कापड अगदीं एकसारखें असतें. हातच्या सुताच्या कापडांत विविधता असते. हार्मोनियमचा 'भोंओ' असा एक च आवाज येईल. पण माणूस तऱ्हेतऱ्हेनें गाऊं शकतो. त्याप्रमाणें च प्रत्येक गांवाच्या लोकांचें काम वेगळ्या वेगळ्या तऱ्हेचें होईल. प्रत्येक ठिकाणीं वेगळे नमुने दिसतील. कोठें सर्व जमिनीचें एक च फार्म बनेल, कोठें चार बनतील, कोठें चार पांच शेतकरी मिळून एकत्र काम करतील तर कोठें प्रत्येकजण वेगळ्या शेतांत काम करील. याप्रमाणें प्रत्येक ठिकाणीं वेगळें चित्र दिसेल. पण कोठल्या हि परिस्थितींत व्यक्तीचा जमिनीवर मालकीहक्क असणार नाहीं. याप्रमाणें वेगवेगळे प्रयोग करीत राहूं आणि जो सर्वांत अनुभवानें चांगला ठरेल त्याचा पुरस्कार करूं. तरी हि या सर्व चित्राच्या मुळाशीं एक तत्त्व कायम राहील तें हें कीं, आजची राजसत्ता च नाहींशी करायची आहे; आजच्या सरकारचें रूप च पालटून टाकायचें आहे.

## डाळिंबाच्या दाण्यासारखें राज्य

ग्रामदानी गांवाचीं अनेक चित्रें बनतील पण त्याला पाहिजे तो रंग तुम्हीं देऊं शकतां. गांववाल्यांनीं आपली योजना बनवावी. गांवच्या आयात-निर्यातीवर त्यांचा च अधिकार चालेल. यासंबंधीं हिंदुस्थानांतल्या अनेक मोटमोठ्या पुढाऱ्यांबरोबर माझें बोलणें झालें आहे. 'हें कसें होऊं शकेल? हा तर स्टेटचा अधिकार आहे. स्टेटमध्ये दुसरें स्टेट कसें होऊं शकेल?' अशी त्यांना भीति वाटते. परंतु आजच्या राजकीय चिंतनाचा हा परिणाम आहे. लोकशक्तीनें हें काम होऊं शकतें असें माझें म्हणणें आहे. डाळिंबांतले,

दाणे वेगवेगळे असतात त्याप्रमाणें स्टेटमध्ये हि वेगवेगळीं स्टेट्स् राहूं शकतील. प्रत्येक दाणा पूर्ण स्वतंत्र असतो त्याला वेगळी वेशी असते. परंतु सर्व मिळून एक च डाळिंबाचें फळ बनतें. त्याप्रमाणें प्रत्येक गांव स्वतंत्र स्टेट होईल. अशीं असंख्य स्टेट्स् मिळून एक मोठें स्टेट बनेल. अशीं मोठीं स्टेट्स् एकत्र झालीं तर जगाचें हि एक स्टेट होऊं शकेल. अशी रचना आम्हाला ग्रामराज्याच्या साधनानें बनवायची आहे. त्यात गांवाला पूर्ण स्वतंत्रता राहील. अमुक एक दुकान आमच्या गांवीं असलें तर तें बंद करावें असें आम्ही म्हणूं शकत नाहीं. परंतु समजा, त्या दुकानदारानें बाहेरून मिठाई आणवली परंतु गांवच्या लोकांनीं ठरविलें कीं, घरांत बनविलेल्या वस्तु च खायच्या, दुकानातल्या खायच्या नाहींत, तर ती मिठाई आम्ही माशांच्याकरितां सोडून देऊं. कारण माशांनीं बाहेरील पदार्थ खायचे नाहींत असें ठरविलेलें नाहीं. मग त्या माशांच्याकरिता दुकानदाराला तें दुकान चालवायचें असेल तर तें त्यानें खुशाल चालवावें यावरून ही गोष्ट उघड आहे कीं, लोकमताच्या विरुद्ध दुकानदार दुकान चालवूं शकत नाहीं. याचें नांव आहे लोकशक्ति. या लोकशक्तीला कोणी हि अडवूं शकत नाही. त्याप्रमाणें आमचें राज्य आम्ही च चालवूं असा आत्मविश्वास लोकांमध्यें उत्पन्न झाला पाहिजे.

### जनतेनें संकल्प करावा

हा आत्मविश्वास निर्माण करण्याकरितां च ग्रामदान पाहिजे. मग ग्रामदानमूलक खादी येईल. आजपर्यंत जी खादी होती तिला ग्रामदानाच्या पायाचा आधार नव्हता. पायाशिवाय घर बांधलें तर वादळ होतां च पडून जाईल, याचा आपल्याला अनुभव आलेला आहे. आम्ही चांगला विचार हि लोकांच्या डोक्यावर लादत होतों; त्याचा जनतेनें संकल्प केला नव्हता. जनता संकल्प करते कीं, आम्ही अमुक दिवशीं दिवाळी साजरी करूं तर सर्व हिंदुस्थानभर दिवाळी साजरी होते. तसें आम्हीं केलें तर सरकारकडून त्यात कांहीं मदत मिळाली नाहीं तरी अडथळा हि होऊं शकत नाहीं.

### सरकारची मदत आपल्या अटीवर

'तुम्ही ग्रामदानी गांवाला सरकारची मदत घ्याल कीं नाहीं?' असा एका मित्रानें प्रश्न विचारला आहे. सरकारवर आमचा कांहीं बहिष्कार नाहीं. सरकार आमच्याकडून टॅक्स घेतें तो परत घ्यायला हरकत कोणती? म्हणून सरकारी मदत आम्ही घेणार च नाहीं असें नाहीं. सरकारशीं आम्हांला असहकार करायचा नाहीं. तें संपवून टाकायचें आहे. पण तें जोंपर्यंत आहे तोंपर्यंत त्याची मदत आम्ही घेऊं शकतों. पण ती आमच्या अटीवर. त्यांनीं ती अट मान्य केली नाहीं तर मदत घेणार नाहीं. गांवचें सर्वच्या सर्व काम सामूहिक इच्छाशक्तीनें होईल. हा ग्रामदानाचा मुख्य लाभ आहे. ह्या-तऱ्हेनें ग्रामदान होऊं शकतें मालकी नाहींशी होऊं शकते ही कोणाला कल्पना हि नव्हती. परंतु श्रद्धेनें पर्वत हि हलूं शकतो. सत्य वस्तु मानव-हृदयाला मान्य होईल अशी माझी श्रद्धा आहे. येथें तुम्ही काय चमत्कार ऐकत आहा? लोक आम्हांला ग्रामदानें देतात. मी कार्यकर्त्यांना सांगतों कीं, ग्रामदान ही आता जुनी गोष्ट झाली. ग्रामदानाच्या गंगेचें पाणी तर मी कोरापुटहून येथें आणलें तें च घेऊन मी बाहेर जायचें का? मला तर येथून समुद्राचें पाणी बाहेर न्यावयाचें आहे. मला 'फिरका-दान' द्या. फिरका दान होऊं शकेल असें कार्यकर्ते म्हणत आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. ज्यांना एका गावातली हि मालकी सिद्धत्वें मुष्किलीचें वाटत होतें ते च कार्यकर्ते फिरका दान होऊं शकतें असें म्हणत आहेत. सर्व सर्वोदय-विचाराचा पाया ग्रामदान आहे. त्यामुळें लोकांना केवळ सुख च मिळणार नाहीं. मला सुखाची विशेष चिंता नाहीं – आकर्षण नाहीं. सुख तर दुःखाचा भाऊ च आहे. दोघे हि जण मिळून च येतात. दिवसानंतर रात्र आणि रात्रीनंतर दिवस येतो त्याप्रमाणें सुखानंतर दुःख आणि दुःखानंतर सुख येतें. सुखाची ओरड करीत राहिल्यानें सुख मिळणार नाहीं. सुख आणि दुःख दोन्ही घेण्याची तुम्हीं तयारी ठेवली पाहिजे.

**चिंगकट्टले (मदुरा)**
२३-१२-'५६

या जिल्ह्यांत तुम्ही जेथें जाल तेथें ग्रामदानाचा विचार ऐकायला लोक उत्सुक दिसतात ही आनंदाची गोष्ट आहे. इतर जिल्ह्यांपेक्षां या जिल्ह्यांत विशेष काय आहे ? कांहीं असेल; पण मी त्याला विशेष महत्त्व देत नाहीं. वेगवेगळ्या प्रांतांतल्या लोकांची श्रद्धा मला सारखी च दिसली; पण जेथें व्यापारी वगैरे असतील, संपत्तीमुळें स्पर्धा असेल, अशा ठिकाणचें वातावरण कांहींसें निराळें असतें; पण अशा ठिकाणीं देखील मला कमी श्रद्धा दिसली नाहीं.

## ग्रामदानाविषयीं सर्व पक्षांची सहानुभूति

या ठिकाणीं ग्रामदानाचें वातावरण निर्माण झालें आहे. सर्व पक्षांच्या लोकांचें याविषयीं एकमत आहे हें एक कारण आहे. मी आतां मदुरा शहरीं जाणार आहें. तेथें एक स्वागतसमिति बनली आहे. मदुरा हें फार जुनें शहर आहे. तेथें धार्मिक आणि भक्तीचे संस्कार आहेत. त्या ठिकाणीं माझ्या स्वागताकरितां भूदान आणि संपत्तिदानाला उत्तेजन देण्याकरितां एक सभा झाली. त्या सभेमध्ये जी घटना घडली तसा अनुभव मद्रास राज्यांत दुसरीकडे कोठें आला नाहीं. आतां निवडणुका जवळ आल्या आहेत; म्हणून वेगवेगळ्या पक्षात कटकटी आहेत. परंतु या संस्थेंत एका प्लॅटफॉर्मवर सर्व पक्षांचे लोक आले. कॉंग्रेस, कम्युनिस्ट, प्रजासमाजवादी, द्रवीण मुन्नेत्रकळहम् आणि विधायक कार्यकर्ते; सर्व पक्षांच्या लोकांनीं या कामाला उत्तेजन देण्याची घोषणा केली. कम्युनिस्ट हि नवीन च गोष्ट बोलले. भूदान-यज्ञाचा विचार सुरू झाला. त्या विचाराला कम्युनिस्टांची सहानुभूति च मिळाली; परंतु ग्रामदानाचा विचार सुरू झाल्यापासून ते माझ्याशीं पूर्ण सहमत झाले आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. साडेपांच वर्षांपूर्वी तेलंगणा-मध्यें मी त्यांना म्हणालों होतों कीं, तुम्ही लोकाना रात्रीं कां लुटतां ? माझ्यासारखें दिवसा लुटायला या. त्या काळीं कम्युनिस्ट लोक जंगलांत

लपून राहात आणि रात्रीं गांवावर हल्ले करीत. त्यांच्याविरुद्ध सरकारी सैन्य उभें होतें. या दोन्हींच्यामध्यें भूदानयज्ञ चालला होता. मीं दोन्ही पक्षांचे दोष स्पष्टपणें जाहीर केले. 'कम्युनिस्ट कांहीं जंगलांतले वाघ नाहींत, कीं ते शिकार करून नष्ट होतील विचारानें च त्यांचें समाधान केलें पाहिजे ही गोष्ट मी सरकारला आणि त्यांच्या शिपायांना सांगितली. आणि कम्युनिस्टांना सांगितलें कीं, तुम्ही मजबरोबर या आणि दिवसा कसें लुटायचें तें शिका. त्या वेळीं त्यांचा मजवर विश्वास बसला नाहीं. मी बड्या लोकांचा एजंट आहें आणि कम्युनिस्टांची चळवळ दाबण्याकरितां फिरत आहें असें त्यांना वाटत होतें. नंतर ओरिसामध्यें माझ्याशीं त्यांची पुन्हां मुलाखत झाली तेव्हां त्यांनीं माझें म्हणणें मान्य केलें. त्यापूर्वीं उत्तरप्रदेश आणि बिहारमध्यें हि कम्युनिस्ट मला भेटले होते, तेव्हां हि त्यांचा माझ्या कामावर विश्वास नव्हता.

या आंदोलनाची सुरुवात केवळ एका व्यक्तीपासून झाली ही गोष्ट लक्षात घ्या. कोणी एखादी व्यक्ति असला प्रश्न हातीं घेऊन तो सोडवूं शकत नाहीं म्हणून त्याला सर्वांची सहानुभूति मिळवणें ही च त्याची शक्ति आहे. भूदानयज्ञ आंदोलन अशा पद्धतीनें चाललें कीं, ज्यांत कोणा पक्षाकडून चुका झाल्या नाहींत आणि त्याला सर्व पक्षांची सहानुभूति मिळाली असें इतिहासांत नमूद केलें जाईल. परंतु सर्वांना एकत्र आणण्यांत तामिळनाड-मध्यें मदुरा जिल्ह्यांत सर्वांत यश मिळालें. हें कार्य सर्वांना पसंत आहे म्हणून सर्व पक्ष एकत्र आणण्यात मी यशस्वी झालों. परंतु ज्या ठिकाणीं एका च पक्षामध्यें अंतर्गत गट असतात आणि ते एकमेकांचे वांकडें पहात असतात अशा ठिकाणीं सर्व पक्षांना एके ठिकाणीं आणण्यांत मला यश मिळालें नाहीं. कारण जेथें आपसांतल्या मत्सरामुळे च विरोध होतो तेथें सार्वजनिक कामामध्यें अडचणी उत्पन्न होतात. येथलें वातावरण चांगलें आहे ही आनंदाची गोष्ट आहे.

**संपत्तिदानाचा प्रवाह वहात रहावा**

१ जानेवारी पासून सर्व भूदानसमित्या बंद होणार आहेत आणि तें काम तामिळनाडमध्यें आधीं च सुरू झालें आहे हें तुम्हांस माहीत आहे. माझ्याशीं

संबंध ठेवण्याकरितां एक एक जिल्ह्यांत एक एक निर्गुण निराकार मनुष्य निवडला आहे. त्यानें वेगवेगळ्या पक्षांतील लोकांशीं संबंध ठेवावा आणि त्यांच्यामागें कामाचा तगादा करावा एवढें च त्याचें काम राहील. भूदान आणि ग्रामदानी गावांना मदत करण्याकरितां संपत्तिदानाचा प्रवाह वाहूं लागला आहे ही आनंदाची गोष्ट आहे. यापूर्वी मीं संपत्तिदानावर विशेष जोर दिलेला नव्हता तामिळनाडमध्यें च त्यावर जोर देणें सुरू केलें आहे. मला येथें भूदान, ग्रामदान एवढें च नको आहे तर ग्रामदानाच्या पायावर ग्रामराज्य बनवायचें आहे म्हणून या ठिकाणीं ग्रामदानाच्या जोडीला आणखी तीन गोष्टींची जोड दिली आहे. ग्रामदानाबरोबर ग्रामोद्योग हि येतील आणि त्यांत खादी प्रमुख असेल. त्याप्रमाणें च शिक्षण चालेल आणि जातिभेदनिरसनाचें हि काम चालेल याप्रमाणें येथें ग्रामराज्याचें संपूर्ण चित्र आम्ही उभें करूं इच्छितो. संपत्तिदानाचा धारा जोरानें वाहील तर च हें काम होईल.

### बाहेरच्या मदतीपासून धोका

ठिकठिकाणीं कार्यकर्ते संपत्तिदान मिळविण्याची खटपट करीत आहेत. परंतु ग्रामदानी गांवांच्या लोकांना एक गोष्ट मी मुद्दाम समजावून देऊं इच्छितों. तुम्हांला बाहेरून मदत देण्याचा आम्ही प्रयत्न करीत आहों. पण मी त्याला फार महत्त्व देत नाहीं. गांवांतल्या लोकांनीं मिळून गावात स्वराज्य स्थापन करावें ही च ग्रामदानाच्या वैभवाची गोष्ट आहे. म्हणून च मला ग्रामदानांत एक भय वाटतें असें मी नेहमीं म्हणत असतों. ग्रामदानांतल्या गावाना कशी मदत करावी याचा मद्रास सरकार विचार करीत आहे. सरकार हा विचार करीत आहे ही आनंदाची गोष्ट आहे. तें त्याचें कर्तव्य हि आहे. आपल्या राज्यांत शेंकडों ग्रामदानें मिळत आहेत. जमिनीची मालकी नष्ट होत आहे, अशा वेळीं सरकार उदासीन राहूं शकत नाहीं. एक तर त्याला विरोध करावा नाहीं तर समर्थन करावें हें सरकारचें कर्तव्य होईल. भांडवलशाही सरकार त्याला विरोध करील. थोड्या लोकांच्या हातीं जमीन असणें चांगलें असें जे समजतात, व्यक्तिगत मालकीला जे फार महत्त्व देतात, अशा सरकारला ग्रामदान धोक्याचें वाटेल.

पण आमचें सरकार समाजवादी रचना बनविण्याचा दावा करीत आहे. समाजवादाचा अर्थ सरकार किंवा काँग्रेस काय करतें हें मला माहीत नाहीं. कारण समाजवादाचे शेंकडो अर्थ आहेत. परंतु कोणता हि अर्थ घेतला तरी तो ग्रामदानाच्या विरुद्ध जाऊं शकत नाही. म्हणून अशा सरकारला ग्रामदानाकडे उपेक्षावृत्ति ठेवतां येणार नाहीं. त्याला कांहीं ना कांहीं मदत देण्याची वृत्ति ठेवली पाहिजे आणि त्याप्रमाणें सरकार ठेवीत आहे ही आनंदाची गोष्ट आहे.

परंतु आतां आपल्याला वरून खूप मदत मिळणार आहे असें गांवचे लोक जर समजूं लागतील तर त्यांत धोका आहे. आकाशांतून परमेश्वर पाऊस पाडतो. पण तुम्हीं जर शेतांत मेहनत केली नाहीं तर त्या पावसाचा कांहीं उपयोग नाहीं ही गोष्ट तुम्हीं लक्षांत ठेवली पाहिजे लोक मेहनत-मशागत करतात, बीं पेरतात, तेव्हां पावसाचा उपयोग होतो. मेहनत केली नाहीं आणि पाऊस पडला तर त्यानें शेतात नुसतें गवत वाढेल. पाऊस पडण्यापूर्वी शेतकरी सर्व तयारी करून ठेवतो तेव्हां च पीक येतें. शेतकऱ्यानें काम केलें नाहीं तर स्वतः परमेश्वर हि त्याला कांहीं मदत करूं शकत नाहीं. म्हणून आम्ही जर काम करणार नाहीं तर बाहेरची संपत्ति-दानांतील, सरकारची किंवा दुसऱ्या कोणा सज्जनांची मदत आपल्याला मिळणार नाहीं. ह्या गोष्टीची स्पष्ट जाणीव तुम्हांला करून देणें मला आवश्यक वाटलें.

### जग सरकाररूपी रोगानें पिडलें आहे

माझ्या मनांत आणखी एक गोष्ट आहे ती मी तुमच्यापुढें मांडूं इच्छितो. कारण या माझ्या अल्प आयुष्यांत मी माझे विचार लपवून ठेवूं इच्छीत नाहीं. मन मोकळें करून सांगणार आहें. सर्व जगाला च सरकारपासून मुक्ति मिळावी हा माझा मुख्य विचार आहे. म्हणून तुम्ही जर सरकारी मदतीवर अवलंबून रहाल तर ही गोष्ट साधणार नाहीं आज सर्व जग कोणत्या रोगानें पिडलें असेल तर तें या सरकाररूपी रोगानें. आज रामनामाची जागा सरकार या नांवानें घेतली आहे. १९४७ पासून आम्ही

अधिक गुलाम बनलों आहों. पूर्वी सरकारकडून आपल्याला कांहीं मदत मिळणार नाहीं हें लोकांना ठाऊक होतें. जे कांहीं करायचे असेल तें आपण च केलें पाहिजे. स्वराज्यप्राप्तीनंतर हे लोक आपणांला मदत मिळणार च असें समजूं लागले आहेत. असें समजून हे जर पूर्वीच्या दसपट काम करतील तर हिंदुस्थानची खूप प्रगति होईल. परंतु लोक हल्लीं उलट च समजतात. आपल्याला कांहीं करायचें नाहीं. जें काय करायचें तें सरकार करील असें ते समजतात. इंग्रजी राज्यांत आकाशांतून पाऊस पडत असे. आता हि केवळ तो तसा च पडेल. त्यांत विशेष तें काय झालें, असें लोक विचारतात. आता स्वराज्य आलें आहे तेव्हा मृग नक्षत्र लागल्यावर आकाशातून कपड्यांचा पाऊस पडेल, आर्द्रा नक्षत्रावर केळ्यांचा पडेल आणि पुनर्वसु नक्षत्रीं सर्व तऱ्हेच्या धान्याचा. ते म्हणतात कीं, "स्वराज्यापूर्वी आम्हाला काम करावें लागत होते, आणि आता हि जर करावें लागलें तर आम्हाला सुख काहीं मिळालें नाहीं." मी विचारतो कीं, स्वराज्यानंतर तुम्हीं कांहीं त्याग केला आहे का ? त्यापूर्वी तुम्ही आपसांत नटेखटे करीत होता. ते आता सोडलेत का ? पूर्वी खोटें बोलत होता ते आता सोडलें का ? तुम्हीं जर आपले दुर्गुण सोडले नाहींत तर परिस्थितींत काय फरक पडेल ?

### स्वराज्यानंतर त्यागाची जरूरी

स्वराज्य मिळालें तें परिस्थितीमुळे असो, गांधीजींच्या चळवळीनें असो, किंवा सुकीमुळें असो असें समजा, कारण लंका आणि ब्रह्मदेश यांना जें स्वराज्य मिळालें तें मिळवायला त्यांना कोणता मोठा प्रयत्न करावा लागला ? म्हणून आम्हीं कांहीं मोठा पराक्रम केला म्हणून आम्हाला स्वराज्य मिळालें या भ्रमात राहू नका. आम्हीं सुरुवातीला इतका पराक्रम केला, कीं एकमेकांचे गळे कापले, हिंदु, मुसलमान, शिख इत्यादि लोकांमध्यें तंटे चालले, तो मोठा पराक्रम झाला. शेवटीं गांधींना सांगावें लागलें कीं, लोकांनीं अहिंसेचें पालन केलें. ती शूरांची अहिंसा नव्हती, लाचाराची होती. ही शूरांची अहिंसा असती तर ३१ सालात च आपणाला सर्व भारतांत चमत्कार दिसला असता. पण म्हणून आपण निराश होऊं नये. यापुढें आपलें कर्तव्य

काय आहे हें समजून घेतलें पाहिजे. गांवोगांवच्या लोकांनीं आपल्या पायांवर उभें रहावें. त्यागाचें प्रमाण वाढवावें. आपल्या गांवाकरितां त्याग करणें जरूर आहे असें समजावें. हे सारे गुण गांवोगांवीं आले पाहिजेत आणि गांवांना आपल्या शक्तीचें भान झालें पाहिजे.

**आरशांत आपलें च प्रतिबिंब दिसतें**

सरकारामुळें च आम्ही वांचलों आहों. सरकार नसतें तर आमचें संरक्षण झालें नसतें असा नाहक भ्रम आज सर्व जगांत उत्पन्न झाला आहे. आज च मीं ऐकलें कीं, जपान सेना ठेवण्याचा विचार करीत आहे; पण तेथल्या लोकांना ती गोष्ट पसत नाहीं. पाकिस्तान सरकारनें 'युद्ध करार' केला तो तेथल्या जनतेला पसंत नाहीं. ही गोष्ट पाकिस्तानमधले मित्र मला भेटले तेव्हा त्यांनीं सांगितली. तिकडे फ्रान्समधले सरकार फ्रेंच लोकांना २–४ महिन्यांपेक्षा जास्त टिकलेलें पसंत होत नाहीं. वर्षांत ३–४ वेळा सरकार बदलतें. तरी हि सरकाराशिवाय आमचें चालणार नाहीं हा लोकांचा भ्रम कायम च आहे! लोकांचें शेतीशिवाय चालणार नाहीं, उद्योगाशिवाय चालणार नाहीं, प्रेमभावाशिवाय किंवा धर्माशिवाय चालणार नाहीं, हें मी समजू शकतों. लग्नाच्या विधीशिवाय, कुटुम्बव्यवस्थेशिवाय लोकांचें चालणार नाहीं हें मला समजतें; परंतु असल्या आवश्यक गोष्टींमध्यें मीं सरकारची गणना करीत नाहीं.

वस्तुतः जनतेला सरकारची कांहीं जरूरी नाहीं. ती तर सामाजिक प्रवाहानें बनलेली एक वस्तु आहे. समाजामध्यें एकरसता निर्माण करण्यांत आम्हाला यश मिळालें नाहीं. समाजांत अनेक प्रकारचे भेद पडले. अविरोधानें काम करण्याचें पूर्ण शिक्षण आम्हाला मिळालें नाहीं. त्या-ऐवजीं राजसत्तेकडून तीं कामें आम्ही करून घेऊं इच्छीत आहोत. लोकांना शिक्षित करून जें काम होऊं शकतें तें आम्ही दंडशक्तीनें करूं पहात आहोंत. प्रत्येक सरकार शिक्षणाकरिता जेवढा खर्च करतें त्यापेक्षां किती-तरी पट सैन्यावर करतें. पाकिस्तान सरकार म्हणतें कीं, हिंदुस्थानकडून आपल्याला भय आहे. म्हणून आम्हांला शस्त्रास्त्रें वाढवावीं लागतात, त्यावर खर्च करावा लागतो. हिंदुस्थान सरकार म्हणतें कीं, पाकिस्तानचें लक्ष्य

चांगलें दिसत नाहीं, म्हणून आम्हांला सैन्यावर जोर द्यावा लागतो. तिकडे रशिया म्हणतो कीं, अमेरिकेचें लक्षण ठीक दिसत नाही, म्हणून आम्हांला शस्त्रास्त्रें वाढवावीं लागत आहेत. अमेरिका हि रशियासंबंधीं तें च म्हणते. मग खरें कारण कोणतें ? पाकिस्तानाच्या भीतीनें हिंदुस्थानला भय वाटतें कीं हिंदुस्थानच्या भीतीनें पाकिस्तानला आपलें प्रतिबिंब च आरशामध्ये दिसतें ? आपल्यासमोरचा माणूस तलवार घेऊन उभा आहे त्याचें आम्हाला भय वाटतें. म्हणून आम्ही आमची तलवार घट्ट पकडून धरतों. त्या आरशातलें प्रतिबिंब हि असं च करतें. समोर जें चित्र आहे तें आपलें प्रतिबिंब आहे हें ओळखायला आपण शिकलें पाहिजे. हिंदुस्थानने जर कमींत कमी सैन्य ठेवण्याची हिंमत केली तर मला वाटतें कीं, सर्व दुनियेमध्यें नैतिक शक्ति प्रकट होईल.

साराश, जगांतले सर्व लोक जोंपर्यंत आपआपल्या सरकारांना डोक्यावर घेऊन बसले आहेत तोंपर्यंत हे काम होणार नाहीं कारण आज कांहीं थोड्या मूटभर लोकांना असें वाटत असतें कीं, कोट्यवधि लोकांची जबाबदारी आमच्यावर आहे, आणि ते कोट्यवधि लोक हि समजतात कीं, हे थोडे लोक आमचें रक्षण करत आहेत. म्हणून त्यांच्या चित्तात भीति असते. मनांत भय असलें म्हणजे त्याला सेना एवढा च आधार वाटतो. आणि सैन्यावर जितका भार राहील तितकें च भय हि वाढतें.

### मनुष्याला स्वजातीची भीति

आपल्या जातीच्या लोकांच्या भीतीनें शस्त्रास्त्रें बनवावीं लागतात असा जगांत कोणी प्राणी नाहीं. मुंग्या एक लहानसा जीव आहे. परंतु त्या मिळून काम करतात आणि मोठमोठीं घरें बनवितात. त्यांना स्वजातीचें भय वाटत नाहीं. जंगलामध्ये एखादा हरण दुसऱ्या हरणाशीं लढतो परंतु एक हरणाची जात दुसऱ्या हरणाच्या जातीला भीत आहे व त्याकरितां शस्त्रास्त्रें बनवीत आहे असें कोठें पाहायला मिळत नाहीं. एका काळीं पृथ्वीवर पुष्कळ जंगल होतें. म्हणून तेव्हा जगली जनावराची माणसाला भीति वाटे. त्यांच्याशीं मुकाबला करण्याकरिता माणसाने धनुष्य-बाण आणि तलवार यांचा उपयोग केला त्यांत शेवटीं मनुष्याचा जय झाला. आतां ते बिचारे

जंगली प्राणी माणसाच्या दयेवर जंगलांत सुरक्षित आहेत. पण आज मानव च माणसाच्या भीतीनें मोठमोठीं भयानक शस्त्रें बनवीत आहे ही मोठी अजब गोष्ट आहे.

## सुधारलेले देश हि भयभीत

एखाद्या देशांतले शेतकरी दुसऱ्या देशांतल्या शेतकऱ्यांवर हल्ला करायला चालले आहेत असें दिसत नाहीं. ते जमिनीच्या शोधार्थ देशादेशांत जातील; परंतु एक शेतकरी उठून दुसऱ्या देशावर हल्ला करील असें कधीं होत नाहीं. मग पाकिस्तानचें हिंदुस्थानला आणि हिंदुस्थानचें पाकिस्तानला कां भय वाटावें ? जपानचें चीनला आणि चीनचें जपानला कसलें भय आहे ? भय आहे; पण तें एका देशांतल्या पुढाऱ्यांना दुसऱ्या देशांतल्या पुढाऱ्यांचें. या देशांतल्या महत्त्वाकांक्षी लोकांना त्या देशांतल्या महत्त्वाकांक्षी लोकांचें भय वाटतें, आणि तें भय आपल्या देशांतील जनतेला ते दाखवितात. मग जनता हि म्हणूं लागते कीं, आमचें संरक्षण हि झालें पाहिजे. सर्व जगांत च असा एक भ्रम उत्पन्न झालेला आहे. त्यामुळें लोक लाचार बनून गेले आहेत. केवळ शिक्षणानें म्हणजे लिहायला वाचायला आल्यामुळें हा रोग दूर होणारा नाहीं. हिंदुस्थान एक अशिक्षित देश आहे पण जपान, जर्मनी, इंग्लंड तर शिक्षित देश आहेत. तरी हि तेथल्या जनतेमध्यें भयाची पूर्ण छाया पडलेली आहे.

## सरकारमुळें च आम्ही सर्व असुरक्षित

लोकशाहीचा सर्वांत मोठा दोष हा आहे कीं, आमचा सर्व आधार एक मूठभर लोकांच्यावर च राहतो. त्यांत लोक आपलें जीवन आपल्या हातांत राखीत नाहींत. कांहीं लोकांच्या हातीं सत्ता दिली जाते आणि ते लोक आमचें संरक्षण करतील अशी आशा राखली जाते. यांत लोकमताचा कांहीं प्रश्न उद्‌भवत नाहीं. प्रमुख व्यक्तींच्या अकलेनुसार काम चालतें ही अत्यंत शोचनीय गोष्ट आहे. आज काँग्रेसचें सरकार आहे. केव्हां दुसऱ्या पक्षाचें होईल. दुसऱ्या देशांत हि वेगळीं सरकारें आहेत. या सरकारांविषयीं माझ्या

मनांत यांही आकर्षण नाही. एखाद्या विशिष्ट सरकाराविषयी नव्हे तर एकूण एक सरकाराविषयी माझा विरोध आहे. ही सरकाररूपी सत्ता जोंपर्यंत आपल्या डोक्यावर राहात राहू आणि त्यामुळें च आपण सुरक्षित आहों असें मानूं तोंपर्यंत आपण अत्यंत असुरक्षित आहों असें मला वाटतें.

## चांगल्या राज्याची भीति

जेव्हां पाकिस्तानचा अमेरिकेशीं शस्त्रकरार झाला त्या वेळीं पं. नेहरूंनी देशाला संभाळून घेतलें आणि म्हटलें कीं, *"हिंदुस्थानानें यामुळें भयग्रस्त होऊं नये."* पण या उलट ही एक भीतिदायक गोष्ट आहे. सर्वांनी या वेळीं लष्करांत भरती झालें पाहिजे असें ते म्हणाले असते तर हिंदुस्थानची दृष्टि न बदलली असती. परंतु एका मनुष्याच्या अकलेमुळें देशाचें संरक्षण व्हावें ही गोष्ट मला बरी वाटत नाही. मला दुर्जन राज्यकर्त्यांच्या वाईट राज्याचें इतकें भय वाटत नाही जितकें सज्जन राज्याच्या चांगल्या राजाचें भय वाटतें. कारण जेथें राज्य चांगलें चालतें तेथें राज्यांतून मुक्त होण्याची गोष्ट लोकांना सुचत नाही. आज राज्य चांगलें असलें तर उद्यां वाईट येईल. म्हणून लोक आपल्या शक्तीनें, स्वावलंबनानें राजसत्तेतून मुक्त होत नाहीत तोंपर्यंत ही आपत्ति टळण्यासारखी नाही.

## आत्मावलंबन

म्हणून ग्रामदानामध्यें सरकारकडून आणि बाहेरून हि जी मदत मिळेल ती आम्ही जरूर घेऊं. *परंतु ग्रामदानी लोकांनी आपलें आत्मबल च वाढवावें.* आत्मबलाचें शिक्षण प्रत्येक मुलाला मिळावें. जोंपर्यंत आपण एका देहांत च बांधलेले राहू तोंपर्यंत आत्मबल वाढणार नाही. ग्रामदानामुळें आत्मज्ञान वाढलें पाहिजे. मी म्हणजे हा एक लहानसा देह नव्हे. हे दोन-चार मुलगे एवढे च कांहीं माझे मुलगे नाहीत. सर्व गाव, सर्व जग माझें च रूप आहे. जितके मुलगे आहेत ते सर्व माझे च आहेत. सर्व लोक माझे च भाऊ आहेत असें व्यापक आत्मज्ञान झालें पाहिजे. जोंपर्यंत संकुचित देहबुद्धि राहील तोंपर्यंत आपण भयमुक्त होणार नाही. आपण देहाहून भिन्न आहों हें शिक्षण लोकांना मिळालें पाहिजे. ग्रामदानानें लोकांना

हें शिक्षण मिळेल. मालकी आमची नाहीं, परमेश्वराची आहे, ही गोष्ट ग्रामदानी लोकांना समजते. जमीन, हवा, पाणी वगैरे देणग्या परमेश्वराच्या आहेत. त्या केवळ आमच्याकरितां नाहींत, त्या सर्वांसाठीं आहेत. आम्ही आपली सर्व शक्ति समाजाला अर्पण करतों म्हणून आम्हांला ग्रामदानाची किंमत वाटते. सर्व लोकांनीं हा विचार समजून घेतला पाहिजे.

**ग्रामदान म्हणजे ग्रामस्वावलंबन**

आम्हीं ग्रामदान केलें, आता आम्हांला बाहेरून काय मदत मिळेल, अशा तऱ्हेने विचार करूं नका. आता ग्रामदान आपण केलें आहे, आतां आपण पुढें काय करायचे, याचा च विचार करा. आम्ही च करणारे आहों. आपल्याला जें वाटेल तें आपण करूं शकूं. परमेश्वराच्या सृष्टींत कर्माचें फळ मिळत च राहतें. आपण बाभळीचें बीं पेरलें तर आपल्याला आंबे मिळणार नाहींत. आंब्याची कोय लावली तर बाभळीचें झाड उगवणार नाहीं. हा ईश्वरसृष्टीचा नियम आहे. म्हणून आपण चांगलें काम करून गांवाला चांगलें बनवूं.

आम्हीं ग्रामदान केलें आहे तेव्हा बाहेरच्या लोकांनीं आम्हांला मदत करावी अशी अपेक्षा राखूं नका आपल्याकरिता दुसऱ्यानें काय म्हणून मदत द्यायची ? आपण च आपल्याला मदत करायची आहे. तुमचें पाहून दुसरे लोक हि अनुकरण करतील. पाच लाख हि गावें ग्रामदानी झालीं तर हीं सर्व गावे सरकारकडे च मदत मागतील का ? जी तुमच्याजवळ नाहीं अशी कोणती वस्तु सरकारजवळ आहे ? एकेका गावापेक्षा सरकारची शक्ति अधिक आहे. परंतु पाच लाख गांवांमध्ये जेवढी शक्ति आहे तेवढी शक्ति सरकारजवळ नाहीं. ग्रामदानें होतील तर पांच लाख हि गावांत होतील. परमेश्वरानें तुम्हाला च तेवढी अक्कल दिलेली आहे म्हणून तुम्हीं ग्रामदान केलें आणि दुसऱ्याना तितकी अक्कल नाहीं असें समजूं नका. ही गोष्ट पांच लाख गांवांना हि सुचेल. म्हणून ग्रामदान म्हणजे आत्मावलंबन आहे ही गोष्ट लक्षात ठेवा.

**पेरियुर** ( मदुरा )
२४-१२-'५६

(जवळच्या गावचे पुढारी आणि कल्लुपटी आश्रमांत ग्रामसेवकांचें ट्रेनिंग घेणारे विद्यार्थी यांच्यासमोर दिलेलें प्रवचन)

## 'सर्वोदय' शब्द सोडण्यामध्यें चूक

स्वराज्यप्राप्तीनंतर सर्वांत प्रथम करण्याची कोणती गोष्ट असेल तर ती शिक्षण देऊन सेवक तयार करणें ही आहे. त्यापूर्वी सेवकांचें मुख्य काम परकीय सत्ता दूर करून स्वराज्य प्राप्त करणें हें होतें. त्याकरितां विशेष शिक्षणाची जरूरी नव्हती. अंतःकरणांत भावना उत्पन्न झाली म्हणजे पुरे होतें. परंतु स्वराज्यप्राप्तीनंतर लोकांच्यापुढें 'सर्वोदयमंदीर' उभारण्याचा विशाल कार्यक्रम आला.

सर्वोदय शब्द बहुतेक लोकांना मान्य आहे. परंतु तो शब्द फार उच्च आहे असें म्हणून तो टाळण्याचा च लोक प्रयत्न करतात. तें ध्येय आपल्याला साधायचें नाहीं म्हणून 'समाजवादी समाजरचना' हा शब्द चांगला असे ते म्हणतात. परंतु हा असला गुळमुळीत शब्द आहे कीं, त्यांतून शेंकडों अर्थ होतात. त्याचा उपयोग करणें आणि न करणें सारखें च आहे. 'समाजवादी समाजरचना' आम्हांला मान्य आहे असें भांडवलवाले हि म्हणत आहेत. म्हणून या शब्दानें हिंदुस्थानचें कांहीं भलें होईल अशी गोष्ट नाहीं. 'समाजवादी समाजरचने' मध्यें व्यक्ति आणि समाज यांच्यामध्यें विरोध आहे असें मानलें जातें. हल्लीं यूरोपमध्यें 'उत्पादन वाढवा आणि लोकांना सुखी करा' एवढ्या गोष्टींत च समाजवाद संपून जातो. परंतु केवळ थोडेसे धंदे सरकारी बनविले आणि त्यांवर सरकारी सत्ता स्थापन केली म्हणजे 'जनशक्ति' निर्माण होते असें नाहीं. उत्पादन वाढवणें आणि लोकांची आजच्यापेक्षां समृद्धि वाढविण्याचा प्रयत्न करणें यामुळें जनशक्ति उत्पन्न होत नाहीं. उत्पादन वाढवणें आणि सर्वांना सुखी करणें हा विचार भांडवलवाल्यांना हि मान्य आहे. त्यांना 'साम्ययोग' कबूल नाहीं. पण

'सर्व लोक सुखी व्हावे' हें त्यांना पसंत आहे. म्हणजे सर्वांनीं सुख सारखें असावें हें त्यांना मान्य नाहीं; पण सर्व सुखी असावे हें त्यांना कबूल आहे.

म्हणून 'वेल्फेअर स्टेट' (कल्याणकारी राज्य) हें जनशक्ति वाढविणारी वस्तु नाहीं. अाह्दर्प आणि कृष्णदेवराय यांचें राज्य वेल्फेअर स्टेट होतें असें मी समजतों. परंतु त्याच्या राज्यांत जनतेची शक्ति वाढली नाहीं. अकबर गेला आणि औरंगजेब आला तेव्हां लोकांची स्थिति वाईट होऊं लागली. अकबराचे राज्यांत ती चांगली होती; पण जनतेमध्यें शक्ति निर्माण झाली असती तर लोकांची परिस्थिति नेहमीं च चांगली राहिली असती. ती च स्थिति तुम्या राज्यामध्यें चांगली होऊं शकणें नाहीं. भांडवलशाही राज्यव्यवस्थेंत किंवा हल्लींच्या युरोपियन समाजवादी समाजरचनेंत हि चांगलें होणार नाहीं, ही गोष्ट आधुनिक लेखक हि कबूल करतात. म्हणून 'वेल्फेअर स्टेट' किंवा समाजवादी समाजरचना म्हणल्यामुळें आमच्या कार्यक्रमावर विशेष काहीं प्रकाश पडूं शकता असें नाहीं. म्हणून 'सर्वोदय' नांवाचा जो सुंदर शब्द आपल्या संस्कृतींतून निर्माण झाला आहे तो आपण पसंत केला पाहिजे. तो शब्द सुंदर आहे असें मान्य करून हि तें ध्येय आपण कदाचित् गाठूं शकणार नाहीं या भयानें नम्रपणें तो न वापरणें चूक आहे असें मला वाटतें.

### लक्ष्यबिंदूंचें भान आणि स्थानबिंदूंचें ज्ञान

आम्ही मुक्तीचा प्रयत्न करीत आहों. आम्ही मुक्तिवादी आहों असा आमचा धर्म सांगतो. आम्ही मोक्षापासून फार दूर आहों पण जेव्हां ध्येयाची गोष्ट बोलली जाते तेव्हां मोक्षापेक्षां लहान ध्येयाची गोष्ट आम्ही करीत नाहीं. सर्व धर्मांचे लोक साल्व्हेशन (मुक्ति) शब्दाचा उपयोग करतात. पण त्या शब्दापासून आम्ही अत्यंत दूर आहों. परंतु तो शब्द वापरल्याशिवाय आम्हांला समाधान होत नाहीं. आज आपण जेथें आहों तो आमचा स्थानबिंदु आहे. परंतु आपल्याला शेवटीं जेथें जायचें आहे तो आमचा लक्ष्यबिंदु आहे. दोन्ही बिंदू निश्चित आहेत दोन बिंदू ठरले म्हणजे रस्ता बनतो. आज आपण कोठें आहों, आपली स्थिति काय आहे, याचें स्पष्ट ज्ञान मनुष्याला असलें पाहिजे आणि शेवटीं आपल्याला कोठें

जायचें आहे, आमचें लक्ष्य काय आहे, याचें भान हि असलें पाहिजे. आपण प्रयत्न केला तर आजच्या स्थितीचें ज्ञान आपल्याला होऊं शकेल. परंतु किती हि प्रयत्न केला तरी अंतिम ध्येयाचें पूर्ण ज्ञान आपल्याला होऊं शकत नाहीं. परंतु त्याचें कांहीं भान तर असलें पाहिजे. कोणत्या हि धर्माच्या मनुष्याला तुला कोठें जायचें आहे, तुझें ध्येय काय आहे, असें विचारलें तर 'परमात्मदर्शन किंवा मोक्ष' असें उत्तर मिळतें. परंतु त्याला मोक्षाची व्याख्या कर म्हणून सांगितलें तर तो तीं करू शकत नाहीं. तरी हि मोक्षाची भावना त्याच्यासमोर स्पष्ट असते. मोक्ष काय नाहीं हे तो सांगूं शकेल, परंतु काय आहे हें तो सांगूं शकणार नाहीं. तो म्हणेल, 'माझ्यात अनंत विकार भरलेले आहेत. जेथें असे विकार नाहींत तेथें मला जायचें आहे.' त्याकरितां 'ईश्वरदर्शन', 'मुक्ति', 'साल्व्हेशन', 'परफेक्शन', 'पूर्णता' असले वेगवेगळे शब्द आम्ही वापरतों. पण ती वस्तु काय आहे हें आम्ही सांगूं शकत नाहीं. ती काय नाहीं हें आम्ही सांगूं शकतों. परंतु ती कांहीं तरी आहे एवढें आम्ही जाणतों. याला आपण 'भान' म्हणतों.

### शिव आणि शक्ति वेगळ्या नसाव्यात

आपल्याला सर्वोदयाचें स्पष्ट भान असलें पाहिजे. आपण तो शब्द कधीं सोडूं नये. जे तो टाकून देतील ते एक मोठें रत्न गमावतील. त्याचा परिणाम म्हणून आज देशाच्या सेवकांमध्यें विकल्प उत्पन्न झालेला आहे. आज एक अजब असें दृश्य दिसत आहे. एका बाजूला सर्व रचनात्मक कार्यकर्ते एकत्र झाले आहेत. त्यांत कोणी कॉंग्रेसवाले आहेत, कोणी प्रजा-समाजवादी आहेत, कोणी दुसऱ्या कोणत्या पक्षाचे आहेत, तर कोणी कोणत्या च पक्षाचे नाहींत. परंतु सर्वांच्या मनांत सर्वोदयाबद्दल आदर आहे. परंतु दुसरे कांहीं लोक कोणत्या ना कोणत्या कारणामुळें हा शब्द टाळूं पहात आहेत. या कारणामुळें देशांत शक्ति उत्पन्न होत नाहीं.

'तिरुवाचकम्'मध्यें लिहिलें आहे कीं, 'शक्ति तुझें रूप आहे आणि तूंच शक्ति आहेस.' याप्रमाणें जेव्हां शिव आणि शक्ति एक होऊन जातात तेव्हां भक्ताचें रक्षण होतें. सर्वोदय 'शिव' आहे आणि ज्याला तुम्ही

राजसत्ता म्हणतां ती ' शक्ति ' आहे. जेव्हां शक्ति शिवापासून बाजूला पडते तेव्हां ती क्षीण होते आणि शक्तीपासून शिव बाजूस पडतो तेव्हां तो वैराग्यवान असतो च. त्याचें वैराग्य कोणी काढून घेऊं शकत नाहीं. पण त्याच्याशीं जेव्हां शक्ति जोडली जाते तेव्हां वैभव प्रकट होतें.

परंतु आज लोकांनीं समाजरचना करण्याची सत्ता ज्यांच्याकडे सोपवली आहे ते लोक आणि ज्यांना समाजसेवेची तीव्र भावना आहे असे लोक ह्या दोघांमध्यें भेद उत्पन्न झाला आहे. याप्रमाणें देशांत दोन विभाग पडले आहेत. या दोघांनी एक व्हावें असा माझा प्रयत्न आहे. दोघांनीं एक व्हावें असा त्यांचा हि प्रयत्न आहे. सर्वांनीं आमच्या पक्षांत यावें असे त्यांना वाटतें. अशा तऱ्हेनें आम्ही एकमेकांला खाऊन टाकूं पाहात आहोंत; पण आम्ही च त्याला खाऊन टाकूं असा विश्वास मला आहे. कारण शक्ति जड वस्तु आहे आणि शिव चेतन आहे. तो जेथें जातो तेथें हृदयाला स्पर्श होतो; आणि जेथें शक्ति जाते तिच्याबरोबर लाठी जाते. तिच्यामुळें भय उत्पन्न होतें. त्यापेक्षां जास्ती ती कांहीं करूं शकत नाहीं. लाठीमुळें कधीं नियमन होऊं शकत नाहीं. म्हणून शास्त्रज्ञांनीं यती, संन्यासी यांच्या हातांत दंड दिला आहे. न्यायाच्या हातांत दंड दिला आहे; परंतु आज दंड पोलिसांच्या हातात आहे. ज्यांना कमींत कमी अकल आहे त्यांच्या हातीं दंड आहे.

### कायद्यानें ग्रामदान होऊं शकत नाहीं

सर्वांनीं ग्रामदान केलें पाहिजे, सर्वांना जमीन दिली जावी, सर्वांना स्वामित्वांतून मुक्ति मिळावी असा कायदा हिंदुस्थानांत होऊं शकत नाहीं. जास्तींत जास्त सरकार कर्ज मागेल; पण दान मागण्याची त्याला हिंमत नाहीं. सरकारनें दंड हातीं घेतला आणि ती शक्ति घालवून बसलें. दंड-शक्तीजवळ ' दान ' नावाची वस्तु असत च नाहीं. ती सर्वोदयाची शक्ति आहे. सर्वोदय दान मागतो. एक मनुष्य जमीन देतो, ती आम्ही भूमि-हीनाला देतो. शेतांत पेरायला बीं पाहिजे तेव्हां आम्ही म्हणतों, ' जमीन तर दिलीस; पण पेरायला बीं नाहीं देणार ? ' तेव्हां तो उत्तर देतो, ' हो, देईन थोडें. ' दानामध्यें ही शक्ति आहे. कायद्यानें जमीन काढून घेतली

असें समजा; तर काय याप्रमाणें पेरायला बीं हि मिळेल ? तुमची मुलगी कोणीं पळवून नेली आणि तुम्हीं च कोणाला प्रेमपूर्वक कन्यादान केलें या दोन्हींमध्ये कांहीं फरक आहे कीं नाहीं ? लोक मला विचारतात, ' बाबा, तुम्ही ही दानाची गोष्ट का करीत आहां ? कायद्यानें काम कां करून घेत नाहीं ? ' असें विचारणें म्हणजे ' तुम्हीं मुलाचे बाप होऊन कोणाच्या घरीं जाऊन प्रेमानें कन्येची मागणी का करतां ? तिला पळवून कां नेत नाहीं ? जल्दी काम होऊन जाईल ' असें म्हणण्यासारखें आहे. पण तें काय 'कल्याण' ( विवाह ) होईल ? ही एक साधी गोष्ट आहे. तरी हि असले प्रश्न विचारले जातात; कारण शिव आणि शक्ति वेगळीं झालीं आहेत. शिवापासून शक्ति वगळी पडते तेव्हां ती राक्षसी बनते, आणि त्याच्याशीं युक्त असते तेव्हां ती दैवी बनते. आज ' ग्रामदानें ' होत आहेत, त्याला सरकार मदत देत आहे, ही शोभादायक गोष्ट आहे. परंतु लोकांच्या मनांत प्रेम उत्पन्न व्हावें आणि त्यांनीं व्यक्तिगत मालकी समाजाला अर्पण करावी ही मोठी गोष्ट आहे.

### जमिनीबरोबर ज्ञान हि द्या

या कलियुगात आपल्या डोळ्यांसमोर मदुरा जिल्ह्यामध्यें लोकांनीं जमिनींची मालकी गांवाला समर्पण केली आहे येथें गांवचे कांहीं पुढारी हि आलेले आहेत. मी त्यांना विचारतों कीं, ' ज्या लोकांनीं ग्रामदान दिलें त्यांनीं मूर्खपणा केला कीं त्यांनीं शहाणपणाचें काम केलें ! ' यावर तुम्ही विचार करा. गांवोगांवचे मुख्य लोकांना जर खरोखर मुख्य बनायचें असेल तर त्यांनीं काय केलें पाहिजे तें समजून घ्या. मुखिया म्हणजे मुख. शरिरांत जसें मुख असतें तसें गावात मुखिया. मुखांत लाडू घातला आणि मुख जर स्वार्थी बनलें आणि त्यानें तो चावून पोटांत घातला नाहीं तर तोंड भरून राहील, बोलायला येणार नाहीं आणि तें निरुपयोगी होऊन जाईल. पण जर तें उदार झालें आणि त्यानें तो लाडू चावून पोटात टकलून देऊन मोकळें झालें तर तें मुखिया बनून जातें. रामायणांत तुलसीदासांनीं म्हटलें आहे कीं, ' मुखिया मुख सो चाहिये ' मुखिया केवळ मेहनतीचा अधिकारी आहे.

लोक विचारतात कीं, 'तुम्ही भूमिहीनांना जमीन देऊं इच्छितां. पण ते मूर्ख आहेत. त्यांना शेतीचें ज्ञान नाहीं. अशा मूर्खांच्या हातीं जमीन देणें बरोबर आहे का?' लाडू जसाच्या तसा च न चावतां गिळून टाकला तर तो पचायचा नाहीं. म्हणून 'मुखिया' लोकांचें, ज्ञानी लोकांचें हें काम च आहे कीं, ज्याना जमीन द्यायची त्याना अक्कल हि दिली जावी. असें आम्ही करणार नाहीं आणि म्हणूं कीं, 'हे तर मूर्ख आहेत. याना कोण जमीन देईल?' तर त्याचा अर्थ असा होईल कीं, तुम्हीं त्यांना भूमिहीन ठेवलें आणखी मूर्ख हि ठेवलें. त्याना काम करण्याची संधि दिली नाहीं आणि जबाबदारी हि टाकली नाहीं, म्हणून ते अज्ञानी राहिले. म्हणून त्यांना जमीन हि द्यायचा आणि आपल्याजवळ ज्ञान हि आहे तें हि द्यायचें. आपली मुलगी योग्य वराच्या हातीं द्यायची आणि तो गरीब असेल तर त्याचा संसार चांगला चालावा याची काळजी हि आपण घेतली पाहिजे. त्याला कन्या दिली पाहिजे आणि त्याबरोबर च घराचा मालक हि बनविला पाहिजे. त्याला आपल्या मुलासारखें मानलें पाहिजे. इंग्रजीमध्यें जांवयाला 'सन्-इन-लॉ' म्हणजे कायद्यानें मुलगा म्हणतात. जो अधिकार मुलाचा असतो तो च जांवयाचा हि असतो.

सांगण्याचा मतलब एवढा च कीं, ग्रामदानामध्यें आम्ही जमिनीची मालकी सोडतों, ती गांवाची करतों, म्हणून गांवची जमीन भूमिहीनांना हि मिळेल आणि सर्व मिळूनमिसळून काम करतील तर अकलेची हि वांटणी होईल. मग गांवांत किती कुटुंबें आहेत हें पाहून वेगळीं वेगळीं 'फार्म' बनवलीं जातील किंवा लहान गाव असेल तर एक च 'फार्म' बनेल. कुटुंबांत किती माणसें आहेत हें पाहून जमीन वाटली जाईल, किंवा जमीन वाटून थोडी सामूहिक फार्मसाठीं वेगळी ठेवली जाईल. हे सर्व अगदीं गौण प्रश्न आहेत. प्रत्येक गावची परिस्थिति पाहून गांववाले हे सर्व ठरवतील. जागोजाग जमिनीची वांटणी कशी होईल यासंबंधीं चर्चा चालते हें पाहून मला आश्चर्य वाटतें. शेती एकत्र करूं कीं वेगळी हो मामुली गोष्ट आहे. ही प्रयोगाची गोष्ट आहे. ज्यांत लाभ जास्त असेल ती गोष्ट केली जाईल. एका गांवांत एक प्रकार चालेल तर दुसऱ्या गांवात दुसरा. मग वेगवेगळे

अनुभव येतील. त्यांची तुलना केली जाईल आणि योग्य तो प्रकार स्वीकारला जाईल. ही कांहीं मोठी गोष्ट नाहीं. मालकी आमची नाहीं. व्यक्तिगत मालकी चुकीची आहे हे मान्य होणें ही मोठी गोष्ट आहे.

### शत्रुनाशाचें सर्वोत्तम शस्त्र प्रेम

आज येशूचा जन्मदिवस आहे. त्या दिवशीं मी बोलत आहें. 'आपल्या स्वतःवर जसें प्रेम करता तसें शेजाऱ्यावर करा' असें त्यानें सांगितलें आहे. एक साधें लहानसें वाक्य आहे. अर्थ समजायला हि कठीण नाहीं. पण जगांत काय चाललें आहे? सगळ्यांत ज्यास्ती प्रेम 'आपल्यावर' आहे. नंबर दोनचें प्रेम पतीचें पत्नीवर किंवा पत्नीचें पतीवर. नंबर तीनचें प्रेम मित्रावर. असें करतां करतां कांहीं लोकांवर प्रेम च नाहीं उलट तिरस्कार च उत्पन्न होतो ही एक गोष्ट झाली. पण भावाभावामध्यें मत्सर ही त्याहून वाईट गोष्ट आहे. शेजाऱ्याशेजाऱ्यांत तटे ही दुसरी वाईट गोष्ट आहे. एक तर कमानीसारखें चढतें उतरतें प्रेम आणि दुसरें शेजाऱ्याशीं आणि दूरच्या लोकांशीं हि तटे. हल्लीं जगामध्यें असें च चाललें आहे. पण तो माणूस जो प्रेममूर्ति होता तो सांगतो कीं, तुम्ही जसें आपल्या स्वतःवर प्रेम करता तसें आपल्या शेजाऱ्यावर हि करा. आपला ज्यास्तीत ज्यास्त तंटा शेजाऱ्याशी च होतो, म्हणून त्यानें शेजाऱ्याचें नांव घेतलें. शत्रूचें नांव निघालें तेव्हां तो म्हणाला, 'लव् दाय एनिमी' (शत्रूवर प्रेम करा). शत्रूवर प्रेम करणें ही अजब गोष्ट आहे असें लोक म्हणतात. पण त्यांत आश्चर्य कांहीं नाहीं. तें विज्ञान आहे शत्रु माझ्याशीं द्वेष करतो आहे. आग लावून राहिला आहे. तेव्हां मीं विचार केला पाहिजे कीं, त्याच्याजवळ अग्नि आहे, तो मीं विझविला पाहिजे. मी जर दुसरी आग लावीन तर तो वाढेल. आणि मी जर पाणी टाकीन तर ती आग विझून जाईल. हा विज्ञानाचा नियम आहे. ख्रिस्तानें शत्रूचा नाश करण्याचा सर्वोत्तम उपाय सांगितला आहे. आजपर्यंत त्यापेक्षा मोठें दुसरें कोणतें हि शस्त्र निघालें नाहीं. हल्लीं ॲटम बॉंब बनवले जात आहेत. ते शत्रुनाश करीत नाहींत, सर्वनाश करतात. ते शत्रुत्व वाढवितात, भय उत्पन्न करूं शकतात; पण प्रेम नाहीं. म्हणून शत्रूचा नाश करायला हें अगदीं निरुपयोगी शस्त्र

आहे. शत्रुनाशाचें सर्वांत उत्तम साधन प्रेम च असूं शकतें आणि हें च खिस्तानें सांगितलें. आणि मौजेची गोष्ट अशी कीं, त्यानें नुसतें 'प्रेम करा' एवढें च सांगून त्याचें समाधान झालें नाहीं. 'स्वतःइतकें प्रेम करा' असें त्यानें सांगितलें.

## ज्ञात्यांच्या मार्गावर च ग्रामदानी

शेजाऱ्यावर आपल्यासारखें च प्रेम कां करावें हें वेदान्तानें आपल्याला समजावून दिलें आहे. शंकराचार्य आणि रामानुज त्याचें कारण सांगत आहेत. जेवढें प्रेम आपण आपल्या डाव्या कानावर करतों तितकें च उजव्या कानावर हि करतो. जितकें प्रेम उजव्या डोळ्यावर करतों, तितकें च डाव्या डोळ्यावर हि. त्यांत आपण उजवा डावा असा फरक करीत नाहीं. उजवा डोळा डाव्यापेक्षा मुळीं च वेगळा नाहीं. ते आमच्या देहाशीं जोडलेले च आहेत. त्याप्रमाणें च समाजांत वेगवेगळ्या व्यक्ति दिसतात; पण त्या वेगळ्या नाहींत, सर्व मिळून एक च वस्तु आहे. ज्याप्रमाणें वृक्षाला वेगवेगळ्या डहाळ्या, पानें असतात त्याप्रमाणें च या व्यक्ति हि समाजवृक्षाच्या शाखा-पल्लव आहेत.' ही गोष्ट आपल्याला वेदान्त शिकवितो. सर्वोदयाचा मूळ आधार हा वेदान्त आहे. 'मी–माझें' संपलें–पाहिजे. हा च वेदान्त आणि हा च सर्वोदयी आणि ग्रामदानी लोक आचरीत आहेत. 'मग काय ते वेदान्ताचे ज्ञानी बनले ?' असें विचारलें जाईल. नाहीं. ते वेदान्तज्ञानी बनले नाहींत; वेदान्तज्ञाते वेगळे च असतात हे त्यांच्या मार्गे जाणारे त्यांचे अनुयायी बनले आहेत. रेडिओच्या शक्तीचा ज्यानें शोध लावला तो एक ज्ञानी पुरुष होता. आतां रेडिओ वापरणाऱ्याला इतक्या ज्ञानाची जरुरी असत नाहीं. वेदान्त तर आम्हांला शंकराचार्य आणि रामानुजाचार्य यांनीं शिकविला; तसा च प्रेम-सिद्धान्त खिस्तानें. त्याचें आम्हांला ज्ञान नाहीं. नशिबांत असेल तर कधीं तरी मिळेल. त्याची तीव्र वासना असेल तर तें जरूर प्राप्त होईल; परंतु जें ज्ञान त्यांनीं आम्हांला दिलें तें उपयोगांत आणायला जास्त ज्ञानाची काय जरुरी आहे ? ग्रामदान करणारे छोटे छोटे लोक आहेत; पण ते शंकर, रामानुज, खिस्त यांची शिकवण अंमलांत आणीत आहेत, त्याचा त्यांना चांगला अनुभव येईल. त्यांचें प्रेम वाढेल.

त्यांनीं एक प्रेम प्रकट केलें. त्यांच्या अनुभवावरून देशांत एक ज्योति प्रकट होईल. मग सर्व देश बदलून जाईल; आणि देश बदलला म्हणजे जग हि बदलून जाईल.

## शांति-शक्तीचा विजय

या विषयाचें तुम्ही चांगलें अध्ययन करावें अशी माझी इच्छा आहे. हें जें येथें काम होऊन राहिलें आहे तें छोटें नाहीं. शस्त्रशक्तीनें एखाद्या देशाला पराजित करून त्यावर अंमल बसविणें सोपें आहे. ती कांहीं मोठी घटना नाहीं; पण ग्रामदान ही मोठी घटना आहे. हा शांति-शक्तीचा विजय आहे. याची बरोबरी लढाईंत मिळणाऱ्या जयानें होऊं शकत नाही. आजच्या लढाईंत ज्याचा जय होतो तो हरतो, आणि जो हरतो तो खलास होतो. आज अशीं शस्त्रें निर्माण झालीं आहेत कीं, जिंकणारे आणि हरणारे दोन्ही नामशेष होणार आहेत. त्यात कोणाचा जय आणि कोणाचा पराजय हा प्रश्न च उरणार नाहीं. इला चढवायला तुमच्याजवळ जायची हि जरुरी नाहीं. येथें बसल्या बसल्या च कोन साधला कीं तेथें बॉंब जाऊन पडेल. आतां हीं शस्त्रे वेगवेगळ्या देशांच्या हातीं आलीं आहेत; म्हणून जय मिळवायला हीं शस्त्रें बिलकुल कामाचीं नाहींत.

या कामीं कायद्याची अधिक मदत झाली असती. पण मी म्हणतों त्या-प्रमाणें या कायद्यामागें दंडशक्तीचा जोर नसावयास पाहिजे होता. शस्त्रा-स्त्रांच्या मदतीशिवायचा कायदा–धर्मशास्त्राचा कायदा मानला जाईल. तुम्ही काहीं दंडाशिवाय ज्या कायद्याचा अंमल करीत आहां असा एक कायदा मी तुम्हाला दाखवितो. 'स्नान झाल्याशिवाय दुपारचें जेवण घ्यायचें नाहीं. कायद्याच्या कोणत्या हि पुस्तकात असलें कलम नाहीं. कोणी त्याप्रमाणें वागलें नाहीं तरी सरकार त्याला शिक्षा देणार नाहीं. तरी या ठिकाणीं जितके लोक बसले आहेत त्यांत स्नान केल्याशिवाय जेवणारा क्वचित् च कोणी असेल. कोणी आजारी असेल किंवा कांहीं विशेष कारण असेल तर गोष्ट वेगळी. पण बाकी सर्व लोक– मग ते श्रीमंत असोत, गरीब असोत, शिकलेले असोत न शिकलेले असोत– या नियमाचें पालन करतात च. हा नियम बनला तरी कसा? आणि तो अंमलांत कां येतो? त्याचीं दोन कारणें

आहेत. एक तर तो कल्याणकारी नियम आहे, आणि दुसरें त्याच्यामागें दंडशक्ति नाहीं. अशा कितीतरी गोष्टी दंडशक्तीशिवाय आमच्या जीवनांत चालू आहेत. अशा कामांपैकीं च एक काम दंडशक्तीपासून अगदीं दूर राहून समाजांत क्रांति करण्याचें काम तुमच्या डोळ्यांसमोर होऊन राहिलें आहे.

## हजारों लोक ग्रामदान देतील

गांवांतले पुढारी यावर विचार करतील अशी मला आशा आहे. तेथे ५० ग्रामदानें झालीं आहेत. तशीं शेंकडों, हजारों कां होऊं नयेत याला मला कांहीं कारण दिसत नाहीं. पन्नास गांवांतले लोक जेवतात मग पांच लाख गांवांतले हि लोक कां जेवूं शकणार नाहींत ? ही तर चांगली वस्तु आहे ना ? गोड लागते कीं कडू ? गोड लागत असेल तर तिला कोण घेणार नाहीं ? म्हणून पाचपन्नास ग्रामदानानें काम संपत नाहीं. प्रत्येक खेड्याचें ग्रामदान झालें पाहिजे व होऊं शकेल. तुम्हीं सर्व लोकांनीं याचा विचार करावा, त्याचा अभ्यास करावा. आपली मालकी सोडून मालकी सर्वांची करावी आणि मग दुसऱ्या लोकांच्याकडे मागायला जावें. मग लोक देतात कीं नाहीं ते पहा. मागणारा प्रेमी असला पाहिजे, ज्ञाता आणि त्यागी असला पाहिजे. या तीन गुणांनीं युक्त होऊन जा आणि मागा. मग कोठें हि जाऊन जें मागाल तें मिळेल च.

कल्लुपट्टी (मदुरा)
२५-१२-१९५६

आतां च आपण एक सुंदर भजन ऐकलें. त्यांत भक्त म्हणतो कीं, 'जगांत पुष्कळ ज्ञान आहे तें मी जाणत नाहीं.' १४ विद्या आणि ६४ कला जगामध्यें कशा ना कशा कामाला उपयोगी पडतात असें म्हणतात. परंतु सर्वांत मोठी कला आणि विद्या यांहून वेगळी आहे. ती विद्या आणि कला असेल तर च दुसऱ्या कला आणि विद्या उपयोगी पडतात; नाहीं तर सर्व विद्या, कला निकामी होतात. देहामधें डोळे, नाक, हात, पाय वगैरे कित्येक प्रकारच्या शक्त्या आहेत. पण सर्वांत मोठी वस्तु आहे प्राण. प्राण नसेल तर डोळे, हात, पाय आपापलें काम करणार नाहींत. प्राण नसेल तर हीं सर्व अंगें बेकार आहेत. त्या प्रमाणें च सर्वांतली मोठी विद्या नसेल आणि दुसऱ्या सर्व विद्या मिळविल्या तर त्यानीं आम्ही सुखी होणार नाहीं.

## भक्तीशिवाय लक्ष्मी वाढविण्यांत कल्याण नाहीं

हल्लीं सरकार पचवर्षीय योजना बनवीत आहे. त्यानें म्हणतात कीं, पुढील पांच वर्षांत इतकी दौलत वाढेल, इतके नवे धंदे उभे करूं, इतके कारखाने उभारूं, नद्यावर इतके इतके पूल बांधूं, इतक्या लांबीचे नवे रस्ते आणि रेल्मार्ग तयार करूं, इतक्या इतक्या गावीं वीज आणू, मग रात्रीं देखील तेथें उजेड च उजेड होईल. एका गावची गोष्ट सागतो. आम्ही त्या गावीं जाऊन आलो आहों. तो गाव सरकारच्या 'कम्युनिटि प्रॉजेक्ट' मधें आला आहे. कम्यूनिटी प्रॉजेक्टमुळे त्या गावची संपत्ति कांहीं थोडी वाढली आहे. परंतु संपत्ति वाढल्यापासून गावात द्वेष आणि झगडे सुरू झाले आहेत असें गावच्यानीं सांगितलें. कारण पैसा आला, पण आंतली वस्तु आली नाहीं. आतली विद्या असेल तर च बाह्य संपत्तीपासून लाभ होतो. आतली विद्या असेल आणि बाह्य संपत्ति नसेल तरी माणूस सुखी राहतो. ही आतली विद्या काय आहे? तिला आमच्या महापुरुषानीं 'भक्ति' नाव दिलें आहे.

भक्ति असेल तर च लक्ष्मी, सरस्वती व शक्ति कामाला येतात. पण भक्ति नसेल तर या तिन्ही असून हि कल्याण होत नाहीं.

### भक्तीचा अर्थ काय ?

भक्ति ही काय वस्तु आहे ? मंदिरांत मूर्ति स्थापून आणि लोकांनीं दर्शन घेतलें, पूजा केली, नाम घेतलें तर काय ती भक्ति पूर्ण झाली ? नाहीं; तें भक्तीचें नाटक होईल. खरोखर भक्ति शिकायकरितां ते एक नाटक आहे. ' क ' ' ख ' ' ग ' शिकून माणूस विद्वान् बनत नाहीं. त्याप्रमाणें च मंदिरात जाऊन पूजा अर्चा वगैरे करणें हा ' ओनामा ' आहे. देवळांत आपल्याला देवाचा प्रसाद मिळाला म्हणजे आमच्या हृदयांत कांहीं भावना उत्पन्न होतात; हा त्याचा उपयोग. परंतु त्या भावनेपासून बल प्राप्त करून जेव्हां आमच्या जीवनांत सर्व प्राण्यांविषयीं प्रेम, दया, करुणा होईल तेव्हां च ती ' भक्ति ' होईल. हें चिदंबर मंदिर आहे; त्यात मूर्ति आहे आणि तो च तेवढा परमेश्वर आहे असें समजूं तर आम्हाला कांहीं समजलें नाहीं. चिदंबर तर येथें च माणसांच्या अंतःकरणांत आहे हें आपण ओळखलें पाहिजे. त्या ठिकाणीं एक ज्योति आहे, एक मूर्ति आहे. तिच्यावर प्रेम असलें पाहिजे. पूज्य भाव असला पाहिजे. या प्रमाणें समाजांत परस्परप्रेम ठेवण्याची विद्या असेल तर आम्हाला ' भक्ति ' प्राप्त झाली असें म्हणतां येईल. अशी भक्ति जेथें असेल तेथें इतर सर्व शक्ती साहाय्यक होतात.

### ' मी ' ' माझें ' जाणें हा भक्तीचा आरंभ

पंचवर्षीय योजनेंत भक्तीची गोष्ट च नाहीं. ती गोष्ट सरकार करूं च शकत नाहीं. राजकीय पक्ष हि हें काम करूं शकत नाहींत. ते पक्ष सर्व लोकांना तोडायचें काम करतील तर भक्ति तुम्हा सर्वांना जोडायचें, एकत्र करायचें काम करते. दोन माणसे निवडणुकीला उभीं राहिलीं. एक म्हणतो ' दुसऱ्याला मत द्याल तर तो तुम्हाला नरकांत घेऊन जाईल. मला निवडाल तर मी तुम्हांला स्वर्गांत नेईन. ' दुसरा हि असें च म्हणतो. कांहीं याला मत देतील तर कांहीं त्याला. यामुळें आपापसात तंटे उत्पन्न होतील. या प्रमाणें गावोगांवीं तुकडे पाडायचें काम केलें जाईल. म्हणजे ही भक्तीच्या प्रक्रियेच्या अगदीं उलटी प्रक्रिया झाली. भक्ति सांगते, ' तुम्ही सर्व लोक

एक होऊन जा. तुमच्या सर्वांच्या हृदयांत एक च ज्योति आहे. तुम्ही सर्व मिळून काम करा. आपली मालकी ठेवूं नका. जितकें तुमच्याजवळ आहे तेवढे समाजाचें आहे असें समजा. समाजाला अर्पण करा आणि त्याच्या सेवेला लागा. त्याच्याकडून प्रसादरूप जें मिळेल त्याचें सेवन करा. हें माझें शेत, हें माझें घर, ही माझी संपत्ति, हीं माझीं मुलेंबाळें अशा लहान लहान गोष्टी करणें म्हणजे समाजाचे तुकडे पाडणें आहे. भक्ति नेहमीं या सर्वांवर प्रहार करते. जाति, धर्म, जन्म या सर्व गोष्टी चूक आहेत. यांच्यामधें अडकून सर्वजण चारी बाजूंला चकरा मारीत फिरत आहेत. तुम्ही याच्यामधून बाहेर पडा.

जाति मिथ्या, मतभेद मिथ्या, जन्ममृत्यु मिथ्या, मी माझें मिथ्या असें म्हणतां तर 'सत्य तें काय' असें विचारलें जाऊं शकतें. माझें नाहीं, आमचें! ही भक्ति आहे. हे माझें गांव नाहीं, आमचे गांव आहे. हें माझें शेत नाहीं, आमचें आहे. प्रथम आपली मालकी सोडून समाजाची बनवा. मी-माझें सोडून द्या. आम्ही व आमचें म्हणूं लागा. हे च ग्रामदान आज आम्ही कुणाला विचारलें कीं, 'तुझ्याजवळ किती जमीन आहे?' तर कोणी म्हणतो २०० एकर, कोणी म्हणतो ५०, कोणी म्हणतो ५, तर कोणी म्हणतो मजजवळ मुळीं च नाहीं. पण ग्रामदान झाल्यावर सर्व-जण म्हणतील आमची ४००० एकर जमिन आहे. सर्व च एकदम मोठे होऊन जातील. आज एखाद्या आईला विचारलें कीं 'तुला किती मुलें आहेत?' तर 'दोन, तीन, चार' असें छोटेंसे उत्तर येईल. पण ग्रामदानी गांवच्या आईला विचारलें तर ती सांगेल, 'माझीं दोनशें मुलें आहेत. गांवात जितकीं मुले आहेत तीं सारीं माझीं च आहेत. या प्रमाणें पूर्वी जे लहान लहान होते ते ग्रामदान होता च मोठे होतील. ग्रामदान होतें तेव्हां व्यक्तिगत मालकी संपते. 'मी-माझें' संपतें आणि 'आम्ही-आमचें' सुरू होतें. येथून च भक्तिमार्गाची सुरुवात होते.

मग तो भक्तिमार्ग पुढें वाढू लागतो आणि वाढवा वाढतां इतका वाढतो कीं त्यानें देहाचा सारा अभिमान च नाहींसा होतो. जेव्हां शरीर, समाज आणि गांवाचा हि अभिमान सुटेल तेव्हां 'आमचे' हि राहणार नाहीं.

'तुझें' 'भगवंताचें' मात्र उरेल. तो 'आमचें' म्हणणार नाहीं. 'देवा, तुझें' असें म्हणेल. प्रथम 'माझें' तुटलें, मग 'आमचें' तुटलें. आतां 'तुझें' मात्र राहिलें. याचें च नांव आहे 'भक्तीची पूर्णता'. आमचे पूर्वज तर त्याच्यापुढें गेले होते. ते म्हणत, 'तुझें हि नाहीं. तूं च आहेस.' ते शेवटच्या मर्यादेपर्यंत पोंचले होते. पण त्याचा आरंभ 'मी आणि माझें' छेदण्यापासून होतो. जोंपर्यंत 'मी-माझें' सुटत नाहीं तोंपर्यंत 'आम्ही-आमचें' 'तूं-तुझें' किंवा 'तूं च तूं' हें येत नाहीं. एक एकानंतर एक एक चढण्याच्या या पायऱ्या आहेत. माझी इच्छा समाज एक एक पायरी चढत वर जावा. साधी गोष्ट आहे. पहिली पायरी मीं सुरु केली आहे. आपलें गांव पुरेंच्या पुरें ग्रामदानांत द्या. मग त्या गांवांतल्या जाती संपतील. उच्च नीच भेद नाहींसे होतील. स्वार्थाचे भेद राहणार नाहींत. हा माझा पक्ष, हा तुझा हें हि राहणार नाहीं. मग सर्व गांव मिळून एक होईल. केवढी शक्ति वाढेल! मग ज्या योजना कराल त्या यशस्वी होतील. मग गावचे धंदे वाढवाल, लक्ष्मी वाढवाल, शक्ति वाढवाल, तर सर्वांचा लाभ होईल.

### प्रेमाचा प्रवाह वाहूं दे

माझें काम अगदीं सोपें आहे. प्रेमानें रहा एवढें च मी लोकांना सांगत असतो. ही कांहीं नवी गोष्ट नाहीं. जुन्या साहित्यांत प्रेमाचा महिमा खचून भरलेला आहे. परंतु मीं आपल्यापुढें एक नवीन गोष्ट ठेवली आहे. ती म्हणजे प्रेम करण्याचा एक व्यावहारिक कार्यक्रम.

### प्रेम सडूं लागलें आहे

आज प्रेम नाहीं अशी गोष्ट नाहीं. पण तें अडून राहिलें आहे. पाणी वहात तेव्हां तें स्वच्छ, निर्मळ असतें. पण त्याचें वहाणें बंद झालें म्हणजे तें कुजूं-सडूं लागतें. त्या प्रमाणें च आज प्रेमाचा संचय होऊं लागला आहे. हीं माझीं मुलें, माझे भाऊ-बहीण, माझे आई-बाप एवढें च लोक म्हणतात. एवढें च नाहीं तर लग्न होऊन पत्नी आल्यावर मुलें-बाळें झाल्यावर सर्व प्रेम त्यांच्याकडे च जातें. आई-बापांवर हि रहात नाहीं. याप्रमाणें प्रेमाचें

क्षेत्र अगदीं संकुचित झालें आहे आणि त्या संकुचित क्षेत्रामध्यें प्रेमाची खोली इतकी वाढते कीं, त्याला आसक्तीचें रूप येतें. गाढवासारख्या पशू-मध्ये हि प्रेम असतें. पण तें सर्वच्या सर्व त्याच्या एका शरीरांत भरलेलें असतें. याचें प्रेम कुटुंबापुरतें च मर्यादित असतें. तें गाढवाच्यापेक्षां थोडेंसें च पुढें आहे.

परमेश्वरानें प्रेम तर साऱ्या जगामध्यें भरून ठेवलें आहे. जेथें प्रेम नाहीं अशी एक हि जागा मोकळी नाहीं. परंतु प्राण्यांचें आणि मनुष्यांचें प्रेम त्यांच्या त्यांच्या शरीरापुरतें किंवा थोड्याशा च व्यक्तीपुरतें मर्यादित राहतें. प्रेमाशिवाय कोणी हि प्राणी असत नाहीं. आणि प्रेमाशिवाय कोणाला हि समाधान असत नाहीं. परंतु ज्या ठिकाणीं प्रेम एकत्र सांचलें, सांचून घनीभूत होतें, त्या ठिकाणीं आसक्ति हि दृढ होते. त्यामुळें त्यात एवढा च दोष उत्पन्न होत नाहीं तर दुसऱ्याविषयीं तिरस्कार आणि द्वेष उत्पन्न होतो. शेजारचा मुलगा सुंदर आहे. त्याला पाहून त्याचा द्वेष करणारी आई हि मीं पाहिली आहे. देवानें माझा मुलगा सुंदर केला नाहीं, शेजाऱ्याचा मुलगा सुंदर केला, तर त्याच्या दर्शनानें मला आनंद वाटला पाहिजे. त्याच्या ऐवजीं त्याचा मत्सर वाटतो. हा प्रेम सांचल्याचा परिणाम आहे. सारांश, पाण्याप्रमाणें च प्रेम सांचलें कीं सडूं-कुजूं लागतें आणि त्यामध्यें काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर वगैरे जंतू उत्पन्न होतात.

### वेदान्ताचा कठिण मार्ग

याला उपाय काय ? का प्रेम च सोडून द्यावें ? वेदान्त सांगतो कीं, आसक्ति सोडा. पण ती फार कठीण गोष्ट आहे. तें जर झालें असतें तर बाबाला फिरायला च लागलें नसतें. थोड्या लोकांना सन्यास देऊन संन्यासी बनविलें पण बाकीच्या लोकांची काहीं च वास्तपुस्त केली नाहीं, प्रेम च नाहींसें करून टाका, प्रेमाचें जल सुकवून टाका हा काहीं सार्वजनिक उपाय नाहीं. कपड्याला डाग लागला असला आणि तो साफ करायचा असला तर त्याला उपाय आहे. एक म्हणाला, जाळून टाका म्हणजे तो साफ होईल. त्यामुळें डाग जाईल खरा पण हा काय उपाय आहे !

कपडा कायम ठेवून च तो साफ केला पाहिजे. याप्रमाणें च प्रेम च काढून टाका असें म्हणणें हीं फार मोठी गोष्ट आहे. कोणाला जेवायला भात मिळाला नाहीं तेव्हां काय करावें असें त्यानें विचारलें. त्याला लाडू खा अशासारखें वेदान्ताचें उत्तर आहे. तो म्हणतो, तांदूळ च मिळत नाहीं तर लाडू कसा मिळेल? ज्यांच्या हातून लहान गोष्टी हि पार पडत नाहींत अशांना वासना सोडून द्या अशी मोठी कठीण गोष्ट सांगितली गेली. त्यामुळें वेदान्त ग्रंथामध्यें च राहिला आणि हवेंत राहिला. हवेंत राहिला असें मीं म्हटलें याचें कारण हिंदुस्थानामध्यें त्याविषयीं श्रद्धा नाहीं तो हि चांगली गोष्ट आहे. पण तेवढ्यानें काम भागत नाहीं. आज हें जें प्रेम सडून राहिलें आहे आणि त्यामुळें काम, क्रोध, आसक्ति वगैरे उत्पन्न करीत आहे त्याला उपाय हा च कीं तें प्रेम वाहूं लागावें.

## प्रेम वाहूं लागावें

मीं भूदान, ग्रामदान वगैरेच्या गोष्टी लोकांचे पुढें ठेवल्या. त्यांत प्रेमाच्या गोष्टी नवीन मागितल्या असें नाहीं. लोकांमध्यें प्रेम तर आहे च, परंतु त्याचा प्रवाह बंद झाला होता तो सुरू करावयाचा आहे. जेव्हां कोणी म्हणतो कीं, 'हा माझा मुलगा आहे' तेव्हां मी त्याला सांगतों, हा माझा आहे आणि तो हि माझा आहे असें म्हण. माझा मुलगा एवढें च म्हणूं नको. तो हि म्हणायला शीक. हें माझें घर आहे एवढें च म्हणूं नकोस, हें हि माझें घर आहे असें म्हण. हें माझें शरीर आहे त्याऐवजीं हें हि माझें शरीर आहे म्हण. आज तुम्ही केवळ आपल्या शरीरापुरता आणि आपल्या कुटुंबापुरता विचार करीत आहां. तें आपलें रूप थोडें वाढवा. तुमच्या घराला आग लागूं नये ही तुमची इच्छा आहे ती फार चांगली आहे. परंतु शेजाऱ्याचें घर तुमच्या घराला चिकटून आहे त्याला हि आग लागूं नये अशी इच्छा कर. कारण त्याला आग लागली तर तूं आपलें म्हणतोस तें घर हि वांचणार नाहीं. तुम्हा आम्हाला या आकाशानें जोडलें आहे. आकाश हें सगळ्या जगाला जोडणारी वस्तु आहे, तोडणारी नाहीं. या विज्ञानयुगांत सारा मामला च बदलून गेला आहे. एका काळीं समुद्र हा वेगळे करणारी वस्तु होती. ती आतां जोडणारी झाली आहे. आज जपान आणि

अमेरिका समुद्राने जोडलेले शेजारी देश झाले आहेत. त्यांच्यामध्ये एक लहानसा सात हजार मैलांचा समुद्र आहे त्याने च त्या दोन देशांना जोडलें आहे. विज्ञानाच्या या काळांत पंचभूतांनी आम्हाला जोडले आहे ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे.

## सोपा कार्यक्रम

म्हणून, या काळात आमचे अतःकरण हि व्यापक बनले पाहिजे. मी ते ओढून ताणून तुटण्याइतकें व्यापक करूं इच्छीत नाहीं. फक्त खेड्याच्या मर्यादेपर्यंत ताणू इच्छितो. मी जर विश्वकुटुंबाची गोष्ट बोललो तर तो वेदान्त होईल. लोक ती गोष्ट १०० टक्के मान्य करतील पण त्याच्यावर कोणी अंमल करणार नाहीं. म्हणून ती गोष्ट कामाची नाहीं. मी एवढे च सांगतों कीं, जी भावना तुमच्या कुटुंबापुरती मर्यादित होती तिला जरा वाढवा आणि गांवाच्या सगळ्या लोकाना आपलें कुटुंब समजा. मग प्रेमाचा प्रवाह सुरू होईल, त्याचें कुजणे थांबेल आणि त्याचा स्वच्छ-निर्मळ झरा वाहू लागेल. आज प्रेमाला कामवासनेचें रूप आले आहे. मग त्याला भक्तीचे रूप येईल. मग त्याला आम्ही गांवापुरतें च मर्यादित ठेवणार नाहीं, त्याच्या पुढे हि पसरून देऊ. कोणाचे अंतःकरणात परिपूर्ण प्रेम भरलें असेल तर तो आणखी हि पुढे जाईल. कोणाच्या अतःकरणात कमी असेल तर तो कमी व्यापक होईल. पण ज्याच्या मनात जितके प्रेम आहे तितकें च ते वहायला लागूं दे असें माझें सागणें आहे. म्हणून माझा कार्यक्रम लोकाना समजायला अगदीं सुलभ आहे

## पशुता आणि मानवता

भूदान आणि ग्रामदानात हे च घडते. आता येथे कांहीं लोकानीं ग्रामदान दिलें आहे. मीं त्याना विचारलें कीं, ' हे काय समजून तुम्हीं दिलेत ? ' तेव्हां ते म्हणाले कीं ' आमच्या गांवांतले गरीब भूमिहीन लोक सुखी होतील म्हणून दिले. जेथे दुसऱ्याच्या सुखाची चिंता सुरू होते तेथे मानवतेची सुरुवात होते. जोंपर्यंत केवळ आपल्या च सुखाची चिंता असते तोंपर्यंत पशुता असते. हिंदुस्थानामध्यें एक अगदीं वाईट चाल पडून गेली आहे कीं येथ दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी होणाऱ्याला ' संत ' पुरुष म्हणतात आणि

आपल्या सुखानें सुखी होणें हें मनुष्याचें लक्षण मानतात. पण हें जर मनुष्याचे लक्षण मानलें तर जनावराचें लक्षण कोणतें ? उघड च तें जनावराचे लक्षण आहे. आणि दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी आणि दुसऱ्याच्या सुखानें सुखी होणें हें मनुष्याचें लक्षण आहे आणि सुखदुःखाच्या पलीकडे असणें हें महापुरुषाचें लक्षण आहे. परंतु हिंदुस्थानातील लोकांनीं आपलें लक्षण महापुरुषांना दिलें आणि जनावराचें लक्षण आपल्याला घेतलें. "**परदुःखेन दुःखिताः विरलाः**"—दुसऱ्याच्या दुःखानें दुःखित होणारे महापुरुष विरळ असतात हें संस्कृत वचन घरोघर म्हटलें जातें. मग काय ज्या लहान मुलानें आता बाबाला सूत दिलें तो काय महापुरुष आहे ? याप्रमाणें विचार करण्याची आपली पातळी अगदीं अधःपतित झाली आहे. मी तुमच्यापुढें कांहीं दैवी प्रेमाच्या गोष्टी सांगत नाहीं. तुमच्यांतली मानवता जागी करत आहे. मी सर्वांना विचारतों, मित्र हो, तुम्ही मानव आहात ना ? एका च गांवांत शेजारी शेजारी राहतां तेव्हां एकमेकांवर प्रेम करणें हा च जवळ राहण्यांतला हेतु आहे. शेजारच्या घरात रडणें चालू असेल तर आपल्या घरीं लाडू खायवत नाहीं. परमेश्वरानें मनुष्याचें हृदय च असें बनविलें आहे. पण आपलें दार बंद करून त्याचें रडणें च आपल्या कानांवर येणार नाहीं तसा बंदोबस्त तुम्ही करू शकतां.

## सुजातेमध्यें करुणेचें दर्शन

आपल्या मुलाला दुःखाचा अनुभव येऊं नये असा बंदोबस्त बुद्धाच्या पित्यानें केला. तो राजपुत्र होता. दुःख कधीं हि त्याच्या दृष्टीस पडूं नये अशा ठिकाणीं त्याला ठेवलें होतें. एक दिवशीं तो पालखींत बसून चालला होता. त्याची दृष्टि दूर गेली तेव्हां त्याला थोडें दुःखाचें दर्शन झालें. बस्स. एवढ्यानें न सर्व संपलें आणि बुद्धदेवानें सर्व जग दुःखमय आहे असा निर्णय केला. कारण बिलकूल कधीं त्याला दुःखानें दर्शन च होऊं नये अशी व्यवस्था त्याच्या बापानें केली होती. तरी देखील दुःख त्याच्या दृष्टीस पडलें, तेव्हां जगामध्यें किती दुःख असेल ! प्रत्यक्षापेक्षां अनुमानानें च त्यानें दुःखानें माप केलें आणि अशा दुःखी जगांत दुःख कायम टेवून मी जगूं शकत नाहीं असें म्हणून तो घराबाहेर पडला. दुःखाचा नाश कसा

होईल याचा मार्ग शोधायला तो चिंतन करूं लागला. मग त्याने चाळीस दिवस उपास केला. तेथें त्याला एक धनगराची मुलगी रोज पहात असे. ज्याच्या एक एक बरगड्या आणि हाडें दिसूं लागलीं आहेत असा हा कोण माणूस येथें बसला आहे, असा ती विचार करी. ह्या माणसाला जेव्हा भूक लागेल त्या वेळेला तावडतोब पुढें करतां यावें म्हणून एका वाटींत दूध घेऊन त्याच्या जवळपास ती फिरत राही. चाळीस दिवसांच्या चिंतनानंतर त्याच्या अंतःकरणांत प्रकाश पडला त्याला पूर्वेकडे कारुण्याचा उदय होत आहे असें दृष्टीस पडलें हें आहे दर्शन. त्याला उत्तर मिळालें कीं, जगांतलें दुःख नाहींसें करायचें असेल तर कारुण्याची आवश्यकता आहे. माझा प्रश्न सुटला. आतां उपवासाची जरूरी नाहीं. असें म्हणून त्यानें डोळे उघडले. त्याबरोबर दुधाची वाटी घेऊन ती मुलगी तयार च होती.

ज्या प्रश्नाचें उत्तर चाळीस दिवस उपवास करून बुद्धदेवानें काढलें तें त्या मुलीनें तपस्येशिवाय च काढलें. भगवान् बुद्धाच्या आयुष्यांत त्या मुलीचा महिमा फार मानला जातो. त्या मुलीला जन्मतः च करुणा प्राप्त होती. भगवान् बुद्धाला करुणेच्या दर्शनाकरितां तपस्या करावी लागली. पुढें ४० वर्षें परिव्राजक शिष्य घेऊन फिरत राहिले आणि जगाचा प्रश्न सुटायला, दुःखाचें निवारण करायला तपश्चर्येची जरूरी नाहीं, करुणेची आहे, असें सांगत फिरले. तपश्चर्येनें च त्यांना कळलें कीं, तपश्चर्येची जरूरी नाहीं. त्यांना जें करुणेचें दर्शन झालें तें त्या मुलीच्या दर्शनानें झालें. तेव्हांपासून त्यांचा संदेश जगामध्यें पसरला. आतां त्याच्या २५०० व्या जयंतीचा उत्सव होत आहे. जगांत शांति पाहिजे असेल तर गौतम बुद्धानें दाखविलेला रस्ता च घेतला पाहिजे असें सैन्य राखणारे लोक च बोलत आहेत. त्यांना आढळून आलें आहे कीं, सैन्य ही निरुपयोगी वस्तु आहे- कामाची वस्तु आहे करुणा. मी भूदानयज्ञांत जें सांगत आहें तें करुणेशिवाय दुसरें कांहीं नाहीं.

मदुरा
२१-१२-'५६

## व्यापाऱ्यांनीं धर्मानें वागून पुढारी व्हावें : २० :

मी ऐकलें की, येथले व्यापारी मला कांहींसे भितात. व्यापारी चोरांना भितात. हल्लींच्या काळीं कम्युनिस्टांना आणि सरकारला हि भितात. आतां जर ते बाबाला हि भिऊं लागले तर त्यांना भय नाहीं कोठें? त्यांनीं कमीत कमी बाबाला तरी भिऊं नये व भ्यायची एखादी जागा तरी ठेवावी. बाबाला भ्यायचें कांहीं कारण नाहीं. तो बिचारा शेळीसारखा गरीब आहे. तुम्ही शेळीचें दूध काढूं शकता. पाहिजे तर तिला मारून खाऊं हि शकतां. बाबाजवळ कसली हि सत्ता नाहीं आणि त्याला ती नको हि आहे बाबा आपल्या कामासह तुमच्या हातांत च आहे असें तो समजतो. व्यापाऱ्यांनीं माझें काम आपलें आहे असें समजून हातीं घेतलें तर ते स्वतः वांचतील आणि भारताला हि वांचवतील. हें तुम्हांला पसंत नसेल तर बाबा रिक्त हातानें निघून जाईल. नुसतें समजावून देणें हें त्याचें काम आहे. फक्त समजावून सांगण्याची सत्ता त्याच्या हातीं आहे. ती सत्ता हि कोठल्या सत्तेमुळें वा संस्थेमुळें त्याला प्राप्त झालेली नाहीं. म्हणून बाबाला भिण्याचें कांहीं कारण नाहीं.

### वैश्यधर्म

मी जो संपत्तिदानाचा विचार काढला आहे त्यामुळें धनिकांची प्रतिष्ठा वाढेल असें मी मानतों. आज हिंदुस्थानचें आणि जगाचें हि व्यापारीवर्गाशिवाय चालत नाहीं. प्रत्येक गोष्टींत त्यांची मदत घेतली जाते. तरी हि सर्व लोक त्यांच्यामागें त्यांना शिव्या देतात. त्यांत कांहीं दोष लोकांचा आहे आणि कांहीं व्यापाऱ्यांचा हि आहे. आमच्या धर्मशास्त्रांत 'वाणिज्य' हा व्यापाऱ्याचा धर्म सांगितला आहे. जगांतल्या कोणत्या हि धर्मांत असें सांगितलेलें तुम्हांला आढळणार नाहीं. सत्य, प्रेम, दया, करुणा सर्व धर्मांत आहे पण वाणिज्य हि एक धर्म ही गोष्ट फक्त हिंदुधर्मांत सांगितलेली आहे. '**कृषि गोरक्ष्य वाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम्।**' वेदाध्ययन

तुमच्याजवळ संपत्तिदान मागितलें आहे. तुम्ही दहा रुपयांत चांगल्या पान विड्या बनवून खाल कारण तुम्हांला आवड आहे. आम्ही अप्रामाणिक झालों तर काम च होणार नाहीं. पण प्रामाणिकपणें काम केलें तरी त्या पैशांत आमच्या दोन च विड्या होतील कारण आम्हांला तितकी आवड नाहीं. पैशाचा उत्तमांत उत्तम उपयोग करण्याची अक्कल व्यापाऱ्यांमध्यें असते कारण त्यांची तशी परंपरा आहे. म्हणून संपत्तिदानांतला पैसा मी माझ्या हातीं घेत नाहीं. व्यापारी आपल्या घरांत जो पैसा खर्च करतो त्यांत च सहाव्या भागाचा समावेश करून त्याचा हिशेब त्यांनीं दानांत द्यावा असें मी मागतों. तुमच्या घरीं माझा इतका पैसा आहे इतकें लिहून तो कागद मला द्या. मग त्याचा खर्च तुम्ही च करा. हिशेब हि तुम्ही च ठेवा, आणि तो हिशेब दरवर्षी मला दाखवा म्हणजे झालें. मला लाखों रुपयांचें संपत्तिदान मिळालें आहे. पण मी एका पैशाला हि शिवलों नाहीं. तसें केलें असतें तर रात्रीं चांगली झोंप हि आली नसती. कारण मग हिशेबाची चिंता लागली असती आणि पापाची अब्रू धोक्यांत आली असती. पण आज प्रत्येक घरीं माझी बँक आहे, प्रत्येक घरीं बँकर हि आहे, मग मला चांगली झोंप कां लागूं नये ! तुम्हांला हिशेब ठेवावा लागतो त्यामुळें चांगली झोंप लागत नसेल. पण तें स्वाभाविक आहे. कारण तो तुमचा धर्म च आहे. तुम्हाला चांगली झोंप लागली तर मोक्ष मिळणार नाहीं आणि मला चांगली झोंप मिळाली नाहीं तर मोक्ष मिळणार नाहीं. संपत्तिदानाची अशी खुबी आहे की मी तुमची नुसती संपत्ति मागत नाहीं. तुमची बुद्धि हि मागतों. तुम्ही तुमची बुद्धि स्वार्थाला लावून संपत्ति तेवढी परमार्थाला द्यावी हें ठीक नाहीं. तुम्हीं तुमची बुद्धी हि परमार्थाकडे लावली पाहिजे.

### भारतीय व्यापाऱ्यांची जबाबदारी

आज देशांत एवढें मोठें काम होऊन राहिलें आहे. लाखों लोकांनीं जमीन दिली आहे. येथें मदुरा जिल्ह्यांत पन्नासाहून ज्यास्त ग्रामदानें झालीं आहेत. तेथल्या लोकांनीं आपली मालकी सोडली आहे. जेव्हां लोक इतका त्याग करीत आहेत तेव्हां व्यापाऱ्यांनीं त्यांच्या मदतीला धांवलें पाहिजे.

दुसरी जमिनी मिळवीत नका. त्यांची व्यवस्था लावायला मला आमचा असें वेद जर मला लागू पाडतील तर त्यांची प्रतिष्ठा वाढेल. व्यापारी आज सेवा करीत आहेत. तरी हि त्यांची गणना देशसेवकांत होत नाहीं. पण जर ते संपत्तिदानाचें काम हातीं घेतील तर ते सेवक होतील आणि त्यांची शक्ति प्रकट होईल. व्यापारी जर परोपकारी असतील तर कोणता हि उद्योग त्याच्या हातीं राहिल्यानें तो ज्यास्त चांगला चालेल. प्रत्येक उद्योग सरकारच्या हातांत जाण्यांत कल्याण आहे असें मी मानीत नाहीं. आज सरकार आणि व्यापारी यांच्यामध्यें झगडा आहे आणि व्यापारी आणि ग्राहक यांच्यामध्ये हि. व्यापारी जर देशसेवक असतील तर असा तंटा होण्याचें काय कारण आहे? मी हें सगळें नाहींसें करूं इच्छितो. मला जी जमीन मिळाली आहे तिची व्यवस्था लावायचें काम व्यापाऱ्यांनीं हातीं घ्यावें. मग ती जमीन चांगली करण्याकरितां सरकारकडे मदत मागण्याची जरूरी राहणार नाहीं. हिंदुस्थानचे व्यापारी जर याप्रमाणें करतील तर जगांत त्यांची प्रतिष्ठा वाढेल. आज हिंदुस्थानचे शेतकरी आपली जमीन दान देत आहेत, मालकी सोडीत आहेत. त्यामुळें त्यांचें जगांत नांव झालें आहे. त्याप्रमाणें च व्यापाऱ्यांनीं हि भूमिहीनांना जमीन कसण्याला मदत केली तर त्यांचें हि नांव होईल. त्याचा जगावर हि प्रभाव पडेल.

## भूमिहीन मजुरांना बोनस मिळावा

आज तुमच्या गिरण्या आहेत. त्यांत काम करणाऱ्या मजुराला ठीक पगार द्यावा लागतो. तसा दिला नाहीं तर तंटे होतात. आरबिट्रेशन होतें. फायद्याचा हिस्सा हि बोनसच्या रूपात द्यावा लागतो. हें सर्व ठीक च आहे. पण तुमचा कापूस कोठून आला? तो कोणीं पेरला? कपाशीच्या शेतांत काम करणारे जे भूमिहीन मजूर आहेत त्यांना बोनस मिळायला नको का? पण तुम्हाला त्याची आठवण हि होत नाहीं. फक्त गिरणीच्या मजुरांची तरतूद होते. ती हि जबरदस्तीनें. मिल मजुरांच्या संरक्षणाच्या संस्था आहेत म्हणून त्यांचा आवाज तुम्हाला ऐकावा लागतो; परतु जे मुके आहेत, बोलूं शकत नाहींत, सर्वांत खालच्या थरावर आहेत, दबलेले आहेत, सगळ्यांचा च भार ज्यांच्यावर पडत आहे त्या भूमिहीन मजुरांच्या श्रमानें च कापूस

तुम्हांला मिळतो. तेव्हां तुमच्या फायद्याचा एक हिस्सा त्यांना कां मिळूं नये ? प्रेमानें तसा तुम्ही वाल तर हृदयाशी हृदय मिळून जाईल.

## धर्महीन लोक आपल्या सांवलीला भितात

तुम्ही लोक बाबाला भितां असें जेव्हा मीं ऐकलें तेव्हां मला मोठें आश्चर्य वाटलें. असा भीति दाखविणारा माणूस पांच वर्षें कसा फिरत राहिला असता हें तुमच्या लक्षात यायला हवें होतें. या रेल्वेच्या युगांत पायीं चालणारा माणूस भीति उत्पन्न करूं शकतो का ? त्याला जर तुमच्यात भय उत्पन्न करायचें असतें तर तो कॉंग्रेसमध्ये किंवा सरकारमध्यें गेला असता. हातांत शस्त्र घेऊन त्यानें हल्ला केला असता. आज एकदां च तुमच्या गांवीं आलों आहे. दुसऱ्यांदा कधीं येण्याचा संभव नाहीं. तोंपर्यंत यमराज हि मला घेऊन जायचा. असला माणूस तुमच्यामध्यें भय उत्पन्न करायला का येतो ? वेदान्तामध्यें नेहमीं एक गोष्ट येते कीं, दोरीला भिऊं नये; पण माणूस दोरीला नेहमी भितो कारण तिचा आकार कांहींसा सापासारखा असतो. बाबा तर सर्व सत्ता सोडून आला आहे. प्रेमानें जमीन मागत आहे आणि लाखों लोक देत आहेत. मग जो माणूस जन्मांत एकदां च तुमच्या गावीं आला, तो भीति दाखवणारा आहे असें तुम्हांला वाटलें तरी कसें ? लोक हिटलरला भितात. बाबाला भिण्याचें कांहीं कारण नाहीं.

पण जे भित्रे असतात ते प्रत्येक गोष्टीला च भितात. आपल्या सांवलीला हि भितात. आपल्या बरोबर च छाया येते. त्याना वाटतें भूत पाठीमागें लागलें आहे. जीवनामध्यें धर्मविचार असला पाहिजे. तो ज्यांच्यामध्यें नसतो त्याना असें भय वाटतें. ते लोक प्रत्येकाला भितात. घरावर पक्षी बसला तर अपशकून झाला असें समजून ब्राह्मणाला दान देतात. तुम्ही लोकांनीं असली भीति सोडून द्यावी आणि धर्माचरण करावें म्हणजे तुम्ही हिंदुस्थानचे पुढारी व्हाल. व्यापाऱ्याशिवाय देशाचें चालणार नाहीं. कमींत कमी १००–२०० वर्षें तरी त्यांची आवश्यकता आहे. त्यानंतर विकेंद्रित व्यवस्था होऊन गेली तर त्यांची जरूरी लागणार नाहीं. याप्रमाणें ज्यांची आवश्यकता आहे त्यांनीं सज्जनाला कां भ्यावें ?

## सर्वोदयांत धनिकांचें हित

म्हणून भीतीचें कांहीं कारण नाहीं हें तुम्हीं समजून घेतलें पाहिजे. मी फक्त हिस्सा च मागतों. तुमच्या शक्तीच्या बाहेरची गोष्ट मागत नाहीं. माझी एवढी मागणी जर तुम्हीं पुरी कराल तर हिंदुस्थानचा व्यापारीवर्ग इतका उंच होईल की त्याला धर्मप्रतिष्ठा लाभेल. त्यांचा नैतिक स्तर उंच होईल. येथें व्यापाऱ्यांना 'महाजन' म्हणतात 'महाजनो येन गतः स पंथाः।' 'महाजन' म्हणजे समाजांतले श्रेष्ठ लोक. त्यांत व्यापारी हि आले. जुन्या काळीं लोक काशीयात्रेला जात तेव्हां आपली संपत्ति व्यापाऱ्यांजवळ ठेवीत. कांहीं कागदपत्र हि करीत नसत. लोकांचा व्यापाऱ्यांवर एवढा भरंवसा होता, एवढी श्रद्धा होती. परंतु आज तो विश्वास राहिलेला नाहीं. आमच्यामध्यें आणि ग्राहकांमध्यें विश्वास नाहीं. एवढें च काय, बापलेकांत हि विश्वास नाहीं. श्रीमंत माणूस आपल्या मुलाला हि भितो. तिजोरीची किल्ली त्याच्या हातीं देत नाहीं. ब्राह्मण लोक यज्ञोपवीत वापरतात. तें आतां किल्ली उपवीत झालें आहे. कारण किल्ली लावण्यापुरतें च तें कामाचें उरलें आहे. बाप मरेल तेव्हां त्याच्या जानव्यांतून मुलगा किल्ली काढून घेईल. शंकराचार्यांनीं हि लिहिलें आहे कीं, 'पुत्रादऽपि धनभाजां भीतिः।' धनिकांना मुलाचें हि भय वाटतें. याचें कारण हिंदुधर्मानें जी तुम्हांला प्रतिष्ठा दिली होती ती तुम्ही घालवून बसलां आहांत.

माझें काम देशांतील गरिबांच्या तर हिताचें आहे, पण तुमच्या हि हिताचें आहे ही गोष्ट ध्यानांत घ्या. म्हणून च त्याला 'सर्वोदय' म्हणतात. यांत सर्वांचा उदय होतो. आजपर्यंत समाजांत जेव्हां एकाची उन्नति होत होती तेव्हां दुसऱ्याची अवनति होत होती. एक चढे तेव्हां दुसरा पडे. कम्युनिस्ट हि मानतात कीं, एकाच्या हितांत दुसऱ्याचें अहित आहे. पण सर्वोदय सांगतो कीं, एकाचें हित दुसऱ्याच्या विरुद्ध नाहीं. एकाच्या भल्यांत दुसऱ्याचें हि भलें च आहे. माझा दावा आहे कीं, माझ्या कामानें गरिबांचें जेवढें हित होत आहे त्यापेक्षां श्रीमंतांचें हि हित कमी नाहीं. माझा दुसरा दावा असा आहे कीं, गरिबांविषयीं माझ्या मनांत जितकें प्रेम आहे तितकें

च प्रेम श्रीमंतांविषयीं हि आहे. हे माझे दोन्ही दावे योग्य आहेत असें तुम्हांला वाटलें तर तुम्ही माझें काम हातीं घ्या.

## जनतेला व्यापाऱ्यांचें पुढारीपण पाहिजे

व्यापाऱ्यांनीं हे काम हातीं घेतलें तर ते जनतेचे पुढारी होतील असें माझें म्हणणें आहे. त्यांच्याजवळ बुद्धि आहे, व्यवस्थाशक्ति आहे. अशा स्थितींत त्यांनीं हे आंदोलन हातीं घेतलें तर मूल जसें आपल्या आईबापांवर विश्वास टाकतें त्याप्रमाणें समाज हि तुमच्यावर विश्वास ठेवील. आज व्यापाऱ्यांविषयीं जनतेच्या मनात अविश्वास आहे. असा अविश्वास असायचें काहीं विशेष कारण नाहीं. व्यापाऱ्यांची एक विशेष जात आहे आणि ती च तेवढी अवनत झाली आहे असें नाहीं. सर्व समाजाचा च अधःपात झाला आहे. त्यात व्यापारी हि आले. पण लोक व्यापाऱ्यांना तेवढ्या शिव्या देतात. मी ते चांगल्या अर्थानें घेतों. लोकांना व्यापाऱ्यांचें नेतृत्व पाहिजे आहे. ते व्यापाऱ्यांकडून ज्यास्त अपेक्षा करतात. त्या पूर्ण होत नाहींत, तेव्हा शिव्या देतात. शिव्या द्यायच्या असतील तर सर्वांना च दिल्या पाहिजेत. कारण देशाचा च अधःपात झाला आहे. पण लोक सर्वांना शिव्या देत नाहींत, व्यापाऱ्यांना तेवढ्या देतात. यात व्यापाऱ्यांचा गौरव आहे. त्याचा अर्थ असा आहे कीं, व्यापारी बुद्धिमान् आहे, कुशल आहे, म्हणून त्याच्याकडून ज्यास्त अपेक्षा केली जात आहे. म्हणून आज जो ग्रामदान, भूदान याचा विशाल कार्यक्रम तुमच्यापुढे आहे तो यशस्वी करण्याचें काम तुम्हीं हातीं घेतलें पाहिजे. तुमच्या व्यापाराबरोबर च संपत्तिदान हा हि एक व्यापार आहे असें समजून तो हातीं घेतला पाहिजे.

मदुरा तामीलनाड
३०-१२-५६

आज नव्या वर्षाचा दिवस आहे. परमेश्वरी कृपेचें नवीन वर्ष आमच्याकरितां खुले झाले आहे. जुने जीवन बदलून टाकायचा आज आपण निश्चय केला पाहिजे. आमच्यामध्यें पुष्कळ वाईट गोष्टी आहेत. आमचें अंतःकरण अगदी कोते झाले आहे. दुसऱ्याचा विचार च करीत नाहीं, आपल्यापुरतें च पाहतें. हें सर्व बदलून टाकण्याचा आम्हीं निश्चय केला पाहिजे. आम्ही आमच्यापुरता च विचार करणार नाहीं, सगळ्या समाजाचा व गांवाचा हि विचार करूं, असे ठरविले पाहिजे.

## देण्याचा धर्म सर्वांसाठीं

कित्येकांना वाटतें, देण्याचें काम फक्त मोठ्या लोकांचें च आहे. आम्हीं फक्त घ्यायचें आहे, द्यायचें काहीं नाहीं. परंतु देवानें आम्हाला जे दोन हात दिले आहेत ते फक्त घेण्याकरितां नाहींत, देण्याकरिता हि आहेत. प्रत्येकजण जेव्हां समाजाला कांहीं देईल तेव्हां धर्म वाढेल. त्यांच्याजवळ जमीन आहे ते जमीन देतील, संपत्ति आहे ते संपत्ति देतील, बुद्धि आहे ते बुद्धि, शक्ति आहे ते शक्ति. ज्याच्याजवळ यापैकीं काहीं च नाहीं ते आपले प्रेम देतील. ज्याच्याजवळ द्यायला काहीं च नाहीं अशी जगांत कोणी हि व्यक्ति असूं शकत नाहीं. आपल्याजवळ जे असेल ते त्यानें दिलें पाहिजे. हा सूर्यनारायण पहा. तो सारखा देत च आहे. नद्या, डोंगर असें सर्व सृष्टि नेहमीं देत च असते. हें आपण सृष्टीपासून शिकलें पाहिजे. नारळाच्या झाडापासून जे कांहीं देण्यासारखे आहे ते सर्व तें देतें. मालें काय होईल याची तें चिंता करीत नाहीं लोक च त्याची काळजी घेतात, पाणी देतात आणि खत हि घालतात.

जो देत नाहीं त्याला काहीं धर्म नाहीं. तो धर्महीन होऊन जातो. प्रत्येक मनुष्यासाठीं परमेश्वरानें धर्म उत्पन्न केला आहे. मजुराजवळ जमीन नाहीं पण श्रमशक्ति आहे. तेव्हां तो गांवाला श्रमदान देऊं शकतो. जो अशा

घराला कोणी आग लागली आहे म्हणून सांगायला आला तर ती विझवून टाक असें मी त्याला सांगूं शकतों.

## ग्रामदान गोड आहे

आतां ग्रामदानाची गति वाढत आहे. नदी सुरुवातीला लहान असते. वाढात वाढात मोठी होते. ही त्यागाची नदी फार मोठी होणार आहे. लोक विचारतात, 'किती ग्रामदानें मिळविण्याची तुम्ही आशा करतां ?' मी सांगतों कीं, 'हिंदुस्थानात पाच लाख गांवें आहेत. तेव्हां पांच लाख गांवें हि मला पाहिजे आहेत.' तेव्हा ते म्हणतात, 'तुम्ही केवढी मोठी गोष्ट बोलतां ? काहीं कमी करा. पाचच्या पांच लाख गावें पूर्ण ग्रामदान कसे होईल ?' मी त्याना विचारतों कीं, 'हिंदुस्थानांतले किती लोक गूळ खातील ?' छत्तीस कोट लोक खातील यात मुळीं च शंका नाहीं; कारण गूळ गोड आहे. त्याप्रमाणें च ग्रामदान हें कडू नाहीं. गांवची जमीन सर्व मिळून करतील, वांटून खातील. तेव्हां ग्रामदानाची गोडी सगळ्यांना माहीत होईल आणि सर्व लोक ग्रामदान करतील. '**तेनाहि अमुदाहि तितिक्कुम शिवपेरुमाल।**' शिवपेरुमाल हें अमृतासारखें गोड आहे. शिव-भगवंतांना ते चाखण्याची हि जरुरी नाहीं. पाहाता च गोड आहे हे दिसतें. त्याप्रमाणे च ग्रामदान हि फार मधुर आहे ती अत्यंत मंगल वस्तु आहे. ती शिव आहे. त्याची भक्ति करायला आम्ही शिकायचें आहे.

कुमारन् (मदुरा)
१-१-५७

हें ग्रामदानी गांव आहे. आज गांववाल्यांनीं फार चांगला प्रश्न विचारला आहे. तसा प्रश्न आजपर्यंत कोणीं विचारला नव्हता. त्यांनीं विचारलें आहे कीं, 'आम्ही तर प्रेमानें खाऊं-पिऊं, गांवाची सामूहिक मालकी करूं, तर दुसऱ्या गांवच्या मित्रांना आम्ही कांहीं देऊं शकूं कीं नाहीं ?' 'फिरका दान' होईल तर हा प्रश्न च उत्पन्न होणार नाहीं तुमच्या शेजारचें गांव हि ग्रामदानांत आलें असेल तर असला प्रश्न उत्पन्न होणार नाहीं. त्यांनीं कर्जासंबंधीं प्रश्न विचारला. त्याचें उत्तर असें कीं, सावकाराला हि कांहीं समजावून देऊं. कांहीं कर्ज माफ करायला सांगूं. कांहीं पिकांचा भाग देऊं; पण सर्व हिंदुस्थानांतल्या सर्वच्या सर्व गावांत ग्रामदान होईल तेव्हां कोणत्या हि गांवांत कर्ज च राहाणार नाहीं. कर्जाचे कागद फाडून टाकले जातील. हिंदुस्थानांतली मालकी च गेली तर कर्ज हि खलास होऊन जाईल. कोणी देणार नाहीं, कोणी घेणार नाहीं. सर्व ठिकाणीं ग्रामदानाची हवा पसरली तर प्रश्न च उत्पन्न होणार नाहीं.

**स्वतः प्रचारक व्हा**

तुम्हीं लोकांनीं आपलें गाव ग्रामदानांत दिल्यावर स्वस्थ बसणें ठीक नाहीं. ग्रामदानानंतर ग्रामराज्य करायचें आहे. मग दुसऱ्या गांवीं जाऊन आपल्या आप्तस्वकीयांना सांगायचें कीं, 'आम्ही आजपर्यंत तुम्हांला कांहीं ना कांहीं रोज मदत करीत होतों. पण आतां फार मोठी मदत तुम्हांला देऊं इच्छितों. आतां आम्ही तुम्हांला विचार देणार आहों. आम्हीं जसें ग्रामदान केलें आहे तसें तुम्हीं हि करा. आम्हीं खूप मिठाई खाली आहे. आतां तुम्हीं हि खा.' याप्रमाणें ग्रामदानी लोकांनीं दुसऱ्या गांवीं जावें. तेथल्या लोकांना समजावून द्यावें. माझ्याबरोबर जशीं प्रश्नोत्तरें झालीं तशीं दुसऱ्यांच्याशीं करावीं. त्यांना समजावून देऊन त्यांचें हि गांव ग्रामदानी

एक काळ असा होता की, त्या वेळीं देशांतले लोक नवीन नवीन तपश्चर्या करीत असत. फार जुन्या काळापासून हिंदुस्थानांत धर्मविचार दृढ झाला आहे. धर्माची शिकवण लोकांच्या अंतःकरणांत आणि बुद्धींत नेहमीं राहिलेली आहे. धर्म केवळ ग्रंथामध्यें राहात नाहीं. त्या ग्रंथांचा प्रभाव जनतेवर हि होतो. जसजसे नवे विचार दिसूं लागतात, तसतसें लोकांचे समोर तपश्चर्येचे नवे प्रकार उभे राहातात. उन्हांत किंवा पावसांत उभें राहाणें हा तपश्चर्येचा अर्थ नाहीं. समाजाच्या शुद्धीकरितां आणि उन्नतीकरितां केले जाणारे परिश्रम म्हणजे च तपश्चर्या. याप्रमाणें समाजशुद्धीकरितां नवीन नवीन आंदोलनें आणि तीं चालविणारे महापुरुष या देशांत उत्पन्न झाले. भारताचा सर्व इतिहास या समाजशुद्धीच्या आंदोलनाने भरलेला आहे. भारतांत मोठमोठीं साम्राज्यें हि होऊन गेलीं; पण त्यांचा स्थायी प्रभाव राहिला नाहीं. तीं ज्या काळांत झालीं त्या काळापुरता च आणि बाह्यजीवनापुरता च त्यांचा प्रभाव पडला. लोकांच्या आंतरिक जीवनावर त्यांचा विशेष प्रभाव पडला नाहीं.

**माणिक्यवाचकर यांनीं मुख्य प्रधानपद सोडलें**

आज आम्ही ज्या गांवांत आलों आहो ते गांव फार प्रसिद्ध आहे. या ठिकाणीं एक महापुरुष होऊन गेला. त्याचा प्रभाव सर्व समाजावर पडलेला आहे. ते हि एका साम्राज्याचे प्रधानमंत्री होते. परंतु प्रधानमंत्री राहून आपण देशाची विशेष कांहीं सेवा करूं शकत नाहीं असें त्यांना आढळून आलें. कांहीं थोड्या सुखसोयी करता येतात. परंतु राजसत्तेनें समाजजीवन बदलणें शक्य नाहीं. म्हणून त्यांनीं तें पद सोडून ते फकीर बनले. तामिलनाडमध्यें दुसरे प्रधानमंत्री कमी झालेले नाहींत. आपआपल्या गांवीं त्यांनीं कांहीं काम हि केलें परंतु माणिक्यवाचकर यांनीं बुद्धाप्रमाणें आपलें मोठें पद सोडून जनसेवेचें व्रत घेतलें. म्हणून च त्यांची खरी प्रतिष्ठा

आहे. म्हणून च दुसऱ्या असंख्य लोकांच्या तुलनेनें समाजावर त्यांचा अधिक प्रभाव पडलेला आहे.

### कोल्ह्याचा घोडा कसा बनेल ?

त्यांच्याविषयीं एक दंतकथा आहे. देवानें त्यांच्यासाठीं कोल्ह्याचे घोडे बनविलें. कोल्हा मुत्सद्दी आहे. वाघ शूर वीर आहे. परंतु माणिक्य-वाचकरनें जेव्हां पाहिलें कीं, मुत्सद्दी लोकांचा हिंदुस्थानच्या जीवनावर कांहीं प्रभाव पडत नाहीं, हें जेव्हां त्याच्या लक्षात आलें तेव्हां तो राज्य सोडून समाजसेवक बनला. मग तामिलनाडमध्यें संचार करीत राहिला. त्याचें पुढील जीवन फार वेगशाली राहिलें. सर्व राजकारण सोडून केवळ समाजसेवा करणारे ते घोड्यासारखे वेगवान बनले. त्यांच्या संमतीमुळे राजकारणाचा विचार दुसऱ्या लोकांनीं हि सोडून दिला. ते हि लोकसेवेला लागले. कोल्ह्याचें घोडें बनलें त्याची ही कहाणी आहे.

असा चमत्कार पुन्हां देशांत घडावा अशी माझी इच्छा आहे. त्या-करितां डोक्याचे काम सोडून हातानें सेवा केली पाहिजे. माणिक्यवाचकरनें स्वतःच लिहिलें आहे—'**कट्टारैयान वेंडेन करपडम् इनीअम् युम**' याचा अर्थ असा कीं, विद्वानांची सगति मिळावी अशी यापुढें माझी इच्छा नाहीं त्याचें चातुर्य आणि कल्पना आतां पुरेत. म्हणजे याच्यापुढें कोल्ह्याचें काम नाहीं. त्याला अगदीं विरक्ति आली. त्यानें ईश्वराचा आधार घेतला. त्यानें वारंवार म्हटले आहे कीं ईश्वर माझ्या हृदयांत आहे. तो च स्वतः च काम करीत आहे. माणिक्यवाचकरच्या या राजकारणाचा आणि ऐश्वर्यांचा त्याग आणि समाजसेवा याचा प्रभाव अजून हि तामिल समाजावर आहे.

### पोतनाची कहाणी

तेलगू भाषेत 'पोतना'ची एक गोष्ट आहे. ते शेतांत काम करीत आणि भागवत लिहीत. तेलगू भाषेत पोतनाचा ग्रंथ च बहुधा सर्वांत प्रसिद्ध आहे. ते शेवटपर्यंत शेतकऱ्याचें च.काम करीत राहिले. ग्रंथ पुरा झाला तेव्हां तो ग्रंथ राजाला अर्पण करावा अशी कोणीं त्यांना सूचना केली तेव्हां ते

एक काळ असा होता कीं, त्या वेळीं देशांतले लोक नवीन नवीन तपश्चर्या करीत असत. फार जुन्या काळापासून हिंदुस्थानांत धर्मविचार दृढ झाला आहे. धर्माची शिकवण लोकांच्या अंतःकरणांत आणि बुद्धींत नेहमीं राहिलेली आहे. धर्म केवळ ग्रंथांमध्ये राहात नाहीं. त्या ग्रंथांचा प्रभाव जनतेवर हि होतो. जसजसे नवे विचार दिसूं लागतात, तसतसें लोकांचे समोर तपश्चर्येचे नवे प्रकार उभे राहातात. उन्हात किंवा पावसांत उभें राहाणें हा तपश्चर्येचा अर्थ नाहीं. समाजाच्या शुद्धीकरितां आणि उन्नतीकरितां केले जाणारे परिश्रम म्हणजे च तपश्चर्या. याप्रमाणे समाजशुद्धीकरितां नवीन नवीन आंदोलनें आणि तीं चालविणारे महापुरुष या देशांत उत्पन्न झाले. भारताचा सर्व इतिहास या समाजशुद्धीच्या आंदोलनानें भरलेला आहे. भारतात मोठमोठीं साम्राज्यें हि होऊन गेलीं; पण त्यांचा स्थायी प्रभाव राहिला नाहीं. तीं ज्या काळांत झालीं त्या काळापुरता च आणि बाह्यजीवनापुरता च त्याचा प्रभाव पडला. लोकांच्या आंतरिक जीवनावर त्यांचा विशेष प्रभाव पडला नाहीं.

## माणिक्यवाचकर यांनीं मुख्य प्रधानपद सोडलें

आज आम्ही ज्या गांवात आलों आहों तें गाव फार प्रसिद्ध आहे. या ठिकाणीं एक महापुरुष होऊन गेला. त्याचा प्रभाव सर्व समाजावर पडलेला आहे. ते हि एका साम्राज्याचे प्रधानमंत्री होते. परंतु प्रधानमंत्री राहून आपण देशाची विशेष कांहीं सेवा करू शकत नाहीं असे त्यांना आढळून आलें. कांहीं थोड्या सुखसोयी करतां येतात. परतु राजसत्तेनें समाजजीवन बदलणें शक्य नाहीं. म्हणून त्यांनीं ते पद सोडून ते फकीर बनले. तामिलनाडमध्यें दुसरे प्रधानमंत्री कमी झालेले नाहींत. आपआपल्या गावीं त्यांनीं कांहीं काम हि केलें परंतु माणिक्यवाचकर यांनीं बुद्धाप्रमाणे आपलें मोठें पद सोडून जनसेवेचें व्रत घेतलें. म्हणून च त्यांची खरी प्रतिष्ठा

आहे. म्हणून च दुसऱ्या असंख्य लोकांच्या तुलनेनें समाजावर त्यांचा अधिक प्रभाव पडलेला आहे.

## कोल्ह्याचा घोडा कसा बनेल ?

त्यांच्याविषयीं एक दंतकथा आहे. देवानें त्यांच्यासाठीं कोल्ह्याचें घोडें बनविलें. कोल्हा मुत्सद्दी आहे. वाघ शूर वीर आहे. परंतु माणिक्यवाचकरनें जेव्हां पाहिलें कीं, मुत्सद्दी लोकांचा हिंदुस्थानच्या जीवनावर कांहीं प्रभाव पडत नाहीं, हें जेव्हां त्याच्या लक्षांत आलें तेव्हां तो राज्य सोडून समाजसेवक बनला. मग तामिलनाडमध्यें संचार करीत राहिला. त्याचें पुढील जीवन फार वेगशाली राहिलें. सर्व राजकारण सोडून केवळ समाजसेवा करणारे ते घोड्यासारखे वेगवान बनले. त्यांच्या संमतीमुळें राजकारणाचा विचार दुसऱ्या लोकांनीं हि सोडून दिला. ते हि लोकसेवेला लागले. कोल्ह्याचें घोडें बनलें त्याची ही कहाणी आहे.

असा चमत्कार पुन्हा देशात घडावा अशी माझी इच्छा आहे. त्याकरितां डोक्याचें काम सोडून हातानें सेवा केली पाहिजे. माणिक्यवाचकरनें स्वतःच लिहिलें आहे—'**कट्टारैयान वेंडेन करपडम् इनीअम् युम**' याचा अर्थ असा कीं, विद्वानाची गति मिळावी अशी यापुढें माझी इच्छा नाहीं त्याचें चातुर्य आणि कल्पना आतां पुरेत. म्हणजे याच्यापुढं कोल्ह्याचें काम नाहीं. त्याला अगदीं विरक्ति आली. त्यानें ईश्वराचा आधार घेतला. त्यानें वारंवार म्हटलें आहे कीं ईश्वर माझ्या हृदयांत आहे. तो च स्वतः च काम करीत आहे. माणिक्यवाचकरच्या या राजकारणाचा आणि ऐश्वर्याचा त्याग आणि समाजसेवा याचा प्रभाव अजून हि तामिल समाजावर आहे.

## पोतनाची कहाणी

तेलगू भाषेंत 'पोतना'ची एक गोष्ट आहे. ते शेतांत काम करीत आणि भागवत लिहीत. तेलगू भाषेंत पोतनाचा ग्रंथ च बहुधा सर्वांत प्रसिद्ध आहे. ते शेवटपर्यंत शेतकऱ्याचें च.काम करीत राहिले. ग्रंथ पुरा झाला तेव्हां तो ग्रंथ राजाला अर्पण करावा अशी कोणीं त्यांना सूचना केली तेव्हां ते

करावें. याप्रमाणें ग्रामदानी लोकांची एक जमात बनविणें हा तुमचा धर्म आहे. नाहीं तर बाबा आणि त्याचे कार्यकर्ते किती गांवीं जातील ? तुम्ही हि बाबाचे कार्यकर्ते नाहीं का ? तुम्हीं दुसऱ्या गांवीं जाऊन ग्रामदानाचा विचार समजून घ्यायला तयार झालें पाहिजे.

## ग्रामदानानें सरकारचा रंग च पालटेल

कधीं कधीं लोक विचारतात कीं, 'तुम्हाला पुष्कळ ग्रामदानें मिळालीं आहेत. आतां नवीन गांवें घेत कां फिरतां ? तीं गांवें च चांगलीं बनवून दाखवा !' मी सांगतों कीं, 'तुमच्या लक्षांत येत नाहीं. हीं ग्रामदानें थोड्याशा दह्यासारखीं आहेत. भोंवतालचीं गांवें दूध आहेत. त्या सर्वांचें दहीं बनवायचें आहे. तुम्ही तुमच्या गांवचें दहीं या गावच्या दुधात मिसळून द्या म्हणजे सर्वच्या सर्व दहीं होऊन जाईल. मग पहा सरकारची किती मदत मिळते ती. आता ८० गांवें मिळालीं आहेत. तरी ग्रामदानी गांवांना कशी मदत करावी याचा सरकार विचार करूं लागलें आहे. एक स्वतंत्र अधिकारी हि त्यांनीं नेमावयाचा ठरविला आहे. कारण एवढें मोठें काम होत आहे तेव्हां आपण हि काहीं केले पाहिजे असें सरकारला वाटतें. पण जेव्हां सर्वच्या सर्व गावें ग्रामदानात येतील तेव्हां एका ऑफिसरनें कसें काम भागेल ? सरकारची रचना च बदलून जाईल. कायदा हि बदलला जाईल.

## दुसऱ्यांना आपल्यासारखें करा

तुमची शक्ति कमी नाहीं तुम्ही परमेश्वररूप आहा. तुमच्या अंतःकरणात एक ज्योति आहे. तुम्ही जागे व्हा. हें सरकार बनविणारे तुम्ही च आहा. तुमच्या मतानें च सरकार बनतें. म्हणून सरकारचें हि सरकार तुम्ही आहांत. ग्रामदान तालुकादान होईल तेव्हां सरकारचा रंग च पालटून जाईल. मग कर्जाचा प्रश्न च राहणार नाहीं तुम्ही आपल्यासारखें च इतरांना करा ही जबाबदारी मीं ग्रामदानी लोकांचेवर टाकली आहे. जी गोड वस्तु तुम्ही खात आहांत ती दुसऱ्यांना हि खायला द्या. तुमची टोळीच्या टोळी निघाली पाहिजे. त्या गांवांवर तुमचा हल्ला च झाला पाहिजे. ग्रामदानाचें रामनामा-

-सारखें भजन करीत चला. प्रचार करण्याकरितां जाव आहां असें समजाल तर तुम्ही च बदलून जाल. तुम्ही बदलूं नका, त्यांना बदला आणि आपल्या-सारखें करा.

### टॉलस्टायची वासना

एका कार्यकर्त्यानें विचारलें कीं, 'सत्याग्रही, लोकसेवक राजकीय पक्षाचा सभासद होईल तर त्याला काय हरकत आहे का ?', त्यावर विनोबांनीं उत्तर दिलें कीं, 'आम्ही असें समजतो कीं, जी व्यक्ति कोणत्या हि पक्षाचा सभासद होईल ती आपली नैतिक शक्ति निश्चितपणें कमी करून घेईल. धार्मिक कार्य करणारांना राजकीय सत्तेपासून दूर राहिलें पाहिजे. जेथें आपण सांगितलें कीं, मी अमुक एका पक्षाचा आहें तेथें आपण दुसऱ्या पक्षाचे होऊं शकत नाहीं मी हिंदु आहे असें जेव्हां आपण म्हणालों तेव्हां आपण मुसलमान असत नाहीं. आम्ही तर सर्वांच्यावर सारखें प्रेम करण्याची इच्छा करतों.

आपण म्हणाला कीं, आम्ही या पक्षामध्यें असतों तेव्हा त्या पक्षांतील लोकांचेबरोबर संबंध हा येतो च. परंतु शारीरिक संबंध च फक्त येत नाहीं तर मानविक संबंध हि येतो. टाल्स्टॉयनें साठ वर्षांपूर्वी एक पुस्तक लिहिलें होतें. त्यात त्यानें लिहिलें आहे कीं, 'जमिनीची मालकी नष्ट झाली पाहिजे' त्या वेळीं माझा जन्म झाला. मला असें वाटतें कीं, कदाचित् त्यानें हें लिहून आपली वासना माझ्यात भरली असावी. आम्ही जनतेला लोकनीतीचा विचार देऊं इच्छितों. आपण जहाजांत बसून कोठें-तरी चाललों आहों. किनाऱ्यावरील जें प्रकाशगृह-दीपगृह आहे त्याचा आपल्याला मदत होते. आपण जर असें मानलें कीं, तें प्रकाशगृह देखील किनारा सोडून आपल्याबरोबर जहाजांत चढेल तर काय होईल ? दीपगृहा-प्रमाणें च जर कांहीं लोक राजनीतीपासून दूर राहिले तर ते देशाला हितकारक होईल. जगामध्यें असे कांहीं मुक्त पुरुष राहिले च पाहिजेत कीं ज्यांच्यामुळें जगासमोर एक चिरकालीन टिकणारें मूल्य राहील.

कल्लांदरी ( मदुरा )
३-१-'५७

एक काळ असा होता कीं, त्या वेळीं देशांतले लोक नवीन नवीन तपश्चर्या करीत असत. फार जुन्या काळापासून हिंदुस्थानांत धर्मविचार दृढ झाला आहे. धर्माची शिकवण लोकांच्या अंतःकरणात आणि बुद्धींत नेहमीं राहिलेली आहे. धर्म केवळ ग्रंथांमध्यें राहात नाहीं. त्या ग्रंथांचा प्रभाव जनतेवर हि होतो. जसजसे नवे विचार दिसूं लागतात, तसतसें लोकांचे समोर तपश्चर्येचे नवे प्रकार उभे राहातात. उन्हांत किंवा पावसांत उभें राहाणें हा तपश्चर्येचा अर्थ नाहीं. समाजाच्या शुद्धीकरितां आणि उन्नतीकरितां केले जाणारे परिश्रम म्हणजे च तपश्चर्या. याप्रमाणें समाजशुद्धीकरितां नवीन नवीन आंदोलनें आणि तीं चालविणारे महापुरुष या देशांत उत्पन्न झाले. भारताचा सर्व इतिहास या समाजशुद्धीच्या आंदोलनानें भरलेला आहे. भारतांत मोठमोठी साम्राज्यें हि होऊन गेलीं; पण त्यांचा स्थायी प्रभाव राहिला नाहीं. ती ज्या काळांत झाली त्या काळापुरता च आणि बाह्यजीवनापुरता च त्यांचा प्रभाव पडला. लोकांच्या आंतरिक जीवनावर त्यांचा विशेष प्रभाव पडला नाहीं.

## माणिक्यवाचकर यांनीं मुख्य प्रधानपद सोडलें

आज आम्ही ज्या गांवांत आलों आहो तें गाव फार प्रसिद्ध आहे. या ठिकाणीं एक महापुरुष होऊन गेला. त्याचा प्रभाव सर्व समाजावर पडलेला आहे. ते हि एका साम्राज्याचे प्रधानमंत्री होते. परंतु प्रधानमंत्री राहून आपण देशाची विशेष कांहीं सेवा करूं शकत नाहीं असे त्यांना आढळून आलें. कांहीं थोड्या सुखसोयी करता येतात. परंतु राजसत्तेनें समाजजीवन बदलणें शक्य नाहीं. म्हणून त्यांनीं ते पद सोडून ते फकीर बनले. तामिलनाडमध्यें दुसरे प्रधानमंत्री कमी झालेले नाहींत. आपआपल्या गावीं त्यांनीं कांहीं काम हि केलें परंतु माणिक्यवाचकर यांनीं बुद्धाप्रमाणें आपलें मोठें पद सोडून जनसेवेचे व्रत घेतलें. म्हणून च त्यांची खरी प्रतिष्ठा

आहे. म्हणून च दुसऱ्या असंख्य लोकांच्या तुलनेनें समाजावर त्यांचा अधिक प्रभाव पडलेला आहे.

## कोल्ह्याचा घोडा कसा बनेल ?

त्यांच्याविषयीं एक दंतकथा आहे. देवानें त्यांच्यासाठीं कोल्ह्यानें घोडें बनविलें. कोल्हा मुत्सद्दी आहे. वाघ शूर वीर आहे. परंतु माणिक्य-वाचकरनें जेव्हां पाहिलें कीं, मुत्सद्दी लोकांचा हिंदुस्थानच्या जीवनावर कांहीं प्रभाव पडत नाहीं, हें जेव्हां त्याच्या लक्षांत आलें तेव्हां तो राज्य सोडून समाजसेवक बनला. मग तामिलनाडमध्यें संचार करीत राहिला. त्याचें पुढील जीवन फार वेगळाली राहिलें. सर्व राजकारण सोडून केवळ समाजसेवा करणारे ते घोड्यासारखे वेगवान बनले. त्यांच्या संमतीमुळें राजकारणाचा विचार दुसऱ्या लोकांनीं हि सोडून दिला. ते हि लोकसेवेला लागले. कोल्ह्यानें घोडें बनलें त्याची ही कहाणी आहे.

असा चमत्कार पुन्हा देशांत घडावा अशी माझी इच्छा आहे. त्या-करितां डोक्याचें काम सोडून हातानें सेवा केली पाहिजे. माणिक्यवाचकरनें स्वतः च लिहिलें आहे—'**कटारैयान वेंडेन करपडम् इनीअम् युम**' याचा अर्थ असा कीं, विद्वानांची संगति मिळावी अशी यापुढें माझी इच्छा नाहीं त्यांचें चातुर्य आणि कल्पना आतां पुरेत. म्हणजे याच्यापुढें कोल्ह्याचें काम नाहीं. त्याला अगदीं विरक्ति आली. त्यानें ईश्वराचा आधार घेतला. त्यानें वारंवार म्हटलें आहे कीं ईश्वर माझ्या हृदयांत आहे. तो च स्वतः च काम करीत आहे. माणिक्यवाचकरच्या या राजकारणाचा आणि ऐश्वर्याचा त्याग आणि समाजसेवा याचा प्रभाव अजून हि तामिल समाजावर आहे.

## पोतनाची कहाणी

तेलगू भाषेंत 'पोतना'ची एक गोष्ट आहे. ते शेतांत काम करीत आणि भागवत लिहीत. तेलगू भाषेंत पोतनाचा ग्रंथ च बहुधा सर्वांत प्रसिद्ध आहे. ते शेवटपर्यंत शेतकऱ्याचें च काम करीत राहिले. ग्रंथ पुरा झाला तेव्हां तो ग्रंथ राजाला अर्पण करावा अशी कोणीं त्यांना सूचना केली तेव्हां ते

मनुष्याच्या समोर कांहीं ध्येय असतें. त्याच्याकरितां तपश्चर्या करावी लागली तर त्याचें माणसाला भान असत नाहीं. बाबा तपस्या करीत आहे, हजारों मैल चालत आहे. असें लोक म्हणतात. परंतु बाबाच्यापुढें एक मोठें ध्येय आहे. त्याच्या चिंतनांत त्याला विलक्षण आनंद वाटतो. पायीं पायीं यात्रा चालते, शुद्ध हवा मिळते आणि त्या महान् ध्येयाचें चिंतन चालतें. तें ध्येय बाबाला फिरवीत आहे. मी फिरत असतों तर पाय थकले असते. मीं कांहीं त्याग केला आहे असें मला वाटत नाहीं. सर्वोदयाचें नांव घेतों तें मला गोड लागतें. तपश्चर्येचें कांहीं भान च नाहीं, आनंद च आनंद आहे.

## माणिक्यवाचकरनें हि हा च विचार सांगितला आहे

नॉन यार ?......' नमः शिवाय एन पेटेन ' याचा अर्थ मीं कोणतें तप केलें ? केवळ शिवाय नमः म्हणण्याचें भाग्य मला मिळालें आहे. तें कांहीं विशेष काम नाहीं. त्यात माझी विशेष कर्तबगारी कांहीं नाहीं. कारण तें नाम इतकें गोड आहे. सहज तोंडांत बसतें आणि गोड लागतें. " तेन आदि समुद्गुमाय तित्तुक्युम शिव पेसमान " म्हणजे तें नाम मधा-सारखें-अमृतासारखें गोड आहे म्हणून मी तें घेतो. नांवाचा गोड लाडू मी रोज खात आहे आणि लोक म्हणतात कीं, ' मी तपश्चर्या करतों ! ' ' नाने चंद, उललम् पुदुंदु, एनै आट कॉडाय ' त्यानें स्वतः च माझ्या हृदयांत प्रवेश केला आणि तो च काम करीत आहे. ही च बाबाची हि स्थिति आहे. सर्वोदय शब्द बाबाच्या मुखांत आहे म्हणून तो फिरतो आहे. नाहीं तर परंधाममध्यें काम करीत राहिला असता. परंतु सर्वोदयाचें काम त्याला फिरायला लावीत आहे. त्याला थकवा वाटत नाहीं. लोक म्हणतात तप, तप, तप. पण बाबा म्हणतो जप, जप, जप. हा जप लोकहृदयामध्यें परिवर्तन करणारा आहे अशी नवी नवी तपश्चर्या होत राहील तेव्हां च प्राचीन काळचें वैभव प्रकट होईल असा मला विश्वास आहे.

## हें कसलें मानवी जीवन ?

आजची स्थिति अशी आहे कीं, लोकांनीं सर्व धर्मकार्य मठाकडे आणि मंदिराकडे सोपविलें आहे आणि समाजकार्य प्रतिनिधींच्याकडे. ते कांहीं

लोकांना निवडतात आणि त्यांना सांगतात कीं, तुम्हीं काम करा. याप्रमाणें समाजसेवा ही त्यांनीं लोकांकडे सोपविली आहे आणि धर्मसेवा हि. मग लोकांच्या हातांत राहिलें काय ? खाणें, पिणें, भोग भोगणें. हें मानवी जीवन नाहीं. हे पशुजीवन आहे. राजसंस्था उत्पन्न झाली आणि लोक प्रतिनिधि निवडूं लागले तेव्हांपासून लोक आळशी झाले. जनतंत्र नाममात्र उरलें आहे. आतां कोठें लोकांना आपल्या शक्तीचें भान होऊं लागलें आहे, पण भेद वाढत आहेत.

## सेवा हें एक प्रतिक्षालय आहे

आज जगामध्यें व्यवस्थेचे जे प्रकार आहेत त्याचा समाजावर चांगला परिणाम नाहीं. सेवेकरितां सत्ता आणि सत्तेकरितां सेवा असें एक दुष्चक्र बनलें आहे. सेवेकरिता व्यवस्था आणि व्यवस्थेकरितां सत्ता. तिच्यांकडे लोक पोहोंचतात. सेवापरायण लोकांना वाटलें कीं, आपापसांत च व्यवस्था होईल तर चांगलें. त्याकरितां ते एक समिति बनवितात. प्रथम जिल्हा समिति मग प्रांत समिति. याप्रमाणें हळूहळू सेवेंतून व्यवस्थेंत अडकतात. मग त्यांना वाटूं लागतें कीं जोंपर्यंत हातांत सत्ता नाहीं तोंपर्यंत व्यवस्था चांगली होणार नाहीं. मग या गांवाहून मदुरेला आणि मदुरेहून ते मद्रासला जातात. आपण कोठून कोठें गेलों हें हि त्याना पुढें ओळखायला येईनासें होतें.

परंतु माणिक्यवाचकरनें याच्या उलट अगदीं रस्ता दाखविला आहे आणि कोठें सेवा करायची हें दाखविलें आहे. सेवा करता करतां त्याच्या ध्यानांत आलें कीं, सेवेकरितां भक्ति पाहिजे. लगे च तो भक्तीकडे वळला. मग त्याला दिसून आलें कीं, यामुळें अहंकार वाढतो. त्यामुळें तो कामाचा नाहीं. म्हणून तो मुक्तीकडे वळला.

सेवा एक मोठें प्रतिक्षालय आहे. त्याच्या एका बाजूनें गाडी व्यवस्था आणि सत्ता यांकडे जात आहे. आणि दुसऱ्या बाजूनें भक्ति आणि मुक्तीकडे जात आहे. हिंदुस्थानातल्या सेवकांची मोठी विचित्र स्थिति आहे. कांहीं सेवकांचें तोंड, व्यवस्था आणि सत्ता यांच्याकडे आणि माझ्यासारखे कांहीं वेडे लोक भक्ति आणि मुक्तीचा रस्ता धरीत आहेत. माणिक्यवाच-

-करची ही खुबी आहे कीं, त्याला व्यवस्था आणि सत्तेचा पूर्ण अनुभव होता. त्यांतून कांहीं निघत नाहीं. कोल्हे ते कोल्हे च राहतात असें त्याला दिसून आलें. म्हणून त्यानें सत्तेचा त्याग केला. एका बाजूचा अनुभव घेऊन ती निकामी आहे हें जाणून ते बाहेर पडले होते म्हणून त्यांना दुसऱ्या बाजूची किंमत समजत होती.

## नवबाबूंचें नवीन उदाहरण

असें च एक उदाहरण अलीकडे घडलें आहे. ओरिसामध्यें नवकृष्ण चौधरी मुख्य मंत्री होते. सगळ्यांचा आग्रह होता म्हणून ते त्या पदावर राहिले. शेवटीं त्यांना दिसून आलें कीं, लोकहृदय बदलण्याची यांत शक्ति नाहीं. या मार्गानें लोकहृदयांत परिवर्तन करतां येत नाहीं. म्हणून ते मुख्य मंत्रिपद सोडून या भक्ति आणि मुक्तीच्या मार्गाकडे लागले आहेत. माझी च सत्ता जगांत चालावी असें कधीं मनांत हि येऊं नये. जगांत सत्ता चालविणारी दुसरी च एक शक्ति आहे. तिला तामिळमध्यें 'आंडवन्' (सत्ता चालविणारा) म्हणतात. आम्ही सत्ता चालविण्याच्या गोष्टी जेव्हां बोलतों तेव्हां त्याची जागा घेणेची ऐट सागतो. त्यामुळें द्वेष आणि मत्सर उत्पन्न होतात. मी 'आंडवन्' बनेन; दुसरा काय गप्प बसेल? त्याला हि आपण 'आंडवन्' बनावें असें वाटेल. मग जगांत आंडवन् च आणि आंडवन् च बनतील. मग ज्याची सेवा करायची आहे त्यांच्याकडे लक्ष च जाणार नाहीं.

## कोल्हे आणि घोडे

ग्रामदान हें गावाचें जीवन बदलण्याचा सरळ रस्ता आहे. तिकडे कायद्याचा रस्ता सीलिंगचा आहे. पण तुम्ही च तेवढे कोल्हे आहां. दुसरे नाहींत का? दुसऱ्याना कोल्ह्यांची अकल नाहीं का? लोकांनीं आधीं च जमिनी वांटून घेतल्या. सरकार कायद्याच्या गोष्टी करतें तेव्हां त्या भीतीमुळें घोड्याचे कोल्हे बनतात. पण माणिक्यवाचकर यांनीं उलट केलें होतें. कोल्ह्याचे घोडे बनविले. बाबा हि हें च काम करीत आहे. तो तर मोठ-मोठ्या कोल्ह्यांकडे दान मागतो. त्याच्यापुढें कोल्ह्यांचें कांहीं चालत नाहीं.

मग ते दान देतात आणि घोड्यांचें रूप घेतात. हिंदुस्थानांत आज दोन कामें चालली आहेत. एक कोल्ह्यांना घोडे बनवायचें आणि दुसरें घोड्यांना कोल्हे बनवायचें. आज कुळांना जमिनीवरून काढण्यांत येत आहे तें थांबविणें सरकारचें काम आहे. परंतु असल्या कोल्ह्यांच्यापासून हि बाबा जमीन मिळवीत आहे. ही बाबाची शक्ति आहे. खरोखर पहातां या दोन प्रक्रिया वाह्य आहेत. पण कांहीं लोकांना वाटतें कीं, दोन्ही एकमेकांनां मदत करीत आहेत. पण अशी गोष्ट नाहीं. एक आहे धपाटा मारण्याचा प्रकार आणि दुसरा आहे थोपटण्याचा. आई मुलाला थोपटते. ही भूदानाची प्रक्रिया आहे आणि जमीन जबरदस्तीनें काढून घेणें हें धपाटा मारणें आहे. लोकांना कांहीं समजत च नाहीं इतके ते मूर्ख नाहींत. सरकारकडून काम करून घेण्यांत लोकहृदयांत कधीं परिवर्तन होत नाहीं असें समजणारे लोक जगांत चातुर्य वाढवूं इच्छीत आहेत. पण चातुर्यानें समाज कधीं हि उत्पन्न होत नाहीं. अंतःकरणात प्रेम आणि करुणा असेल तेव्हा च समूहाची उन्नति होते. म्हणून माझें सांगणें आहे कीं, मतभेदांत पडूं नका आणि सेवा, भक्ति आणि मुक्तीचा मार्ग धरा.

तिरुवादवूर ( मदुरा )
५–१–'५७

येथील कार्यकर्त्यांच्या अंतःकरणांतला परमात्मा जागा झाला आहे. त्यांनीं ठरविलें आहे कीं, "ग्रामदानाचा आदर्श आम्ही करून दाखवूं आणि शेंकडों ग्रामदानें प्राप्त करूं." याचा अर्थ असा कीं, हें काम जनता च हातीं घेईल असा त्यांना विश्वास वाटूं लागला आहे. ते जनतेशीं एकरूप झाले आहेत. याप्रमाणे जनता आणि कार्यकर्ते एकरूप होणें यशाचें लक्षण आहे. जेव्हा दोन्ही एकरूप आणि एकहृदय होतात तेव्हां कार्यकर्ते जी मागणी करतात ती मागणी जनता पुरी करते. जनतेच्या हृदयांत जी वस्तु लपून राहिलेली असते ती एकरूप होऊन कार्यकर्त्यांच्या मुखानें बाहेर पडते. ज्याप्रमाणें हायड्रोजन व ऑक्सिजन मिळून पाणी बनतें त्याप्रमाणें च जनता आणि भक्तजन एक झाल्यावर परमेश्वर प्रकट होतो. जेथें जन आणि सज्जन एक होतात तेथें च ईश्वर असतो. जन म्हणजे सर्व जनता आणि सज्जन म्हणजे कार्यकर्ता. कित्येक कार्यकर्त्यांनीं अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, आपण जनसेवेचें च काम करूं; राजकारणांत, पक्षनीतीमध्यें पडणार नाहीं: ही हि फार मोठी गोष्ट आहे. हें का घडलें ? जनतेशीं माणूस एकरूप झाला म्हणजे त्याला आंदन च आनंदाची व रसाची अनुभूति येते हे उघड च आहे.

## एकतेमुळें च जीवन

याच्या उलट जो निवडणुकीला उभा राहतो त्याच्या हृदयाचे तुकडे होतात. मी बहुसंख्येचा प्रतिनिधि आहें, अल्पसंख्येचा नाहीं. असें झालें म्हणजे दोन तुकडे होतात आणि जनतेमध्यें भेद पडले म्हणजे ग्रामदान होत च नाहीं. ग्रामदानाचा अर्थ च सर्व जनता एक होणें हा. आज राजकारण तुकडे पाडतें त्यामुळें 'जनशक्ति' निर्माण होत नाहीं. पार्टी म्हणजे 'पार्ट' म्हणजे तुकडा. हे पक्ष म्हणजे लहान लहान नाले किंवा नद्या. आम्ही सागर आहों. जे कार्यकर्ते समुद्रासारखे होतील त्यांना अगदीं फिकें

जाईल. लोकांमध्यें ही शक्ति आहे. एकतेचा संदेश त्यांच्या कानीं घातला कीं त्यांच्याकडे ते आकर्षित होतात. भारतीयांनें सांगितलें आहे कीं, एकतेमुळें च जीवन समृद्ध होतें. जेथें एकाचे दोन तुकडे होतात तेथें जीवन क्षीण होतें. '५१' विरुद्ध '४९' हा पाश्चात्य विचार आहे, हा आमचा विचार नाहीं. सर्वांनीं मिळून एक च गोष्ट बोलावी हा आमचा विचार आहे. सर्वांनीं एकहृदय व्हावें याची आज हिंदुस्थानला फार जरुरी आहे. आज या पक्षभेदामुळें जग अगदीं बेजार झालें आहे. कांहीं लोकांनीं तरी त्यापासून अलिप्त रहावें आणि जनतेशीं एकरूप व्हावें.

### भांडवलशाही समाजाचे भ्रम

मी या आमच्या कामाला 'सर्वोदयाचें' कार्य म्हणतों. 'सर्वोदय' म्हणजे सर्वांचें भलें. कोणाचें कमी कोणाचें जास्त भलें, असें नाहीं. ज्या-प्रमाणें आई आपल्या सर्व मुलांवर सारखें च प्रेम करते त्या प्रमाणें सर्वांवर समान प्रेम करून समजावून सांगून समाजरचना केली पाहिजे. कोणी म्हणतात कीं, अशी समाजरचना करायला बसाल तर कामाला उत्साह च राहणार नाहीं. जास्त पुरुषार्थ केल्यावर जास्त संपत्ति मिळेल ही आशा असते म्हणून लोक ज्यास्त परिश्रम करतात. पण हें खरें नाहीं. घरांत बाप जास्त काम करतो. तो काय त्याला जास्त खायला मिळतें म्हणून? घरामध्यें सर्वजण प्रेमानें सर्वांचा सारखा च हक्क आहे असें मानतात. जो जेवढें मिळवील तेवढें च त्याला खायला मिळेल असें कुटुंबांत होत नाहीं. कमी ज्यास्ती मिळवीत असला तरी त्यावर सर्वांचा समान च हक्क असतो. तरीहि काम करायला उत्साह असतो च.

यावर कांहीं लोक म्हणतात, 'कुटुंबाची गोष्ट वेगळी आहे. पण समाजामध्यें जास्त मिळवील त्याला जास्त मिळेल. असें असेल तर च जास्त पुरुषार्थ होईल. मी हा विचार अगदीं अधार्मिक विचार आहे असें समजतों. समाजांत सध्या असें चाललें आहे हें खरें पण समाजांत अशा कितीतरी वाईट गोष्टी चालू आहेत आज गांवोगांवीं इतकी घाण असते कीं गांवांत प्रवेश करतांना नाकच बंद करावें लागतें. म्हणून घाण चांगली असें का तुम्ही म्हणाल? या चुकीच्या आणि अधार्मिक विचारानें कर्मांची

नाहीं, संग्रहाची प्रेरणा वाढते आणि त्यामुळें आळस वाढतो आणि कर्म-प्रेरणा च क्षीण होते. सर्वांना सारखें भोगायला मिळेल, यानें कर्मप्रेरणा कमी होईल हा एक भ्रम आहे. जगामध्यें असे कितीतरी भ्रम पसरलेले आहेत. मोठ्या देशांना असा भ्रम आहे कीं, ॲटम्, हायड्रोजन असले बॉंब बनवूं तर च आम्ही वाचूं आणि युद्ध टळेल आणि शांतता स्थापन होईल. खूप औषधें घेत गेलों म्हणजे आजार कमी होतील हा नंबर दोनचा भ्रम आहे. जितके डॉक्टर वाढताहेत तितकीं च औषधें आणि रोग वाढताहेत असा अनुभव आहे. आपण जर अशा भ्रमांना मान्यता देऊं तर प्रगति च कुंठित होऊन जाईल. असले भ्रम भांडवलशाही समाजांत किती तरी चालूं आहेत. मनुष्याचा पिंड या भ्रमांतून जोंपर्यंत सुटणार नाहीं तोंपर्यंत मनुष्याला खऱ्या स्वातंत्र्याचा, खऱ्या मुक्तीचा अनुभव येणार नाहीं.

*समता आणि सुरक्षितता*

मी विचारतों कीं, हे ग्रामदानी गांवचे लोक सुखी होतील कीं दुःखी? त्यांची कर्मशक्ति क्षीण होईल कीं वाढेल? तेव्हां लोक म्हणतात, 'ग्रामदान होईल तर चांगलें होईल.' कारण ते समजून उमजून करतात. पण त्यांत समता आणण्याकरिता जबरदस्ती होतां कामा नये. असलें काम जबरदस्तीनें होणार नाहीं हें मला मान्य आहे. परंतु भ्रमांतून तर मुक्त झालें पाहिजे. विषमता जाऊन समता आली तर काम करण्याला प्रेरणा राहणार नाहीं हा विचार सोडून द्या. समत्व अत्यंत सुरक्षित आहे ही गोष्ट लक्षांत घ्या. ही गोष्ट शेतकऱ्यांना हि समजते. शेतांत खड्डे असतील आणि उंचवटे असतील तर उंचवट्यावरून पाणी वाहून जाईल आणि पीक येणार नाहीं आणि खड्ड्यांत पाणी साठून पीक सडून जाईल म्हणून उंचवटे तोडून ते खड्डे भरून जमीन सारखी केली तर पीक चांगलें येईल. जो न्याय शेताला लागू आहे तो च समाजाला हि आहे. म्हणून समानतेंत च फार मोठी शक्ति असते. शक्तीचा स्रोत समत्वांत च आहे.

तराजूची दांडी अगदीं सरळ असते. जगाचा सर्व व्यवहार तराजूनें च चालतो. कुराणांत तराजूला फार महत्त्व दिलें आहे. त्यांत म्हटलें आहे कीं, ज्या परमेश्वरानें चंद्र, सूर्य उत्पन्न केले त्यानें च तराजू केलें म्हणजे समत्व. सर्व

व्यवहाराचें मुळांत समत्व आहे. कोर्टांतून न्याय चालतो तो समत्वाच्या आधारावर चालतो. न्यायमंदिरें बंद होतील तर समत्व राहणार नाहीं. सूर्याचा प्रकाश ब्राह्मणांच्या घरीं जातो तसा हरिजनांच्या हि घरीं जातो. श्रीमंतांच्या महालांत तसा गरिबांच्या झोपडींत जातो तो भेदभाव करीत नाहीं. सर्वांशीं समानतेनें वागतो. तो कोणाच्या घरीं ज्यास्त, कोणाच्या घरीं कमी जाऊं लागेल तर जगाचा नाश होईल. त्याचें जगावर सारखें प्रेम आहे. परमेश्वराचे वात्सल्यांत हि समत्व आहे. तें गाय आणि वाघ यांत फरक करीत नाहीं.

सारांश, जी समानता सूर्यांत आहे, पाण्यांत आहे, तराजूंत आहे ती समाजांत हि येईल तर नुकसान येईल असें समजून घेऊं नका. गरीब आणि श्रीमंत जन्माला उघडे नागडे च येतात. आणि मरतांना हि तसे च जाणार आहेत. ईश्वराच्या जगांत असा समतेचा कायदा आहे. त्यामुळें कोणाचें कांहीं बिघडत नाहीं. मग समत्वानें बिघडेल असें समजणें किती अज्ञान आहे ! समत्व सुरक्षित आहे. कांहीं चिंता करण्याचें कारण नाहीं बैलगाडी चढावावर किंवा उतारावर दोन्ही ठिकाणीं तिला धोका असतो. सपाट रस्त्यावर ती सुरक्षित असते. मग गाडीवाला खुशाल झोपून जातो, आणि बैल आरामानें गाडी ओढत असतात.

संग्रहामुळें आळस वाढतो आणि दुसऱ्याचे पैसे लुटायची प्रेरणा मिळते. हें सारें दुष्ट चक्र आहे. यांत मागें, पुढें, वर, खालीं सर्व ठिकाणीं धोका आहे. ज्या ठिकाणीं समानता असते त्या ठिकाणीं सुरक्षितता आणि शांति असते. आपल्या शरीराला योग्य खायला मिळणार नाहीं तर तें आजारी होईल. याकरितां समतोल आहार पाहिजे. त्याप्रमाणे च जेथें समानता आहे त्या ठिकाणीं सुरक्षितता आहे.

कंजिवरम् ( मदुरा )
७–१–'५७

आतां मीं जें बोलायचें योजलें होतें तो सर्व विचार आतां जें भजन म्हटलें त्यांत येऊन गेला आहे. 'भोगमेल योगचीन पोलिने' म्हणजे भोग च योगमय करायचा आहे. हें च आमच्या सर्वोदययोजनेचें सार आहे. अमेरिकेंत उत्पादन वाढवायचें काम चालू आहे; परंतु त्याची सर्व योजना भोगाची आहे. त्यांत कांहीं योग नाहीं. आज अमेरिकेंत पुष्कळ धन आहे. जमीन, सोनें, कारखाने, शाळा, कॉलेजें पुष्कळ आहेत. त्याबरोबर च सैन्य-आरमार हि पुष्कळ आहे. पण तेथें शांति नाहीं, प्रेम नाहीं. त्यांचा आदर्श आपल्याला उपयोगी नाहीं. आपण तसली भोगाची योजना करूं लागूं तर मार खाऊं. तसली योजना येथें बनणार च नाहीं आणि त्यांच्यांत आपली संस्कृति प्रकट होणार नाहीं. म्हणून मी ग्रामदानांत असे विषय आणतों कीं, त्यांमुळें परमार्थ आणि व्यवहार एकरूप होऊन जावा. 'मी-माझें सोडलें पाहिजे' ही गोष्ट वेदान्त नेहमीं सांगतो. तुम्हांला योग पाहिजे असेल तर भोग सोडला पाहिजे ही गोष्ट हिंदुस्थानांत प्रचलित आहे. आग्रहपूर्वक सांगितलें जातें कीं, भोगाची चर्चा करूं नका, योगाची करा. याच्या अगदीं उलट गोष्ट अमेरिकेंत सुरू आहे. त्यांना योग माहीत नाहीं; भोग आणि जीवनमान वाढविणें एवढें च त्यांना अत्यंत प्रिय आहे.

## शेतकरी सेवेचा दावा करीत नाहीं

आज शेतकरी शेतांत मेहनत करतो तर त्याला स्वार्थी समजतात, सेवक नाहीं. तो हि स्वतःला सेवक मानत नाहीं. उलट सरकारी नोकरांचें काम सेवा समजलें जातें. आम्ही सेवक आहों असा ते दावा करतात; परंतु मूलतः खरा सेवक शेतकरी च आहे. पण मी सेवक आहें असा तो दावा करीत नाहीं कारण तो समाजाकरितां उत्पादन करीत आहे अशी भावना ठेवीत नाहीं. स्वतःकरतां च शेत पिकवीत आहे अशी तो भावना ठेवितो. जें पीक पिकवतो तें विकून त्याचा तो पैसा करतो. विकून टाकण्यांत सेवेचा हेतु

उरत नाहीं. सेवा होते पण विचारांत सेवा असत नाहीं म्हणून रात्रंदिवस सेवा करीत असून हि त्याला सेवकत्वाचा अनुभव येत नाहीं. परंतु ग्रामदानी गावांतला शेतकरी म्हणेल की, मी जें काहीं करीत आहें तें गांवाकरिता करीत आहें; माझ्याकरितां नाहीं. तो काम पूर्वीप्रमाणें च करील. त्याला आतां सेवेचें रूप येईल, पूर्वीप्रमाणें भोगाचें राहाणार नाहीं. ग्रामदानांत त्याला भोग हि मिळेल च; पण तो सर्वांना च मिळेल. म्हणून तो भोग योग बनून जाईल.

## आयुर्वेद आणि ॲलोपाथी यांच्या ध्येयांत फरक

आमच्या योजनेंत केवळ उत्पादनाची गोष्ट नाहीं. उत्पादन तर होईल च. तें करायचें नसेल तर ग्रामदानाची तरी काय जरूरी आहे? म्हणजे सर्व-जण मिळून शेती करतील आणि उत्पादन हि वाढवतील. परंतु हें सर्व अशा शैलीनें करतील कीं, त्यामुळें आत्मविकास होईल. त्याकरितां जो भोग बाधक असेल तो ते घेणार नाहींत. प्रत्येक भोग आत्म्याच्या विकासाला बाधक असतो असें मानण्याचें काहीं कारण नाहीं. जे भोग योगाची बरोबरी करतात असले भोग च आम्हांला घ्यायचे आहेत. 'भोगो रोगस्य कारणम्।' जगाचा अनुभव आहे कीं, उत्पादन वाढतें आहे, त्याचीं साधनें वाढत आहेत, डॉक्टर वाढत आहेत, औषधें वाढत आहेत, आणि त्याबरोबर च रोगी हि वाढत आहेत कारण समाज भोगपरायण झाला आहे.

लोकांना आरोग्य हि भोगाकरिता च पाहिजे आहे. परंतु आमच्या आयुर्वेदांत लिहिलें आहे कीं, 'परमेश्वरप्राप्तीकरितां बुद्धि निर्मळ असली पाहिजे. बुद्धि निर्मळ राहण्याकरिता शरीर निर्मळ असलें पाहिजे. म्हणून शरीर स्वच्छ राखण्याकरिता आयुर्वेदाचा प्रारंभ झाला.' याचा अर्थ देहाचें आरोग्य, बुद्धीची शुद्धि आणि ईश्वरप्राप्ति यांसाठीं आयुर्वेदपद्धति जन्माला आली. ॲलोपाथी वगैरे पद्धति पाश्चात्यांकडून आल्या. ते म्हणतात कीं शरीर निरोगी असेल तर च आम्हांला जगातले भोग भोगायला मिळतील, नाहीं तर नाहीं. आयुर्वेद शास्त्र आणि ॲलोपाथी यांमध्यें एवढा फरक आहे. एकाचा उद्देश आहे कीं, शरीरशुद्धि आणि बुद्धिशुद्धी यांच्या द्वारें परमेश्वर-

प्राप्ति आणि दुसऱ्याचा उद्देश आहे कीं, शरीराच्या आरोग्यानें भोग-प्राप्तीचा आनंद लुटणें. त्या भोगांतून च रोग उत्पन्न होतात कारण ते शुद्धी-कडे लक्ष देत नाहींत.

### यंत्राचा मर्यादित उपयोग

सर्वोदययोजनेमध्ये ग्रामोद्योग कोठपर्यंत चालतील याविषयीं आज आम्ही चर्चा करीत होतों. खादी चालेल कीं नाहीं? हातकागद राहील का? अंबर चरखा कीं साधा चरखा? विजेचा उपयोग कोठें करावा? पाणी काढायला विजेचा च पंप लावावा कीं नाहीं? आहारांत तिखट-मीठ असावें कीं नाहीं? अशा अनेक चर्चा झाल्या. सर्वांमध्यें योग असावा ही यांत मुख्य गोष्ट समजली पाहिजे. आमच्या योजनेंत भोगाबरोबर योग असेल. अंबर चरखा चालेल, साधा चरखा चालेल कीं टकली हा स्वतंत्र विषय आहे. या देशांत लोकसंख्या पुष्कळ आणि शेत-जमीन थोडी. त्या ठिकाणीं शेतांमध्यें यंत्र चालणार नाहीं. बैल लाऊन टाकायचे ठरविलें तर तेथें हि यंत्रें चालतील पण बैलांना संभाळायचें असेल तर यंत्रांचा उपयोग करतां येणार नाहीं. ज्या देशांत प्रतिव्यक्ति पंधरा एकर जमीन आहे त्या ठिकाणीं शेती यंत्रानें चालूं शकेल तरी हि कांहीं काम हातानें करावें च लागेल. त्याशिवाय हाताचें समाधान होणार नाहीं. यंत्र प्रत्येक समाजांत योग्य कीं अयोग्य हें एकदम सांगतां येणार नाहीं. हें देशकाल आणि परिस्थितीवर अवलंबून आहे.

यंत्राचे कित्येक प्रकार आहेत त्यानन्हीं मनुष्याचा नाश करणारी संहारक यंत्रें आम्हाला बिल्कुल नकोत. परंतु जीं यंत्रें संहार करीत नाहींत, उत्पादन हि करीत नाहींत परंतु समय वाचवतात— उदाहरणार्थ मोटर, रेल्वे, विमान वगैरे— अशल्या यंत्रांचा मर्यादित उपयोग करतां येईल. वाया तर पायीं चालतां पण त्याला रेल्वे, विमानें असायला पाहिजे आहेत. एवढें च नाहीं तर यंत्रात सुधारणा हि त्याला हवी आहे. परंतु त्याला हि कांहीं मर्यादा असली पाहिजे आणि योग्य ठिकाणीं च त्याचा उपयोग

लागा पाहिजे. पायांच्या मदतीला सायकल आली, पायांच्या ऐवजीं नाहीं. जेव्हां पायीं जाऊं शकतों तेव्हां सायकल वापरूं नये. कागदाचा धंदा आम्ही कांहीं ठिकाणीं करूं, कांहीं ठिकाणीं करणार नाहीं. आणि तो करायचा असेल तर यंत्रानें बनवलेला पल्प वापरण्यास हरकत नाहीं. बाकी सर्व काम हातानें करूं. या सर्व तपशीलाच्या गोष्टी आहेत. वेळोवेळीं त्यांत बदल हि करावा लागेल.

उत्पादक यंत्रें दोन प्रकारचीं आहेत : ( १ ) कांहीं मनुष्याला साहाय्य करतात तीं, व ( २ ) कांहीं मनुष्याच्या शरीराला पंगू बनवतात, शिवाय त्याला निरुपयोगी बनवतात, आनंद कमी करतात आणि त्याच्या बुद्धीच्या विकासाला अडथळा करतात. पहिलें यंत्र पूरक आहे, दुसरें मारक आहे. जीं पूरक यंत्रें आहेत तीं आम्हांला पाहिजेत, मारक यंत्रें नकोत. कोणतीं यंत्रें पूरक आहेत आणि कोणतीं मारक आहेत याचा एकदा च कायम निर्णय होत नाहीं. आम्ही जो निर्णय देऊं तो त्या काळाला आणि स्थळा-पुरता लागू होईल. स्थळ बदलेल तर यंत्र बदलेल आणि काळ बदलेल तर तें हि यंत्र बदलेल. आणि समाज बदलेल तरी हि यंत्र बदलेल. परस्पर-चर्चेला अवसर राहील, लोक वेगवेगळे अभिप्राय देतील. आमचें मत दुसऱ्याच्या मताहून वेगळें राहील. दुसऱ्याचें मत माझ्याशीं जमणार नाहीं. भिन्न भिन्न मतांनीं समाज बदलेल पण मौलिक वस्तु एक च राहील. ती ही च कीं, भोगाचा योग बनवायचा आहे. दोन्हींमध्ये विरोध उत्पन्न करायचा नाहीं. भोगामध्ये चढाओढ असते आणि भोगामुळें चित्त चंचल होतें.

या मर्यादा आहेत. या मर्यादेमध्ये सर्वोदयाचें काम करायचें आहे. सर्वोदयवाल्यांनीं यावर नीट विचार करावा. भोग मर्यादित व्हावा आणि भोगाचा योग व्हावा अशा पद्धतीनें काम केलें पाहिजे.

## आश्रमाची एक मार्गदर्शक घटना

आमच्या आश्रमांत एक मुलगा चोरून बिडी पीत होता. तो पूर्वी वसति-गृहांत राहात होता. त्या ठिकाणीं त्याला ही संवय लागली. आश्रमांत काम

चांगले करीत असे तरी हि त्यानें ही गोष्ट चोरून ठेवली आणि चोरून विडी पीत च राहिला. आश्रमांतल्या एकाच्या तें दृष्टोत्पत्तीस आलें. मुलगा घाबरला. त्याला माझ्याकडे आणलें. तो बिचारा घाबरून गेलेला पाहून मीं त्याला म्हटलें, ' घाबरूं नकोस. तूं कांहीं वाईट काम केलेलें नाहींस. मोठे लोक हि विडी ओढतात. चोरून ओढलीस एवढें च त्यांत वाईट आहे. म्हणून आजपासून मी तुला एक खोली दाखवितों तेथें जाऊन तूं विडी ओढत जा. आठवड्यात जेवढ्या विड्या लागतात तेवढ्या विड्या मी आणून देतों. ' तें ऐकून आश्रमातल्या कांहीं मंडळींना विचित्र च वाटलें. तेव्हां व्याख्यान देऊन मला त्यांना समजून द्यावें लागलें– ' निःसंशय, विडी पिणें हें अगदीं चुकीचें आहे. आम्ही ओढत नाहीं हें हि त्याला माहीत आहे. पण त्याला सवय जडली म्हणून तो ओढतो. परंतु चोरून पिणें वाईट आहे त्याप्रमाणें सर्वांच्यासमोर उघड ओढणें हें हि वाईट आहे. म्हणून मंग्र मोडायची संधि त्याला दिली पाहिजे. हा अहिंसेचा विचार आहे. अहिंसेमध्यें सहनशक्ति असते म्हणून लहान सहान गोष्टींचा आग्रह धरतां उपयोगी नाहीं. आपल्या करण्यामुळें कोणाला त्रास होईल, व्यक्तीची सत्ता वाढेल, कोणाचा धंदा बुडेल, भोग वाढेल, अशीं कामें न करण्याचा आग्रह ठेवला पाहिजे.

पुल्लिपट्टी ( मदुरा )
९–१–'५७

ग्रामराज्य आणि सर्वोदयस्थापन यांचा आम्हीं बोजा समजूं नये. यामुळे सर्व देश उन्नत होणार आहे. आम्ही जें काम करूं ते नमुन्यापुरतें. समजा पांच लाख गांवें हि ग्रामदानांत मिळालीं आहेत तर कांहीं गांवें सरकार घेईल, कांहीं सर्वोदयवाले घेतील, कांहीं कॉंग्रेसवाले, तर कांहीं कम्युनिस्ट हि घेतील. पण लक्षांत ठेवा कीं, जेव्हां लाखों ग्रामदानें मिळतील त्या ठिकाणीं कम्युनिस्ट आणि कॉंग्रेसवाले असले भेद च नाहींसे होतील कारण त्यांत सर्वांच्या च इच्छा पूर्ण होणार आहेत. जें सर्वोदयाचें काम आहे तें च सरकारचें आहे. सरकारला सर्वोदय पाहिजे आहे आणि कॉंग्रेसला हि

## ग्रामदानाचा प्रवाह अखंड वाहूं दे

पण हें किती होऊं शकेल असा प्रश्न आहे. म्हणून जेव्हां लाखों ग्रामदानें मिळतील तेव्हां असें होऊ शकतें असा लोकांना विश्वास येईल. तेव्हां त्या गांवीं सर्वोदयाची आणि ग्रामराज्याची स्थापना करण्याचा बोजा आमच्यावर राहाणार नाहीं; परंतु ग्रामदानाचा प्रवाह खंडित झाला आणि १००–२०० ग्रामदानें घेऊन त्यांची व्यवस्था करायला आम्ही बसलों तर आमच्यावर फार मोठा बोजा पडेल; परंतु लाखों ग्रामदानें मिळवूं तर नमुना दाखवण्यापुरती च आमची जबाबदारी राहील, १००–२०० गांवांनीं संतोष मानूं, तर त्या सर्वांची योजना करण्याचा फार मोठा बोजा आमच्या शिरावर येईल.

## ग्रामराज्य हा फक्त अक्कलेचा प्रश्न आहे

समजा, आम्ही तीं गांवें चांगलीं करण्यात (नालायक) मूर्ख ठरलों तर सर्व आंदोलन फुकट जाईल. ग्रामदान सद्भावनेनें आणि हृदयपरिवर्तनानें होतें. पण 'ग्रामराज्य' करायला अक्कलेची जरूरी आहे. आमची अक्कल कमी असेल आणि ते दोनशे गांवें घेऊन बघू आणि लोकांना हा नमुना पाहा म्हणून सांगू, तर त्या गावांची शक्ति आमच्या शक्तीपुरती च

मर्यादित राहील; त्या गांवांची प्रगति आमच्या अकलेपुरती च मर्यादित राहील. म्हणून आम्ही तर केवळ नमुन्यापुरतीं १०–५ गांवें च केलीं तरी आमचें काम पुरें होईल; पण आम्ही हजारों ग्रामदानें मिळवीत चाललों तर ठिकठिकाणचे लोक आपल्या अकलेनें प्रयोग करूं लागतील आणि कित्येक ठिकाणीं त्यांची अक्कल आमच्यापेक्षां हि जास्त असल्याचें सिद्ध होईल. मग अशा हजारों नमुन्यांतून एक उत्तम निश्चित नमुना मिळून जाईल आणि त्याप्रमाणें गांवांचा विकास केला जाईल. मग त्याचें एक विज्ञान बनेल–शास्त्र तयार होईल. हजारों लोकांची अक्कल जेव्हा प्रयोग करूं लागते तेव्हा च शास्त्र बनतें.

### मी प्रश्न उत्पन्न करणार

सांगण्याचें तात्पर्य एवढें च कीं, आम्ही प्रश्न सोडविणारे लोक नाहीं: प्रश्न उत्पन्न करणें हा आमचा धंदा आहे. आम्ही असंख्य ग्रामदानें मिळवून सरकार, काँग्रेस यांच्यापुढें प्रश्न टाकूं आणि ते प्रश्न सोडवत बसा असें त्यांना सांगूं. आम्ही प्रश्न निर्माण करणारे होऊं आणि जग परमेश्वराच्या मदतीनें ते सोडवीत बसेल. आम्ही प्रश्न जर सोडवीत बसलों तर देशाचें नुकसान होईल. मग लोक आम्हाला सांगतील कीं तुम्हीं प्रयोग करा. तुमचे प्रयोग यशस्वी होतील तर आम्ही तुमच्यामागें येऊं. सर्वोदय करा असें सरकारला सांगूं तर सरकार सांगेल, विचार तर चांगला आहे. विनोबा प्रयोग करतो आहे. त्याचा परिणाम चांगला झाला तर आम्ही तो च स्वीकारूं. जणुं कांहीं सर्वोदय ही विनोबाच्या बापाची इस्टेट आहे ती सांभाळणें विनोबाचें काम आहे; म्हणून कांहीं थोड्या गांवांत नमुना दाखविण्याचा आमचा बेत आहे. तरी मुख्य काम ग्रामदानें मिळविणें आणि देशापुढें मोठें प्रश्नचिन्ह उभें करणें हें च आहे. आम्ही पूर्णविराम नाहीं, प्रश्नचिन्ह आहों, ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे.

पुलिनीपट्टी (मदुरा)
९–१८–'५७

करुणेच्या कामांत धार्मिक भेद, जातिभेद, पक्षभेद, सर्व कांहीं नाहींसे झाले पाहिजे. हे सर्व भेद माणूस नाहींसे करूं शकेल; पण एक भेद नाहींसा करणें कठीण आहे. तो म्हणजे व्यक्तिभेद. दोन भाऊ आहेत. ते एका घरांत राहात असोत किंवा पक्षात; पण त्यांच्या मनांत जर परस्पर-द्वेष, मत्सर असेल तर दोघांना एका च कामात लागणें शक्य नाहीं. मत्सर आणि द्वेषाचा मनुष्यावर इतका प्रभाव पडतो कीं, मानवतेच्या कामांत हि मनुष्याला अडथळा आणतो. ज्या ठिकाणीं असा व्यक्तिगत द्वेष आणि मत्सर असतो तेथें काम होऊं शकत नाहीं. बाकी दुसरे अनेक प्रकारचे सर्व भेद करुणेच्या कामात लुप्त होतात; पण करुणेचें काम इतकें तेजस्वी झालें पाहिजे कीं, त्यामुळे व्यक्तिगत मत्सर, द्वेष आणि भेद हि माणसाचे सुटले पाहिजेत.

## ग्रामदानाची तेजस्वी करुणा

भूदानाच्या करुणेंत इतकें सामर्थ्य नव्हतें. पण ग्रामदानाच्या करुणेंत तें आहे. ज्या ठिकाणीं गांवचे सर्व लोक आपली मालकी सोडून गांवाला अर्पण करतात ती फार मोठी करुणा आहे. कोणी गरीब, भुकेला माणूस समोर आला तर त्याला आपली मालकी कायम ठेवून कांहीं देणें ही सामान्य करुणा आहे. पण आपली मालकी सोडणें आणि त्या गरिबाला आपल्या बरोबरीचा करणें ही करुणेची परिसीमा आहे. सुदामा जेव्हां श्रीकृष्णाला भेटायला गेला तेव्हां कृष्णानें त्याचें नुसतें स्वागत करून जेवायला घातलें नाहीं, तर तो ज्या आसनावर रुक्मिणीसह स्वतः बसला होता, त्या आसनावर च त्याला त्याने बसवून घेतलें. ही करुणेची सीमा झाली. 'भगवान् मला शिव बनवतो व माझ्यावर प्रेम करतो', असें माणिक्यवाचकरनें त्याचें वर्णन केलें आहे. 'परमेश्वर कधीं असें म्हणत नाहीं कीं, मी शिव आहें आणि तू अशिव आहेस. तूं माझा भक्त आहेस,

म्हणून मी तुझ्यावर कृपा करतो.' तो तर आम्हांला शिव च बनवून टाकतो. ज्या ठिकाणीं अशी परम करुणा प्रकट होते त्या ठिकाणीं सर्व व्यक्तिगत भेद, मत्सर, द्वेष खतम होऊन जातात. मग जातिभेद, पक्षभेद असले मामुली भेद तर नाहींसे होतात च.

## बलिदानाशिवाय यज्ञ होणार नाहीं

मदुरा जिल्ह्यांतल्या लोकांनीं या ग्रामदानाच्या कामांत ढिलाई करता कामा नये; तें कावेरीच्या प्रवाहासारखें सतत काम चालू राहिलें पाहिजे. बाबा अखंड चालत असतो म्हणून त्याचें काम होतें. त्यामुळें लोकांच्या पुढें एक ज्योति, एक नंदादीप अखंड तेवत राहतो. म्हणून च जागृति राहते. 'तुम्ही रोज दोन वेळां यात्रा करतां' त्यामुळें स्वागतादि कामांत आमचा ज्यास्त वेळ जातो. तुम्ही एका गांवांत दोन दिवस राहून पुढें जाल तर काम वाढेल' असें जेव्हां जगन्नाथजी मला म्हणाले तेव्हां ती बाबाला एके जागीं बसवून टाकायची युक्ति होती. मी त्यांना म्हणालों, 'काम वाढो न वाढो, बाबाला त्याची पर्वा नाहीं. बाबाची यात्रा खंडित होणार नाहीं. बाबा उभा असेल तेव्हां निजलेले लोक उठून बसतील. बाबा चालायला लागेल तेव्हां लोक उभे राहतील. बाबा पळूं लागेल तेव्हां लोक चालूं लागतील आणि बाबा जेव्हां मरेल तेव्हां लोक मरतील.' या कामात त्याला आपल्या शरिराची आहुति द्यायची आहे हें बाबा पूर्णपणें जाणून आहे. आहुतीशिवाय, बलिदानाशिवाय यज्ञ होत नाहीं. ती आहुति पडेल तेव्हां जीवन जागृत होईल.

तोरंग कुरुनी ( त्रिची )
१०-१-'५७

## आपलें 'नशीब' स्वतः च भोगावें काय                    : २८ :

हिंदुस्थानच्या मानसिक विचारात एक फार मोठा गैरसमज झालेला आहे. ते समजतात कीं, सुखदुःख भोगावें च लागतें. तें पूर्वजन्मींचें फल आहे. म्हणून आपल्या नशिबांत असेल तें भोगावें. प्रत्येक मनुष्याचें नशीब वेगळें वेगळें असतें त्यात शंका नाहीं. पण कांहीं नशीब समान हि असतें. आम्ही एका च गांवात जन्माला येतो कारण आमचें नशीब सारखें असतें. आपण एका च मनुष्यजातीत जन्मतों याचें हि कारण आमचें नशीब कांहीं अंशीं सारखें च आहे. नशीब असतें तें हि केवळ व्यक्तिगत असत नाहीं.

### नशीब हि पुष्कळांचें सारखें असतें

भाग्य किंवा नशीब हें अगदीं पूर्वजन्मीं केलेलें, मागील जन्मीं केलेले, पूर्वकर्म च असतें. परंतु जगात आम्ही पहातों कीं पुष्कळशीं कामें आम्ही एकटे च करीत नाहीं, अनेक मिळून करतो. व्यापार करतो, तो कांहीं लोक मिळून करतो. कुटुंबात अनेक लोक मिळून च काम करतात. म्हणजे प्रत्येक काम वेगळें वेगळें असतें असें नाहीं कांहीं कामें वेगळीं असतात; पण पुष्कळशीं कामें एकत्र मिळून च होतात. आम्ही सगळ्यांनीं मिळून शेतांत काम केलें, केव्हां घरांत जेवण बनविलें, तर हीं दोन्ही कामें सामूहिक रीतीनें च होतात. पैसा मिळवण्यांत ज्या कांहीं बऱ्यावाईट गोष्टी केल्या असतील त्या सर्वांनीं केल्या असें मानलें जातें. तरी हि खायचें काम आम्ही वेगळें वेगळें करतों. माझा भाऊ योग्य प्रमाणांत खातो आणि मी जरुरी-पेक्षां जास्त. हें मी व्यक्तिगत कर्म केलें. त्यामुळें माझें पोट दुखतें; माझ्या भावाचें दुखत नाहीं. पैसा मिळवण्यांत आणि रसोई बनविण्यात आम्हीं मिळून काम केलीं आणि खाण्याचें काम वेगळें वेगळें केलें. याप्रमाणें कांहीं काम मी व्यक्तिगत करतों. त्याचें फळ मला व्यक्तिगत भोगावें लागतें. पण बाकीचीं पुष्कळशीं कामें आम्ही मिळून सामूहिकरीत्या करतो त्याप्रमाणें च पूर्वजन्मींचें काम हि बरेंचसें समान असणार. त्यामुळें पुष्कळांचें नशीब हि सारखें च असणार.

## सहानुभूतीचा अभाव वाईट आहे

यावरून हें स्पष्ट आहे कीं, ज्या अर्थी आम्ही एका गांवांत जन्माला येतो त्या अर्थी सर्व गांववाल्यांचें नशीब कांहीं अंशीं सारखें च आहे हें समजलें पाहिजे नाहीं तर एका च मानवजन्मांत, एका च परिस्थितींत, एका च काळीं, एका च योनीमध्यें आम्ही कां जन्माला आलों असतो ? याचा अर्थ च हा कीं, आमच्या सर्वांचें पूर्वी कांहीं सामूहिक नशीब असलें पाहिजे. म्हणून आम्हां सर्वांचें नशीब वेगवेगळें आहे. आम्ही दुसऱ्याची कां चिंता करावी हें म्हणणें चुकीचें आहे. मी जास्त खाल्लें हें माझें व्यक्तिगत काम झालें. पण त्याचें फळ भोगायला दुसऱ्या जन्माची वाट पहात बसावें लागणार नाहीं, या च जन्मीं माझें पोट दुखतें. तेव्हां माझा भाऊ असें म्हणेल का, कीं त्यानें जास्त खाल्लें आहे म्हणून त्याचें पोट दुखत आहे ? तें दुखूं दे, मी त्याला काय करूं ? पण तो तसें समजत नाहीं. आपलें आणि आपल्या भावाचें नशीब थोडेंसें वेगळें असलें तरी बरेंचसें एक च आहे असें समजतो. मी जर त्याला आतां मदत केली नाहीं तर जास्त खाण्याचें त्यानें जें वाईट काम केलें आहे त्यापेक्षां हि तो वाईट कर्म करूं लागेल. हें माझें व्यक्तिगत वाईट होईल. त्याचें पोट दुखणें थांबल्यावर पुन्हां पुढच्या जन्मीं भोगायचें उरत नाहीं. पण माझ्या भावाच्या दुःखांत मदत केली नाहीं, त्यानें वाईट काम केलें त्याविषयीं सहानुभूति ठेवली नाहीं, तर त्याचें फळ मात्र मला पुढच्या जन्मीं भोगावें लागेल.

याप्रमाणें आपण एका गांवीं रहातो आणि आपल्या घरीं सुखी आहों. पण आपला शेजारचा माणूस दुःखांत आहे, त्याच्याविषयीं सहानुभूति दाखविली नाहीं, तर तें आपलें व्यक्तिगत वाईट काम होईल, त्याचें फळ आपल्याला भोगावें लागेल. पूर्वजन्मीं वाईट काम केलें म्हणून त्याला दुःख भोगावें लागत आहे ही जुनी गोष्ट झाली. परंतु तुम्ही त्याच्याविषयीं सहानुभूति ठेवली नाहीं तर तें तुमचें वाईट काम होईल. प्रत्येकाचें नशीब वेगळें आहे, ज्याचें त्यानें भोगावें ही समजूत हिंदुस्थानांत प्रचलित आहे. तो विचार अगदीं निठुर आहे. असा विचार तुम्ही आपले आईबाप, भाऊ-बहीण यांच्याविषयीं करतां का ? त्यांच्या दुःखांत मदत करण्याचा

प्रयत्न करीत नाहीं का ? मग गांवांतल्या शेजाऱ्यापुरतें च तुम्ही असें कां म्हणतां ? वस्तुतः ही अगदी विचारहीनता आहे. असला विचार कधीं हि करूं नये. तो चुकीचा आहे, अनुभवाच्या विरुद्ध आहे.

## दुःखाची सामूहिक जबाबदारी

जी वस्तु अनुभवानें दिसते ती शास्त्र-वचनांत पाहायला मिळत नाहीं. एखाद्या मनुष्यानें विडी ओढून एखाद्याच्या घरावर फेकून दिली. त्या घराला आग लागून सारें गांव पेटतें. याप्रमाणें एका मनुष्याच्या चुकीमुळें साऱ्या गांवाला दुःख भोगायला लागतें. ज्या वेळीं ज्याची चूक त्यानें भोगावी हा तुमचा विचार येथें बरोबर आहे का ? हें खरें कीं कांहीं कामें स्वतंत्रपणें च करावीं लागतात आणि त्याचें फळ हि व्यक्तिगत भोगावें लागतें; पण तीं शारीरिक कामें असतात. मीं खाल्लें, प्यालों, झोंप घेतली: पण मी खाल्लें म्हणून माझें पोट दुखलें एवढ्यानें काम संपत नाहीं. त्याबद्दल आईला विचारलें जाईल कीं, मुलाला अक्कल नव्हती म्हणून त्यानें खाल्लें; तर तूं कां थांबवलें नाहींस ? मी जेवायला बसलों आहें. वाढणारा आग्रह करतो आहे. घ्या थोडें म्हणतो. प्रथम मी नाहीं म्हणतो. नंतर त्याच्या आग्रहाला बळी पडून जास्त खातों. मग पोट दुखूं लागलें आणि दोन दिवसांनीं मरून गेलों. त्या चुकीचें फळ मला मिळालें; पण ज्यानें प्रेमानें आग्रह केला त्याचा हि माझ्या मृत्यूंत वांटा आहे. याप्रमाणें व्यक्तिगत चूक समजली जाते तिच्यांत हि दुसऱ्याचा भाग असतो.

मनुष्य एक सामाजिक प्राणी आहे. त्याचीं पुष्कळशीं कामें सामूहिक होतात. म्हणून सामूहिक कामात व्यक्तीचा भाग अगदीं थोडासा असतो. आणि तो व्यक्तिगत भाग शारीरिक आणि मानसिक च असतो. त्यांत हि दुसऱ्याचा भाग असतो च. पण त्याची स्वतःची जबाबदारी जास्त असते ही गोष्ट जर आम्ही चांगल्या तऱ्हेनें समजलों तर पूर्वजन्मींच्या कर्मांची निठुर गोष्ट आम्ही कधीं बोलणार नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे कीं, मनुष्यहृदयाला निठुरता कधीं सहन होत नाहीं. आपल्या शेजाऱ्याशीं तो निठुरपणें वागला तर त्याचें अंतःकरण टोचतें. मग आपल्या मनाचें समाधान करण्याकरितां पूर्वकर्मांची—नशिबाची तो गोष्ट बोलतो. हें आपल्याला

फसविणें आहे. याप्रमाणें मनुष्य आपल्याला फसविण्याचा प्रयत्न करतो पण समाज फसत नाहीं.

आपण आपल्या शेजाऱ्याची चिंता करीत नाहीं. ही आपल्या समाजाची फार निष्ठुरता आहे. आणि मौज अशी आहे कीं आम्ही अद्वैतापेक्षां कमी गोष्ट च बोलत नाहीं. मनुष्य, पशु, दगड, झाड — अगदीं सर्व कांहीं एक आहे. बोलण्यात तर असें म्हणतों. यापेक्षा तत्त्वज्ञान तरी अधिक काय सांगतें ? धर्माचे मोठमोठे ग्रंथ दसरांत बांधून पडले आहेत. पण कोणी हि ते आपल्या अंतःकरणात, आपल्या जीवनांत आणण्याची गोष्ट बोलत नाहीं. लोकांची अशी समजूत झाली आहे कीं, ह्या धर्मग्रंथांचा पाठ केल्यानें च आपण सर्व पापांतून मुक्त होऊन जाऊ. पापांतून मुक्त होण्याकरितां पुण्यमय-जीवन करण्याची जबाबदारी घेण्याची त्याना चिंता नाहीं. याप्रमाणे आपल्याला फसविण्याचे कित्येक उपाय माणसानें शोधून काढले आहेत. धर्म खरोखर वाढला असता तर सुख वाढल्याशिवाय कधीं च राहिलें नसतें. जेथें धर्माची वृद्धि होते तेथें दुःख राहूं च शकत नाहीं. कारण धर्मामध्यें एक दुसऱ्या-करितां मरायला तयार असतो. ज्या ठिकाणीं एक जण दुसऱ्यावर इतकें प्रेम करतो त्याच्याकरिता तो मरायला हि तयार असतो. त्या ठिकाणीं दुःखाचें दर्शन हि होत नाहीं. म्हणून आज आम्ही धर्माचें फक्त नांव च घेत आहों. खरे आचरण करीत नाहीं ही गोष्ट आपण लक्षात घेतली पाहिजे.

आज मकरसंक्रांतीचा सणाचा दिवस आहे. भलेपणा वाढेल, वाईटपणा कमी झाला, तेव्हां च सण होतो. याच्या उलट वाईटपणा वाढून भलेपणा कमी झाला तर तो सण नाहीं. म्हणून सज्जनता जितकी वाढेल तितकीं च ग्रामदानें होतील यांत शंका नाहीं. येथें कार्यकर्ते कमी आहेत तरी हि ग्रामदानें होतील च. कारण या विचाराच्या मागें ईश्वरी कृपेचें बल आहे, धर्माचें बल आहे आणि आधुनिक विज्ञानाचें हि बल आहे.

कुपेच्यपेट्टी ( त्रिची )
१४-१-'५८

'रामकृष्ण कोंडिले' या संस्थेचें नाव एका महापुरुषाच्या स्मरणार्थ ठेविलें आहे. रामकृष्ण परमहंसांचा जन्म देशाच्या एका कोपऱ्यांत झाला आणि हें स्थान देशाच्या दुसऱ्या टोकाला आहे. त्याच्या नावानें हें महाविद्यालय आणि मठ स्थापन झाला आहे. रामकृष्ण परमहंस विशेष कांहीं शिकलेले नव्हते. शिक्षणावर त्यांचा विश्वास च नव्हता. आत्मशिक्षणावर त्यांची श्रद्धा होती. ते मानवमात्रावर प्रेम करायला शिकवीत. सर्वांमध्यें एक च परमात्मा आहे तो ओळखा असें ते सांगत. परमात्म्याच्या त्या अंशाला ओळखणें ही विद्या आहे, बाकीची सर्व अविद्या आहे. या द्रविड देशांतल्या शंकराचार्यांनीं हि हें च सांगितलें होतें परंतु रामकृष्णांच्या उपदेशाची ही विशेषता होती कीं, ते अद्वैताचा विचार व्यवहारांत हि आणूं इच्छीत होते. रामकृष्णाच्या संप्रदायांत अद्वैताशीं सेवा जोडून दिलेली आहे. याप्रमाणें अद्वैताशीं सेवेचा योग रामकृष्णाच्या शिष्यांमधे च प्रथम निर्माण झाला. सेवा करण्याची वृत्ति खिस्ती धर्मांत पुष्कळ होती आणि अजून हि आहे. आमच्याकडे भक्तिमार्ग पुष्कळ चालला परंतु त्यांत सेवा जोडलेली नाहीं. ध्यान, पूजा एवढ्यांत भक्ति संपते. इकडे वेदान्तांत अद्वैत विचार तर होतात. मी सर्व भूतांत आहें, सर्व भूतें माझ्यांत आहेत, अशी भाषा तर बोलत पण त्या विचाराशीं सेवा जोडलेली नव्हती. तें फक्त निर्गुण चिंतन होतें. भक्तिमार्गांत हि प्रेम होतें पण सेवा नव्हती. सगुण रूपाचें ध्यान होतें. याप्रमाणें वेदान्त आणि भक्तिमार्ग सेवाकार्याला अनुकूल असून हि त्यांना भारतांत सेवेचा आकार मिळाला नाहीं. हा सेवेचा आकार खिस्ती धर्माला आहे. पण त्यांत अद्वैतविचार नाहीं. रामकृष्णसंप्रदायाचा हा विशेष आहे कीं, त्यांत भारताचा अद्वैतविचार आहे आणि खिस्ती धर्माचा सेवेचा हि विचार आहे. ज्या ठिकाणीं अद्वैत आणि सेवा यांचा योग होतो तेथें फार मोठी शक्ति निर्माण होते. या शक्तीचा जन्म रामकृष्णांच्या विचारानें हिंदुस्थानांत झाला आहे.

## गांधीजींमधें भारतीय संस्कृतींचा अंतिम समन्वय

आज या संस्थेमध्यें मूलोद्योगी शाळेला सुरुवात झाली आहे. हा विचार गांधीजींची देणगी आहे. या काळीं हिंदुस्थानांत जे सर्वांत मोठे पुरुष जन्माला आले त्यांत म. गांधी आणि रामकृष्ण परमहंस आहेत. शेकडो वर्षांनंतर आजच्या काळांतल्या या च दोघा पुरुषांचीं नांवें शिल्लक राहतील. या च स्थानीं गांधी आणि रामकृष्ण या दोघांचीं नावें जोडलीं गेलीं आहेत. या नामसंयोगामुळें जेवढें बळ मिळेल तेवढें तुम्हीं प्राप्त करून घेतलें आहे. गांधीजींचा अद्वैतावर आणि भक्तीवर विश्वास होता. पण ते कर्मयोगी होते. त्यांच्या कर्मयोगाला भक्ति आणि अद्वैताचें रूप प्राप्त झालें होतें. अद्वैत आणि भक्तीची पूर्तता गांधींच्या विचारानें होते. कर्मयोगाचीं दोन अंगें आहेत : ( १ ) सेवा ( २ ) उत्पादन. यांत सेवेच्या विचाराचा प्रचार रामकृष्ण मठानें पुष्कळ केला. गांधीजींनीं दुसऱ्या अंगाचा विचार देशाच्या कोपऱ्याकोपऱ्यात पोंचविला. मजूर लोक ज्याप्रमाणें शारीरश्रम करतात त्याप्रमाणें प्रत्येकानें शारीरश्रम केले पाहिजेत. या कर्मयोगाच्या फार मोठ्या विचाराचा प्रचार गांधीजींनीं केला. इकडे शंकराचार्यांनीं अद्वैताची शिकवण दिली त्याप्रमाणें माणिक्यवाचकर आणि नम्मल्वार अगांनीं भक्तीची केली. त्याच भक्तीचें गुणगान ज्ञानेश्वर आणि तुलसीदासांनीं केलें. त्याप्रमाणें गांधीजींच्या विचारांत शंकराचार्यांचें अद्वैत, रामानुज वगैरेंची भक्ति आणि रामकृष्णांची सेवा आहे च. याशिवाय उत्पादन हि आहे.

## पांच वस्तूंचें गोड पक्वान्न

तुम्हीं रामकृष्ण आणि गांधींचें नाव एकत्र घेऊन या सर्वांचा बोजा अंगावर घेतला आहे. आता अधिक मिळवायला तुम्हांला कांहीं वस्तू राहिल्या नाहींत अद्वैतविचार, भक्तिमार्ग, सेवादृष्टि आणि उत्पादक कर्मयोग हे सर्व या ठिकाणीं एकत्र येतील हे पाहून मला फार आनंद झाला आहे. भारतीय संस्कृतीचा हा अगदीं अंतिम समन्वय आहे. या ठिकाणीं भारताची सर्व कमाई एकत्र होत आहे जेथें आपण सेवेचें नांव घेतों तेथें करुणा हि आली. म्हणून बुद्ध भगवानांचा करुणेचा विचार हि त्यांत आहे..

ज्या ठिकाणीं अद्वैत येतें त्या ठिकाणीं अहिंसा असते च. म्हणून महावीरांची अहिंसा हि येते च. हे तर पांच वस्तूंचें मोठें गोड पक्वान्न बनलें आहे. तुम्हीं जेव्हां एवढी मोठी जबाबदारी अंगावर घेतली आहे तेव्हां काम हि तुम्हांला तसें च करावें लागेल.

## भूदान एक संकेत

मी भूदानासाठीं फिरत आहें हें तुम्हांला माहीत च आहे. तें एक बाह्य काम आहे. भगवान् बुद्धांनीं हि असलें एक काम हातीं घेतलें होतें. त्या काळीं यज्ञात बकऱ्यांची फार मोठी हत्या होत असे. तें बलिदान बंद करण्याची त्यांची इच्छा होती. आज हि ख्रिस्ती, मुसलमान, हिंदु यांच्या-मध्ये बलिदानाची चाल आहे पण बकऱ्याच्या बलिदानाविरुद्ध बुद्धांनीं फार मोठें आंदोलन केलें. त्यांना करुणेच्या विचाराचा प्रसार करायचा होता. परंतु केवळ व्याख्यान देऊन, ग्रंथ लिहून विचार-प्रचार होत नाहीं. समाजांतलें निष्ठुर काम बंद करण्याकरितां कांहीं प्रत्यक्ष काम हातीं घ्यावें लागतें. म्हणून बकऱ्याला वाचविण्याचें काम बुद्धांनीं हातीं घेतलें बकरे वाचविणें हा एक संकेत होता परंतु त्यांना करुणेचा विचार प्रसारावयाचा होता. याप्रमाणें त्या काळात जी निष्ठुरता चालत होती त्याकडे त्यांनीं बोट दाखविलें आणि जागोजागीं करुणेचा विचार समजावूं लागले.

त्याप्रमाणें च बाबानें हि भूदानाचें नाव घेतलें आहे. पण त्याला करुणेचा विचार, मालकी सोडण्याचा, अद्वैताचा विचार पाहिजे आहे. अद्वैत आणि करुणा जेथें एक होतात तेथें भूदान येतें. हा समन्वय आहे जो समन्वय तुम्ही येथें करूं पहात आहां तो च भूदानयज्ञ प्रत्यक्ष सेवाकार्याच्या रूपानें करूं इच्छीत आहे. आज जगात मालकी आहे. कोणी उच्च आहे, कोणी नीच आहे. विषमतेचे सर्व प्रकार जगात आहेत. त्यामुळें निष्ठुरता हि आहे. तुमच्या गावाच्या आजूबाजूला गरीब, दरिद्री लोक रहातात. त्यांची कोणी चिंता करीत नाहीं. फार झालें तर एखादे दिवशीं कोणा भिकाऱ्याला अन्न वाढलें जातें. कोणी आजारी पडला तर एखादयाला औषध मिळेल. परंतु आजारी का पडतो, त्याला खायला का मिळत नाहीं, याच्या मूळ कारणाकडे

कोणी लक्ष देत नाहीं. मूळ कारण दूर झालें पाहिजे. आम्हीं भेद वाढविले आहेत, मालकी वाढवली आहे, हें त्याचें मूळ कारण आहे. या भेदावरून मालकीवर मी प्रहार करूं इच्छीत आहें. पावणेसहा वर्षें हें काम चाललें आहे. हें काम बाकी आहे आणि बाबाच्या पायांत शक्ति आहे तोंवरी हें काम चालू राहील.

रामकृष्ण कोंडिले ( त्रिची )
१६–१–'५७

## धर्मक्षेत्रांनीं तपस्येचा वारसा संभाळावा : ३० :

अखिल भारतात हें क्षेत्र प्रसिद्ध आहे. महाराष्ट्रांत जसें पंढरपूर तसें इकडे श्रीरंगम् आहे. दोन्हीं वैष्णव भक्तांचें फार मोठें कार्यक्षेत्र आहे. पंढरपूर आणि श्रीरंगमचा एक च देव आहे. त्याचें नांव पांडुरंग आहे तर याचें श्रीरंगम. या ठिकाणीं नम्मल्वार, रामानुज आदि सर्व वैष्णव सत्पुरुष काम करीत होते, तर तिकडे ज्ञानदेव, तुकाराम आदि प्रसिद्ध आहेत. या सर्व सत्पुरुषांनीं हिंदुस्थानच्या इतिहासात फार मोठें कार्य केलें आहे.

### मानवजीवनावर राजांचा प्रभाव नाहीं

हल्लीं जे इतिहास लिहिले जातात त्यांत राजे-महाराजांच्या कथा च अधिक असतात. सत्पुरुषांची माहिती एखाद-दुसरे पान कोपऱ्यात दिली जाते. ही पश्चिमेंतून आलेली इतिहासाची विकृत दृष्टि आहे. खरोखर पाहातां मानव-समाजावर राजे-महाराजांचा विशेष प्रभाव पडलेला नाहीं. शेंकडो राजांचीं नांवें व्यर्थ इतिहासांत लिहिलीं जातात. नाहीं तर प्रजेला ते माहीत हि असणार नाहींत. पल्लव, चोल आणि दुसरे हि अनेक राजे होऊन गेले. ते ज्या काळीं झाले त्या काळीं त्यांचा बरा च दबाव होता. लोक कदाचित् त्यांना भीत हि असतील. त्यांनीं लोकांवर अनेक प्रकारचे जुलूम केले. त्यांत कांहीं चांगले हि राजे असतील; परंतु माणसाचें जें जीवन, हृदय बनलेलें असतें, त्याचें परिवर्तन करण्यांत त्यांचा कांहीं भाग नाहीं.

## मानवाचा विवेक ही सत्पुरुषांची देणगी आहे

हजारो वर्षांच्या प्रयत्नामुळे मनुष्याला एक सद्‌विवेक प्राप्त झाला आहे. कांहीं वस्तु स्वाभाविकपणें च त्याच्या ध्यानांत आल्या. कांहीं निष्ठा बनल्या. काय करणें योग्य आहे, काय अयोग्य आहे, हें समजून मनुष्याचा कांहीं स्वभाव बनला. मनुष्य कांहीं योग्य च काम करतो असें नाहीं; पण काय योग्य, काय अयोग्य याविषयीं त्याचा विचार स्थिर झाला. कोठें खून झाला, चोरी झाली, व्यभिचार झाला. आपल्याला त्याचें कारण माहीत नसलें तरी तें ऐकून आपल्याला एकदम वाईट वाटतें. याप्रमाणें कार्याकार्य-विचार मनुष्यामध्यें स्थिर झाला. याला 'सद्‌विचार' किंवा 'मानवी विवेक' म्हणतात. पण हें मानवहृदय कोणीं बनवलें ? मोठमोठे राजे झाले. श्रीमंत व्यापारी होऊन गेले. दुसरे हि कित्येक पराक्रमी वीर झाले. पण मानव-हृदय बनवण्यांत त्याचा कांहीं भाग नव्हता. हा जो मानव-विवेक बनला, समाजांत नीतिशास्त्र बनलें, तें त्या महापुरुषांनीं आणि सत्पुरुषांनीं बनवलें.

कांहीं लोक म्हणतात, येथें मोठमोठे सत्पुरुष, महामुनि होऊन गेले तरी हि समाजांत वाईट गोष्टी आहेत च. समाजावर त्याचा कांहीं परिणाम झालेला नाहीं. माझें म्हणणें आहे कीं हा विचार चुकीचा आहे. असे महापुरुष होऊन गेले म्हणून आमची हलपत स्थिति आहे नाहीं तर आम्ही जनावरें बनून गेलों असतों. आज जी कांहीं मानवता आहे, बरेंवाईट काय हें आपल्याला समजतें, हा हि त्या महापुरुषांचा उपकार आहे. हे महापुरुष झाले नसते आणि आमचें हृदय कोणीं जागृत केलें असतें तर समाजाचें नीतिशास्त्र च बनलें नसतें.

मी तर समजतों कीं, या भूदानाच्या कामात मी जो गेलीं ५-६ वर्षें पडलों आहे आणि त्यात जे कांहीं थोडें यश मिळालें आहे त्याचें सर्व श्रेय ज्यांनीं मला सद्‌बुद्धि दिली त्या महापुरुषांचें आहे. आतापर्यंत या आंदोलनात ४२ लाख एकर जमीन मिळाली आहे आणि सुमारें साडेपांच लाख लोकांनीं हें दान केलें आहे. त्यात दोन हजार पुरीं ग्रामदानें हि मिळून

गेलीं आहेत. तमिलनाडमधे हि मदुरा जिल्ह्यांत १२५ हून अधिक ग्रामदानें झालीं आहेत. हिंदुस्थानांतल्या लोकांना त्यागाच्या आणि दानाच्या गोष्टी ऐकणें आवडते. याचें कारण हि हें च कीं, भारतीयांचें हृदय या महापुरुषांनीं तयार केलें आहे.

## स्थिर उत्पन्नाच्या साधनानें आंतरिक जडता येते

ज्या स्थानीं अशा महापुरुषांचें राहणें झालें तेथें लोकांमधे एक विशेष प्रकारची भावना असते. अशा स्थानांतलें श्रीरंगम् हें एक स्थान आहे. पण व्यवहारांत मात्र बरेच वेळां उलटा च अनुभव येतो. असें दिसून येतें कीं तीर्थक्षेत्रांत राहणाऱ्या लोकांच्या अंतःकरणांत कांहींशी कठोरता आढळून येते, तर या क्षेत्रापासून दूर राहणाऱ्या लोकांमधें अधिक मार्दव आढळतें. असें कां होतें असा प्रश्न आहे. याचें कारण स्पष्ट आहे. या ठिकाणीं 'व्हेस्टेड् इंटरेस्ट' उत्पन्न होतें. रामानुजांनीं खूप तपस्या करून लोकांची सेवा केली. ते फार दयाळू होते. जो संदेश ते लोकांच्या कानांत गुप्त रीतीनें सांगत तो च ते जाहीर रीतीनें हि सांगत. ते ज्ञान वांटत च फिरत असत. तरी हि त्यांचें जीवन अतिशय कष्टाचें च होतें. त्यांच्या घरीं दोन दिवस पुरेल इतकें हि धान्य नसे. दारिद्र्याचा पूर्ण अनुभव होता. ते भिक्षा मागत आणि आपल्या पुण्यप्रभावानें लोकांचें जीवन शुद्ध करीत. त्यामुळें त्यांचे हजारों शिष्य झाले आणि समाजांत धर्मविचार पसरला. लोकांनीं त्यांना जमीन दिली, मठ बनवायचें साधन दिलें, देवालयाकरितां कायमचें उत्पन्न करून दिलें. पण जेथें उत्पन्नाचें साधन स्थिर होतें तेथें लोक आळशी, सुस्त आणि कठोर होऊन जातात, जीवनांत ताजेपणा रहात नाहीं. स्थिर उत्पन्नाचें साधन मिळालें कीं आंतलें हृदय जड बनून जातें, भक्ति क्षीण होते, रूढ आणि स्थूल आचार वाढतात. ती यांत्रिक तांत्रिक वस्तु बनते, त्यांतला जीव निघून जातो.

## जुन्या तपस्येवर किती दिवस जगाल?

याचा परिणाम असा होतो कीं, जसे राजवंश बिघडतात तसे सांप्र-

दायिक हि आळशी आणि सुस्त बनतात. भक्तीचें हृदय आणि करुणा यांशी त्यांचा कांहीं संबंध उरत नाहीं. वरच्या वरच्या कामाकडे च ध्यान उरतें. याप्रमाणें जेव्हां भक्तीला सात्त्विक रूप येतें तेव्हां तिचा समाजावरचा प्रभाव संपतो. जगांत नास्तिकता पसरायची जास्त जबाबदारी आस्तिकांवर आहे कारण त्यांच्या जीवनांत करुणा दिसून येत नाहीं. तेव्हां करुणाहीन माणूस जेव्हां आपण आस्तिक आहों असें म्हणतो तेव्हां नास्तिकतेचा प्रचार होतो. रामानुजांच्या दर्शनाने च लोकांचें हृदय बदलून जात होतें. हलींच्या काळीं हि रामकृष्ण परमहंस, म. गांधी, विवेकानंद, दयानंद, अरविंद घोष, रवींद्रनाथ टागोर, सुब्रह्मण्यम्, भारतीयार असे कित्येक महापुरुष होऊन गेले. त्यांचा लोकांवर प्रभाव पडला. पण या देवस्थानांचा या काळीं कोणावर प्रभाव पडला असें एक हि उदाहरण माझ्या माहितींत नाहीं.

आणि लोकांच्या मनावर रामानुजाचा प्रभाव कां पडला? कारण त्याला कोणीं कायमचें उत्पन्न दिलेलें नव्हतें. बिचारा मर मर फिरत होता. इथल्या राजांनीं द्वेष केला तेव्हां म्हैसूरला गेला. निःस्पृहपणें सत्य बोलणाऱ्याची ही च स्थिति होते. राजाला आवडेल तेवढें च बोलावयाचें हें रामानुजांना मान्य नव्हतें. महापुरुषाचा राजे लोकांबरोबर असा तंटा असतो च कारण ते राजाला आवडेल तेवढें च बोलत नाहींत, सत्य बोलतात. लोकांना त्याचें बोलणें बोचलें तर बोचो. पण त्यांना समाजसुधारणा करावयाची असते. त्या कामाच्या मागे ते लागले म्हणून त्याला कायमची प्राप्ति नव्हती. आज जें मिळेल तें आजच्यापुरतें खाऊन टाकत होते; परंतु जेव्हांपासून देवळें आणि मशिदी याच्याकरिता कायम उत्पन्नाच्या व्यवस्था करण्यात आल्या तेव्हां भक्तीची जरूरी उरली नाहीं.

हींच स्थानें जुन्या लोकांच्या स्मृतीमुळे चालत आहेत; पण जो वडिलांची कीर्ति गाईल आणि स्वतः कांहीं करणार नाहीं त्याची काय अवस्था होईल? पूर्वजांची कीर्ति गाऊन आम्हाला कांहीं कमाई होत नाहीं. अमक्याचा बाप श्रीमंत होता. लाखों रुपये त्यानें मिळवले. पण मुलगा काय करतो? मुलगा भीक मागत आहे. बाप मोठा व्यापारी होता. त्याची कीर्ति गाऊन त्याला काय लाभ होणार? रामानुज आणि नंमळवार यांची

कीर्ति किती दिवस गात बसणार ? जुन्या भांडवलावर किती दिवस व्यापार चालणार ? नवें भांडवल पाहिजे.

### तपश्चर्या मंदिराच्या बाहेर होते

हिंदुधर्मामध्यें हल्लींच्या काळीं जी तपश्चर्या केली गेली आहे ती मंदिराबाहेर असणाऱ्या लोकांनीं च केली आहे. समाजाच्या आचारविचारांत जे रोग असतात ते काढून टाकायकरितां नवी नवी तपश्चर्या करावी लागते. गांधींनीं स्वदेशी धर्म सुरु केला. अस्पृश्यतानिवारणाकरितां तपश्चर्या केली. सर्व धर्मांचा समन्वय केला. अद्वैताला सेवेची जोड दिली. योगाची स्थापना करण्याकरिता अरविंदांनीं प्रयत्न केले. आतां भूदानाचें काम सुरु झालें आहे. लाखों लोक दान देत आहेत. प्रेमानें मागतों. आणि लोक प्रेमानें देतात. दयानंदांनीं जातिभेदनिर्मूलनाचा प्रयत्न केला. ही सर्व तपश्चर्या मंदिरांच्या बाहेर झाली. जुन्या काळच्या तपश्चर्येशीं या मंदिरांचीं नांवें जोडलीं आहेत. पंढरपुरात ज्ञानदेवांनीं तपश्चर्या केली. तेव्हां त्यांचा संबंध तेथल्या मंदिराशीं जोडला गेला. रामानुज आणि नंमळवार यांनीं तप केलें. त्यांच्या नांवावर श्रीरंगमचें मंदिर चाललें आहे. परंतु त्या मंदिर आणि मठांच्याकडून नवीन प्रकारचें कांहीं तप होत आहे काय ?

### धर्मकार्यांची जबाबदारी जनतेनें स्वतः च घ्यावी

राजेमहाराजांचीं चरित्रें ऐकून आपण काय बोध घेतला पाहिजे ? हा च कीं कोणी राजा चांगला असतो कोणी वाईट, म्हणून आपल्याला राजा च नको समाजशासनाचा भार राजावर टाकणें चुकीचें आहे. समाजकार्य चालविण्याची जबाबदारी समाजानें च घ्यावी असा निर्णय आम्हीं केला आहे. असा च निर्णय धर्मसंस्थांच्या संबंधीं केला पाहिजे. धर्मकार्यांची जबाबदारी मंदिर-मठांवर सोपवितां उपयोग नाहीं. ती जबाबदारी आपण च घेतली पाहिजे.

मी एक तुम्हांला उदाहरण देतों. बाबाला एक च समाजसुधारणेची विशेष जरुरी वाटत आहे. दहा-पंधरा वर्षांपासून मी त्याविषयीं बोलत आहें. मित्रांच्या बरोबर पुष्कळ चर्चा हि केली आहे. ती गोष्ट मी तुमच्यासमोर

टेवूं इच्छितो. माणसाचें मन होतें. धर्माला साक्ष ठेवून तो गृहस्थ बनतो. आपल्या धर्माचा असा विचार आहे कीं, ठरावीक वर्षांच्या अनुभवानंतर मनुष्यानें गृहस्थाश्रमातून मुक्त झालें पाहिजे. पण आज काय स्थिति आहे ? एकदां मनुष्य गृहस्थाश्रमांत शिरला कीं तो त्यांत च अडकून राहतो, वासना वाढवीत च रहातो. शरीर क्षीण झालें तरी वासना क्षीण होत नाहीं. म्हणून ४५ वर्षांचें वय झाल्यावर गृहस्थाश्रमांतून विधिपूर्वक मुक्त झालें पाहिजे. यामुळें समाजाची शक्ति वाढेल. मुलांच्या हातीं घरचा कारभार लौकर येईल. घरांत द्वेष, झगडे राहणार नाहींत. गृहस्थाश्रमांतून मुक्त झालेला माणूस समाजाला उपयोगी होईल. समाजशास्त्र वाढेल. हें काम मंदिर किंवा मठ करीत आहे किंवा करवून तरी घेत आहे का ? कधीं नाहीं. ते एवढें च करतात कीं, दर्शनाला आलेल्या माणसाला मूर्तीचें मुख दाखवितात आणि पैसा काढतात. दर्शन घेतलें पाहिजे एवढी श्रद्धा पूर्वींची च असते. नवी तपश्चर्या, नव्या प्राणसंचाराचें काम या मंदिर-मशिदींकडून होणें शक्य नाहीं.

### धर्माचा आधार आत्म्यावर असावा

धर्माचा आधार आत्म्यावर असला पाहिजे. पैशावर किंवा अन्नावर नाहीं. म्हणून मीं सांगितलें होतें कीं, पूर्वीच्या काळीं मंदिराना जमीन देत होतां तें ठीक होतें. पण हल्लींच्या काळीं अशी मंदिरांना जमीन देणें योग्य नाहीं. ज्या काळीं ती जमीन दिली गेली तेव्हां जमीन पुष्कळ होती. तिचें सर्व उत्पन्न मंदिराला मिळत असे. आज परिस्थिति वेगळी आहे. म्हणून मंदिरांनीं नवी सेवा, नवी तपश्चर्या केली पाहिजे.

### मुलांविषयीं पित्याचें कर्तव्य

धार्मिक जीवनाचा प्रवाह सतत वाहत राहिला पाहिजे. हें मी केवळ मंदिरापुरतें च सांगत नाहीं. जो बाप आपल्या मुलाकरिता इस्टेट ठेवतो त्याला मी मुलाचा शत्रुच समजतों. मुलाला विद्या दिली पाहिजे, उत्तम शरीर, सामर्थ्य आणि कला शिकवून त्याला सांगितलें पाहिजे. तूं आपला मार्ग शोध. मी सल्ला देईन पण इस्टेट ठेवणार नाहीं. तेव्हा च तो मुलगा पराक्रमी आणि बुद्धिमान् निघेल. नाहीं तर दुर्गुणी आणि आळशी बनेल.

मागे सोडून द्या." हा भूदानाचा विचार आहे. त्याचा च आम्ही प्रचार करीत आहों. तुम्ही जमिनीचे, संपत्तीचे मालक नाहीं. मालक आहे ईश्वर. तिचा सांभाळ करण्याकरितां देवानें ती तुम्हांला दिलेली आहे. म्हणून गरिबांना त्यापैकीं एक भाग द्या. इस्टेट फेकून द्याल तेव्हां च धर्म उज्ज्वल होईल.

## तपश्चर्येचा वारसा संभाळा

श्रीरंगम्‌सारख्या महाक्षेत्राच्या स्मरणानें माझ्या अंतःकरणांत उत्साह उत्पन्न होतो. किती तपश्चर्या या ठिकाणीं झाली आहे! किती भक्तजन या मंदिराकरितां पागल झाले होते! तीन भक्तांची (आलवार) प्रसिद्ध कहाणी तुम्हांला माहीत असेल च. त्यांनीं रात्रभर पाहुण्याच्या अंगावर वाकून उभें राहून त्याचें पावसापासून रक्षण केलें. अशांनीं आपल्या तपश्चर्येची इस्टेट आमच्याकरितां ठेवली आहे. त्यापेक्षां दुसरी मोठी इस्टेट असूं शकेल काय?

मी जेव्हां हिंदुस्थानचें वैभव आठवूं लागतों तेव्हां त्याच्या वैराग्याचें स्मरण होऊन माझ्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागतात. हिंदुस्थानांत लक्ष्मी कमी नव्हती. पण तिच्यापेक्षां आत्मज्ञान जास्त नव्हतें. आत्मज्ञानापुढें सर्व कांहीं तुच्छ आहे असें मानणारे महापुरुष येथें होऊन गेले. आतां हि आपण तपश्चर्येची वृद्धि केली तर च ते आम्हांला शोभादायक होईल. आम्हांला पूर्वजांकडून जी मोठी आत्मज्ञानाची इस्टेट मिळाली तिचें रक्षण करण्याचें काम भूदान करीत आहे असा माझा दावा आहे. माझ्या भाषणानें मंदिर-वाल्यांना दुःख झालें असेल तर मी त्याची क्षमा मागतो. त्यांच्याविरुद्ध मला कांहीं बोलायचें नाहीं. मला फक्त समाजशुद्धि आणि हृदयशुद्धि पाहिजे आहे, धर्म वाढावा, त्याग, प्रेम, भक्ति वाढावी, हें मला पाहिजे आहे. कारण हीच आमच्या देशाची संपत्ति आहे.

श्रीरंगम्
२७-१-'५७

'भागवता 'मध्यें एके जागीं द्रविड देशाविषयीं फार श्रद्धा दाखविली आहे. म्हटले आहे कीं, जेथें कावेरी आणि ताम्रपर्णी नद्या आहेत तेथें भक्तिमार्ग स्थापित होईल. सर्व दुनियेचा लोप झाला तरी हा प्रदेश जगाला रस्ता दाखवील असे महावचन संकुचित अनुभवानें लिहिलें जाऊं शकत नाहीं. तसें हल्लींचे देशभक्त अहंकारानें आपापल्या देशाची आणि प्रांताची खूप बढाई सांगत असतात. पण भागवतकार अहंकारी नव्हता, महान् भक्त होता. तो इतका निरहंकारी होता कीं, त्याचें नांव हि लोक जाणत नाहींत. तो ग्रंथ कोणीं लिहिला तें अजूनपर्यंत कोणाला समजले नाहीं. असा माणूस जेव्हां म्हणतो कीं, द्रविड देशात भक्तिभाव स्थापित होईल तर त्याच्यावर विश्वास ठेविला पाहिजे. मी तर विश्वास ठेवतां च. मीं तामिलनाडमध्यें प्रवेश केला तो अगदीं नम्रतेनें आणि येथें आपल्याला कांहीं शिकायला मिळेल या भावनेनें.

## सख्यभाव भारताचें वैशिष्ट्य

आज येथें जशी सभा बसली आहे तशी मला बिहारमध्यें दिसली नाहीं, उत्तर प्रदेशांत दिसली नाहीं आणि राजस्थानात हि नाहीं. स्त्री-पुरुष सर्व एके जागीं बसले आहेत. कोणत्या हि तऱ्हेचा भेदभाव नाहीं. स्त्री-पुरुषांना समान मानणें हें भक्तीचें एक लक्षण आहे. कारण जेथें भक्ति असते तेथें स्त्री-पुरुषभावना क्षीण होते, टिकूं शकत नाहीं. त्याचें हि भागवतांत वर्णन आहे. एका भगवताच्या अनेक मूर्ती होत्या. भगवान् अनेक रूपांत प्रकट झाले. दोन्ही बाजूंना एक एक स्त्री आणि मधें एक एक माधव. कसला हि फरक नव्हता. हें वर्णन मजभूमीविषयीं आम्ही वाचत होतों. पण येथें पाहायला मिळत आहे. माझें म्हणणें आहे कीं, 'ज्या प्रदेशांत असा भक्तिभाव आहे, जेथले लोक हा भेदभाव विसरतात, त्या ठिकाणीं मालक आणि मजूर हा भेद टिकेल का? उत्तर हिंदुस्थानांत याप्रमाणें स्त्रिया सभेला याव्या.

देईल या आशेनें येथें हजारों लोक आलेले आहेत. प्रेमानें काम होत असेल तर तेथें द्वेष हि असावा असें कोणाला वाटणार नाहीं. द्वेषानें हि प्रश्न सुटत असेल तरी तो सोडविला पाहिजे असें आमच्या कांहीं मित्रांना वाटतें. पण त्याला हि प्रेमानें प्रश्न सुटत असेल तर द्वेषानें सोडविणें पसंत नाहीं. याप्रमाणें प्रेमानें प्रश्न सुटला तर ते देखील प्रेमाच्या पक्षात सामील होतील. मला विश्वास आहे कीं, सर्व पक्षांचे लोक या आंदोलनात सहयोग देतील. कारण सगळ्याना जमीन मिळूं नये, सख्यभाव असूं नये, असें कोणत्या च पक्षाला वाटत नाहीं.

येथें मिरासदारांचे संघटन झालें आहे. पण त्यांस हि सख्यभाव नको आहे असें मला वाटत नाहीं कायद्यानें जमिनी काढून घेतल्या जाणार आहेत या समजुतीनें ते घाबरले आहेत. त्यांच्या मनांत भयाशिवाय दुसरा कांहीं वाईट भाव नाहीं. त्यांच्या मनांत करुणा, प्रेम सख्यभाव नाहीं. त्यांना आपलें उच्च स्थान कांहीं हि करून सभाळून टेवायचें आहे असें मला वाटत नाहीं. परंतु जबरदस्तीनें जमिनी काढून घेण्याच्या गोष्टी बोलल्या जातात तेव्हां झगडे सुरू होतात. एक म्हणतो, आम्ही हिसकावून घेऊं. दुसरा म्हणतो, आम्ही देणार नाहीं. हें ऐकून मला बरें वाटलें. कारण त्यामुळें दोघामधल्या शक्तीचें दर्शन झालें. हें जिवंतपणाचें लक्षण आहे. तुम्ही आम्हांला धमकावून घेणार असाल तर आम्ही देणार नाहीं असें म्हणण्यांत तेजस्विता आहे. आणि तुम्ही देणार नसाल तर आम्ही हिसकावून घेऊं हें म्हणण्यांत हि तेजस्विता आहे. इकडे एक सूर्य आहे आणि तिकडे दुसरा. याप्रमाणें आकाशांत दोन सूर्य दिसूं लागलात. सूर्य तेजस्वी आहे ही गोष्ट चांगली आहे. पण जगामध्यें दोन सूर्य एकत्र येतील तर आमची काय वाट होईल ? आम्ही सर्व जळून खाक होऊन जाऊं. परंतु दोन नाहीं, पन्नास चंद्र आले तरी कांहीं नुकसान होणार नाहीं. रात्रीं लाखों चांदण्या उगवतात पण त्यांचा आम्हांला त्रास होत नाहीं; उलट आनंद च होतो. म्हणून तेजस्वितेचें दर्शन मला चांगलें वाटलें. पण तें कामाचें नाहीं. तुम्हांला पंचामिसाधन करायचें असेल तर करा. पण यांचा त्यांच्याशीं झगडा आणि त्यांचा यांच्याशीं असे झगडे करून काम

याकरितां २०-२५ वर्षे चळवळ करावी लागली. येथें ती अगदीं मामुली गोष्ट वाटते. जेथें याप्रमाणें अभेदप्रवृत्ति आहे तेथें मालक-मजूर हा भेद टिकणार नाहीं. माझा विश्वास आहे कीं, कावेरी नदी हा भेद राहूं देणार नाहीं. याचें दर्शन आज सभेमध्यें झालें. मी तर एक क्षुल्लक माणूस आहें. माझ्यांत कांहीं योग्यता नाहीं तरी हि माझा निश्चय आहे कीं, जोंपर्यंत मालक-मजूर हा भेद राहील तोंपर्यंत माझें काम चालू च राहील. मी तर हिंदुस्थानांत सख्यभाव उत्पन्न करूं इच्छीत आहें. ही कांहीं नवी गोष्ट नाहीं. भक्तिमार्गाची वस्तु आहे. सख्यभावात सर्व समान असतात.

## साहित्यांतलें सख्य व्यवहारांत येवो

सख्यभावांत जो आनंद आहे तो दुसरीकडे कोठें नाहीं. जगामध्यें प्रेमाचे जितके भाव आहेत त्या सर्वांत सख्यभाव श्रेष्ठ आहे. हा सख्यभाव हिंदुस्थानांत जाग्रत व्हावा अशी माझी इच्छा आहे. तो तामीळ साहित्यांत आपल्याला पुष्कळ पाहावयास मिळतो. इंद्राला आणि अग्नीला भाऊ म्हणून संबोधिलेलें आपल्याला वेदामध्यें अनेक ठिकाणीं दिसतें. जीवात्मा आणि परमात्मा सख्य आहे असें म्हणतात. ज्या देशात लोक याप्रमाणें भगवंताशीं हि सख्य जोडूं इच्छितात तेथले लोक आपसात मालक मजूर कसे बनतील? आमचे भक्त तर भगवंताशीं झगडा हि करतात. ईश्वराजवळ अदबीनें वागत नाहींत. बाहेरचे भक्त ईश्वराला मातापिता किंवा गुरु मानतील. परंतु येथले भक्त देवाशीं जास्त परिचित होतात आणि इतकें हि अंतर राखीत नाहींत. याप्रमाणें ज्या देशांतील भक्तिभाव स्वतःमध्यें आणि भगवंतामध्यें अंतर राखीत नाहीं ते आपापसांत अंतर कसे राखतील? म्हणून मला विश्वास होता व आहे कीं, तामिलनाडमध्यें मालक-मजूर आणि भूमिहीन असले भेद च नाहींसे होऊन जातील. या श्रद्धेने मीं तामीलनाडमध्यें प्रवेश केला आहे. जोंपर्यंत हा सख्यभाव व्यवहारात येणार नाहीं तोंपर्यंत आपल्याला चैन पडतां कामा नये.

## शांत तेज प्रकट होवो

एक माणूस येथें आला आहे. तो प्रेमानें आपल्याला जमीन मिळवून

देईल या आशेनें येथें हजारों लोक आलेले आहेत. प्रेमानें काम होत असेल तर तेथें द्वेष हि असावा असें कोणाला वाटणार नाहीं. द्वेषानें हि प्रश्न सुटत असेल तरी तो सोडविला पाहिजे असें आमच्या कांहीं मित्रांना वाटतें. पण त्याला हि प्रेमानें प्रश्न सुटत असेल तर द्वेषानें सोडविणें पसंत नाहीं. याप्रमाणें प्रेमानें प्रश्न सुटला तर ते देखील प्रेमाच्या पक्षांत सामील होतील. मला विश्वास आहे कीं, सर्व पक्षांचे लोक या आंदोलनांत सहयोग देतील. कारण सगळ्यांना जमीन मिळूं नये, सख्यभाव असूं नये, असें कोणत्या च पक्षाला वाटत नाहीं.

येथें मिरासदारांचें संघटन झालें आहे. पण त्यास हि सख्यभाव नको आहे असें मला वाटत नाहीं कायद्यानें जमिनी काढून घेतल्या जाणार आहेत या समजुतीनें ते घाबरले आहेत. त्यांच्या मनात भयाशिवाय दुसरा कांहीं वाईट भाव नाहीं. त्यांच्या मनांत करुणा, प्रेम सख्यभाव नाहीं. त्यांना आपलें उच्च स्थान कांहीं हि करून संभाळून ठेवायचें आहे असें मला वाटत नाहीं. परंतु जबरदस्तीनें जमिनी काढून घेण्याच्या गोष्टी बोलल्या जातात तेव्हां झगडे सुरु होतात. एक म्हणतो, आम्ही हिसकावून घेऊं. दुसरा म्हणतो, आम्ही देणार नाहीं. हें ऐकून मला बरें वाटलें. कारण त्यामुळें दोघांमधल्या शक्तीचें दर्शन झालें. हे जिवंतपणाचें लक्षण आहे. तुम्ही आम्हाला धमकावून घेणार असाल तर आम्ही देणार नाहीं असें म्हणण्यात तेजस्विता आहे. आणि तुम्ही देणार नसाल तर आम्ही हिसकावून घेऊं हें म्हणण्यांत हि तेजस्विता आहे. इकडे एक सूर्य आहे आणि तिकडे दुसरा. याप्रमाणें आकाशांत दोन सूर्य दिसूं लागतात. सूर्य तेजस्वी आहे ही गोष्ट चांगली आहे. पण जगामध्यें दोन सूर्य एकत्र येतील तर आमची काय वाट होईल ? आम्ही सर्व जळून खाक होऊन जाऊं. परंतु दोन नाहीं, पन्नास चंद्र आले तरी कांहीं नुकसान होणार नाहीं. रात्रीं लाखों चांदण्या उगवतात पण त्यांचा आम्हांला त्रास होत नाहीं; उलट आनंद च होतो. म्हणून तेजस्वितेचें दर्शन मला चांगलें वाटतें. पण तें लाभाचें नाहीं. तुम्हांला पंचाग्निसाधन करायचें असेल तर करा. पण यांचा त्यांच्याशीं झगडा आणि त्यांचा यांच्याशीं असे झगडे करून काम

करतां येईल का ? ब्राह्मण-ब्राह्मणेतर, हरिजन-परिजन, हिंदु-मुसलमान, गांववाले-शहरवाले, तामील-तेलगू असे अनेक झगडे वाढले आहेत. त्यांत तेज दिसतें. पण शांति नाहीं. मनुष्यांत तेज असावें पण तें फार अधिक असूं नये. भाजीमध्यें थोडेंसें मीठ पाहिजे; त्यामुळें ती चवदार होते. पण शेरभर भाजींत शेरभर मीठ घातलें तर ती खाण्यालायक राहाणार नाहीं. याप्रमाणें समाजांत नुसतें तेज च वाढेल तर त्यामुळें आग च लागेल. तेज असावें पण तें शीतल असावें. म्हणून "**नमः शांताय तेजसे।**"—शांत तेजाच्या देवाला नमस्कार असें शास्त्रांत म्हटलें आहे. आपल्या देशांत शांत तेज प्रकट व्हावें अशी माझी इच्छा आहे. मिरासदारांनीं हि आमच्या पक्षांत यावें. माझा त्यांच्यावर अविश्वास नाहीं. सर्वांनीं मिळून काम करावें हे मला पाहिजे आहे. मी मिरासदारांना सांगतों कीं, 'तुम्ही खरे मिरासदार व्हा.'

### बाप-लेकांत सहकार्य असो

जो बाप "हे माझें कांहीं नाहीं सर्व मुलाचें च आहे" असें समजतो तो च खरा बाप. "*माझें जे कांहीं आहे ते सारें गांवाचें आहे. मी गांवाचा सेवक आहे*" असें जो म्हणतो तो च खरा मिरासदार होईल. गांववाले त्याला आपला पिता समजतील. बाप आपलें धन मुलापासून वेगळें राखील तर दोघांची हि दुर्दशा होईल. कारण मुलाला अक्कल नाहीं आणि बापांत शक्ति नाहीं. अक्कल आणि ताकद याची मिळणी झाली पाहिजे. श्रमशक्ति आणि बुद्धिशक्ति यांचा मेळ सर्वोदयांत होतो. म्हणून मिरासदारांनीं सर्वोदयाचें अवश्य सभासद झालें पाहिजे. म्हणजे च त्यांना मान लाभेल. आम्ही तुमच्यापासून वेगळे आहों असें म्हणून ते मुलाच्याविरुद्ध उभे राहतील तर काय बाट होईल ? ज्याचे मुलगे मरतील त्याचे बाप हि राहणार नाहींत. कारण बापाचें पितृत्व मुलाच्या अस्तित्वावर अवलंबून आहे. तसें च मिरासदारांची मिरासदारी त्यांनीं लोकाचा सांभाळ करण्यावर अवलंबून आहे.

### रक्ष्य रक्षकापासून वेगळे कसे राहतील ?

*मिरासदाराचा अर्थ रक्षण करणारा असा आहे. तो ज्याचें रक्षण*

करायचे त्याच्यापासून वेगळा कसा राहूं शकेल? मी तुमच्यापासून वेगळा राहणार असें मुलगा म्हणूं शकेल. पण बाप 'तू माझ्याहून वेगळा नाहींस. तुला इस्टेटींत हिस्सा पाहिजे ना? सर्व इस्टेट तुझी च आहे' असें सांगून त्याला जिंकील. मिरासदारांच्यामध्यें भय उत्पन्न केलें गेलें आहे. म्हणून ते बाजूस राहूं इच्छितात असें मला वाटतें. सर्वोदयाचें मजूरावर जसें प्रेम आहे तसें मिरासदारावर हि आहे. दोघांचें कशांत भले आहे तो मार्ग सर्वोदय दाखवीत आहे त्यामुळें गांवोगांवीं मजबूत ग्रामराज्ये बनतील त्या गावात जितके लोक असतील ते सर्व मालक आणि सर्व मजूर असे बनतील. दोन्हींचे गुण दोघांमध्ये येतील. लहान कुटुंबापेक्षा मोठ्या कुटुंबाचें वैभव मोठें होईल. म्हणून ग्रामदानानें सर्व प्रश्न सुटेल असा माझा विश्वास आहे. मजूर आणि मिरासदार दोघांचें भय नाहींसें होईल. सर्वांना निर्भय करणे हा च सर्वोदयाचा कार्यक्रम आहे.

कल्लुनी (तंजावर)
२०–१–'५७.

## योजना आणि श्रमशक्ति : ३२ :

आज कांहीं मजुरांबरोबर माझी मुलाखत झाली. त्यांनीं आमच्या पदयात्रेकरितां एक चांगला रस्ता बनविला. रस्ता जुना च होता, पण तो त्यांनीं दुरुस्त केला. हें आहे श्रमदान. जगांतल्या सर्व वस्तु श्रमानें च उत्पन्न होतात. आज जगांत श्रम करणारे लोक थोडे आहेत आणि दुसरे लोक योजना बनवीत आहेत. योजना बनविणारे आणि श्रम करणारे वेगळे पडले तर वस्तु बनत नाहीं.

### चरखा आणि चेंडूचें उदाहरण

आम्ही दोन्ही हातांनीं चरखा चालवतों. एक हात चाक फिरवतो आणि दुसरा सूत काढतो. चाक चालविणारा हात योजना करणारा आहे आणि सूत काढणारा परिश्रम करणारा आहे. चाक फिरविणारा ते जर जोरानें

फिरवील तर दुसऱ्या हाताला हि जलद सूत काढावें लागतें. तो जर हळूहळू चाक फिरवील तर याला हि हळूहळू सूत काढावें लागेल. एक योजना करणारा–दिशा दाखविणारा आहे, आणि दुसरा त्याप्रमाणें चालणारा–योजना अमलांत आणणारा. दोन्ही एका मनुष्याचे च हात आहेत. म्हणून काम चांगलें चालतें. समजा, दोन माणसें आहेत. एक चाक फिरवीत आहे आणि दुसरा सूत काढतो आहे. तर मोठी मुष्किल होऊन जाईल. चाक फिरविणारा केव्हां जोरानें फिरवील केव्हां सावकाश फिरवील याचा पत्ता लागणार नाहीं. वेगाप्रमाणें सूत काढावें लागतें. एवढें च नाहीं तर सूत कातणाऱ्याची गति पाहून चाक फिरवावें लागतें. एकाची गति मंद असेल तर दुसऱ्याची हि मंद व्हावी लागते.

इकडून कोणीं चेंडू फेकला आहे. आमच्या डोळ्यांनीं तो पाहिला. पाय तो पकडायला धांवले आणि हातांनीं तो पकडला. या हिशोबानें तिघांना काम करावें लागतें. पायाला पळावें लागतें आणि त्या हिशोबानें च हाताला आणि डोळ्याला तयारी करावी लागते. हात, पाय आणि डोळे एका च मनुष्याचे आहेत. म्हणून तो चेंडू पकडूं शकतो. समजा तीन माणसें आहेत. एक पहातो, पण हातानें धरूं इच्छीत नाहीं. दुसरा पकडण्याची तयारी करतो, पण पाहूं किंवा पळूं इच्छीत नाहीं. आणि तिसरा पळतो, पण धरूं किंवा पाहूं इच्छीत नाहीं. अशा तीन माणसांचेकडून चेंडू धरला जाईल काय ?

## योजना आणि श्रम यांच्या संयोगानें च यश मिळतें

कांहीं लोकांचेजवळ बुद्धि आहे म्हणून ते योजना करूं शकतात आणि कांहीं लोकांचेजवळ श्रमशक्ति आहे म्हणून ते काम करू शकतात. पण ते दोघे जर वेगळे होतील तर काम होणार नाहीं. दोघांनीं मिळून एक परिवार बनविला पाहिजे. मजुरांची कदर योजना करणाऱ्यांनीं केली पाहिजे आणि योजना करणाऱ्याची कदर मजुरांनीं केली पाहिजे दोघांनीं एकमेकांचा विचार घेऊन योजना केली तर काम होईल कामाची जबाबदारी दोघांनीं घेतली पाहिजे. आणि दोघांनीं तिचा लाभ घेतला पाहिजे. याप्रमाणें योजना

करण्यांत आणि फळ भोगण्यांत दोघे हि सहकारी होतील तेव्हा च काम चांगलें बनेल.

## कर्माचीं तीन अंगें

सारांश, कर्माची तीन अंगे असतात. पहिलें अंग योजना. कर्म करण्यापूर्वी योजना असली पाहिजे म्हणून तिला पहिलें स्थान. पण केवळ दिल्लींत बनविलेली योजना चालणार नाहीं. त्यांनीं आणि खेड्यांतल्या लोकांनीं एकत्र बसून योजना बनविली पाहिजे तेव्हां च काम होईल. त्याशिवाय कामाला आरंभ च होणार नाहीं. प्रत्यक्ष काम करण्याची जबाबदारी हे कर्माचें दुसरे अंग आहे. त्यात केवळ मजुरांचा च नाहीं, तर योजना करणाऱ्यांचा हि हात असला पाहिजे. आणि जें फळ मिळेल तें त्याचें तिसरें अंग आहे. भोग हि सर्वांना सारखा मिळाला पाहिजे. तेव्हां च काम होईल आणि शक्ति हि वाढेल.

आज हिंदुस्थानची काय स्थिति आहे ? जे जमिनीचे मालक आहेत ते विशेष काम करीत नाहींत. काहीं तर मुळीं च काम करीत नाहींत. जन्मभर शहरात राहतात. मुलाना कॉलेजचें शिक्षण देतात. कॉलेजचें शिक्षण मिळाल्यावर तीं मुलें काय शेतावर नांगर धरणार आहेत ? तें सर्व काम मजूर च करणार आहेत. पण योजना करताना त्याना कोणी विचारीत नाहींत. शेतामध्ये काय पेरायचें हे बैलाला विचारतात का ? मजुरांना ते असें च समजतात. बैलाना ज्याप्रमाणे निकृष्ट भाग मिळतो तसें च खराब धान्य मजुरांना आणि उत्तम धान्य मालकाना मिळतें. मी मोठीं मोठीं फार्मस् पाहिलीं आहेत. तेथे मजूर काम करतात, मालक नाहीं. मजुरांना त्यांच्या श्रमांकरतां पैसा मिळतो. त्यातून ते धान्य विकत घेतात. पण जे उत्तम बीं ते पेरतात त्यांतले त्यांना काहीं मिळत नाहीं. बैल हि तें धान्य पाहतो पण खाऊं शकत नाहीं. मालक म्हणतो, आम्ही मजुरांच्याकरितां स्वस्त धान्याचीं दुकानें उघडलीं आहेत. पण स्वस्त धान्य म्हणजे खराब-रद्दी धान्य. शेताच्या उत्पन्नांत मजुरांचा प्रश्न च नाहीं. योजनेमध्ये त्याची पर्वा नाहीं आणि कामांत आमचा भाग नाहीं, त्याचा आहे. भोगामध्ये मुख्य हिस्सा आमचा असणार, त्यामुळे समाजाचा काय लाभ होईल ? समाजांत असंतोष वाढेल,

काम चांगलें होणार नाहीं, उत्पन्न वाढणार नाहीं. कामामध्यें मजुराचा भाग ज्यास्त राहील आणि धान्यावर कांहीं च अधिकार रहाणार नाहीं तर तें धान्य मालकाला पचणार नाहीं.

## पापभक्षक श्रीमंत

महाभारतात एक कहाणी आहे. बैल ब्रह्मदेवाकडे गेले. त्यांची तक्रार होती कीं, शेतकरी आमहांला इतकी फार त्रास देतात. ब्रह्मदेव त्यांना म्हणाला, हें पहा, जो शेतकरी बैलाची चिंता करणार नाहीं त्याला खायला न घालतां आपण खाईल, त्याच्या शेतात चांगलें पीक येणार नाहीं आणि मेल्यानंतर त्याना सद्‌गति मिळणार नाहीं. ब्रह्मदेवानें बैलांना इतकें वरदान दिलें, तो मजुराच्याकरितां कांहीं करणार नाहीं का? त्यास च त्यानें मालकांना शाप दिला असला पाहिजे. मालक शेतात काम करीत नाहींत. स्वच्छ हवा आणि सूर्यकिरणांचा लाभ घेत नाहीत, त्यामुळें त्यांना अन्न पचत नाहीं. वेदानें तर स्पष्ट च सांगितलें आहे कीं, **"नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलाऽऽदि।"** याचा अर्थ जो माणूस आपल्या भावाचें पोषण करीत नाहीं, मित्राचें पोषण करीत नाहीं, तो अन्न खात नाहीं, पाप खातो.

आज भारताला याचा अनुभव येत आहे. दुसऱ्या देशांत हि आज असें च, घडत आहे. सर्व ठिकाणीं असतोष बेकार माणूस चोरी करतो. तेव्हां त्याचा न्याय करायला दुसरा एक बेकार उभा राहतो आणि त्याला तुरुंगांत पाठवतो. हा तुरुंग, शिक्षा, न्यायाधीश, न्याय सर्व कांहीं बेकार आहे. आपण त्याचें मूळ कारण शोधून काढलें पाहिजे आणि त्यावर प्रहार केला पाहिजे. असें व्हायला पाहिजे. पण तसें होत नाहीं. त्याच्याऐवजीं दंड-शक्तीचा उपयोग केला जातो. त्याला जमीन दिली पाहिजे. गावच्या लोकांचें एक कुटुंब होईल, सर्व जमीन गावची होईल, जमिनीचा कोणी मालक असणार नाहीं, वर हा सर्व असंतोष नाहींसा होईल आणि सर्वांचा फायदा होईल. सर्वांना काम मिळेल, कोणी बेकार राहणार नाहीं.

**तिरुकाटपल्ली** (तंजावर)
२१-१-'५७

एक धर्मस्थान आहे. येथें कोणीं संतांनीं तपश्चर्या केली होती. सर्व भक्तांनीं आणि तपस्वी लोकांनीं आपल्याला शिकवण दिली आहे कीं, मी आणि माझें सोडून द्या. मनुष्यानें आसक्ति सोडली पाहिजे. लोक हें सर्व ऐकतात, मान्य हि करतात. आणि थोडे लोक त्याप्रमाणें वागतात हि. पण बहुसंख्य लोक ही गोष्ट अमलांत आणीत नाहींत.

## ममत्व सोडणें सोपें नाहीं

ममत्व सोडा ही गोष्ट लोक ऐकतात पण ही आपल्याकरितां नाहीं. आपल्या हातून हें व्हावयाचें नाहीं असें समजतात. लोकांनीं हा उपदेश अंमलांत आणणे हे सोपें नाहीं. ही गोष्ट मान्य केली पाहिजे तरी हि थोड्या व्यक्ति त्याप्रमाणें वागतात. व्यक्तिगत आचरण हि करतात. त्यामुळें एक वातावरण निर्माण होतें यात शंका नाहीं. साधारणतः लोक ममत्व सोडणें याचा अर्थ असा समजतात कीं, घरदार सोडून समाजाला किंवा परमेश्वराला शरण जाणें. सर्वस्वाचा त्याग केला तर तो संन्यास च होतो. बाबाला त्याचा पुष्कळ अनुभव आहे. त्यानें स्वतः त्याचा अंमल केला आहे म्हणून च तो आज तुमच्यापुढें उभा आहे. बाबानें स्वतः ममत्व सोडलें नसतें तर तुमच्यापुढें येऊन तुम्ही ममत्व सोडा असें त्याला सांगतां च आलें नसतें. बाबानें ही गोष्ट स्वतः आचरण्याचा प्रयत्न केला म्हणून लोक त्याचें बोलणें ऐकून घेतात आणि हा उपदेश कोणी व्यक्ति ग्रहण हि करतात. येथें अनेक स्त्री-पुरुष बसलेले आहेत. त्यांना मुलें बाळें आहेत. त्यांच्याकरितां ते सर्वस्वाचा त्याग करीत च असतात. जर मी त्यांना म्हणालो कीं, हा सर्व स्नेह आणि आसक्ति सोडून द्या, तर स्त्रिया तो सोडायला तयार होतील का? असें सांगणाऱ्याची त्या मूर्खांत नाहीं तर महापुरुषांत गणना करतील.

## पुलाची आवश्यकता

असें आहे तरी माझी इच्छा आहे कीं, समाजानें हा उपदेश अमलांत आणावा आणि त्या आधारावर च समाजाचें जीवन बनावें. त्याला कांहीं मार्ग दाखवावा लागेल. लोक म्हणतील तुम्हीं सांगितलेली गोष्ट फार उच्च कोटींतली आहे; पण तिथें पोहोंचायचा मार्ग कोणता? समजा, नदीच्या पलीकडच्या तीरावर फार आनंद आहे, मोठा स्वर्ग आहे, तर कोणी माणूस पोहून तेथें जाऊं शकतो. किंवा जातो आणि म्हणतो कीं, परतीरावर आनंद च आनंद आहे. हें ऐकून दुसरे लोक तिकडे जाण्याचा मार्ग विचारतात. तो सांगतो, अरे, मी तर पोहत तिकडे न चाललों आहें. दिसत नाहीं का तुम्हाला? पाण्यांत उडी मारा. तेव्हां लोक सांगतील, आम्हाला पोहता येत नाहीं. आमच्या हातून हें जमायचें नाहीं. अशांच्याकरितां पूल बनविला पाहिजे. पूल बनल्यावर पुलावरून ते पलीकडे जातील, तिथला स्वर्गसुखाचा आनंद लुटतील आणि तिकडून या किनाऱ्यावर येतील. आल्यावर येथल्या लोकांना तो आनंद वांटतील. हें काम पुलानें होईल.

मी हि मनांत विचार करतों आहे कीं, असा कांहीं मार्ग सांपडतो का? मला एक मार्ग सुचला. त्या मार्गावरून सर्व लोकांना जातां येईल. तो रस्ता हा च कीं, मी माझें म्हणणें सोडून देणें. आपल्याजवळ कांहीं आसक्ति न ठेवणें. हें करायची हि एक सोपी पद्धति आहे. ती म्हणजे परिवार मोठा करणें. तुम्ही आपल्या मुलावर प्रेम करूं नका असें मी स्त्रियांना सांगत नाहीं. प्रेम करण्यांत कांहीं दोष नाहीं. उलट ज्याच्या अंतःकरणांत प्रेम आहे ते परमेश्वराचे भक्त च आहेत. मी त्यांना असें सांगेन कीं, गांवांतल्या सगळ्या मुलांचेवर च प्रेम करा. घरात जीं दोन चार मुलें आहेत तेवढीं च तुमचीं मुलें नाहींत. गावांत जितकीं मुले आहेत तीं सर्व तुमचींच मुलें आहेत असें समजा. मग तुम्हाला बद्रिकेदारला जायला नको किंवा 'ऐय्यर'ला. तुमचें गांव च तीर्थक्षेत्र बनून जाईल. कुटुंबापुरतें मर्यादित असलेलें प्रेम व्यापक बनवा. मी घर सोडायला सांगत नाहीं. घर मोठें करायला सांगतो. मग तुमचा उपदेश आम्हाला जमण्यासारखा नाहीं असें या स्त्रिया म्हणणार नाहींत. घर सोडणें कठीण आहे, पण मोठें करणें कठीण नाहीं, सोपें आहे.

## कष्टाशिवाय कोणतें हि चांगलें काम घडत नाहीं

मी हें काम सोपें आहे म्हणतों; पण त्यात हि कांहीं कठीणपणा नाहीं असें नाहीं. कष्टाशिवाय कोणतें च चागलें काम घडत नाहीं; म्हणून कांहीं कष्ट माणसानें केले पाहिजेत च. सामान्य विद्या प्राप्त करून घ्यायला हि किती कष्ट पडतात. व्यासानीं महाभारतांत म्हटलें आहे कीं, "**सुखार्थिनः कुतो विद्या कुतो विद्यार्थिनः सुखम् ।**"—विद्या पाहिजे असेल तर सुख कसें मिळेल? विद्या प्राप्त करायला हि सुख सोडावें लागतें.

महाभारतांत एक गोष्ट आहे. सत्यभामा आणि द्रौपदी बोलत बसल्या होत्या. सत्यभामेनें विचारलें, 'स्त्रियांना सुख कसें मिळेल?' द्रौपदीनें उत्तर दिलें, '**दुःखेन साध्वी लभते सुखानि ।**'— साध्वीला दुःखानें च सुख मिळतें. सुख मिळवायला हि कांहीं दुःख सहन करावें लागतें. साधी व्यापाराची गोष्ट घ्या. घर सोडून परदेशीं जावें लागतें. कष्ट सोसावे लागतात. परकी भाषा शिकावी लागते. केव्हा उपवास हि घडतात. हे सर्व कष्ट सहन केले तर च व्यापार होईल. कोणतें हि काम कष्टाशिवाय होऊं शकत नाहीं. असे कष्ट करायला लोक तयार होतात; पण संन्यास किंवा गृहत्याग ते करूं शकत नाहींत.

## मरणें-मारणें याचा हि रस्ता कठीण आहे

लोकांना धर्ममार्ग प्रिय आहे; तरी तो ते स्वीकारू शकत नाहींत. याचें मुख्य कारण हें च कीं, त्यांना सोपा रस्ता दाखविलेला नाहीं. स्वर्ग फार चागला आहे. पुराणात त्याचें खूप वर्णन आहे. आमचे कम्युनिस्ट मित्र हि आमची आदर्श रचना अमुक प्रकारची होईल असें आपल्या स्वर्गाचें वर्णन करतात. त्या स्थितींत राज्य हि असणार नाहीं असें ते म्हणतात; पण लोक पुराणवाल्यांना आणि कम्युनिस्टांना विचारतात, तुमचा स्वर्ग तर चांगला आहे; पण त्यावर चढायच्या पायऱ्या तर दाखवा. यावर पुराणवाले सागतात कीं, स्वर्ग पाहायला मेलें पाहिजे. लोक म्हणतात, छान आहे तुमचा स्वर्ग. पाहूं तो मेल्यावर. कम्युनिस्ट लोक सागतात, मारपीट करून

स्वर्ग प्राप्त करून घ्यावा लागतो. याप्रमाणें पुराणवाले मरून स्वर्गाला जायची गोष्ट बोलतात आणि कम्युनिस्ट मारून स्वर्गाला नेणार आहेत; पण लोकांना हे दोन्ही मार्ग फार कठीण आहेत. ते मरायला हि तयार नाहींत, मारायला हि तयार नाहींत. ते म्हणतात, हल्लींच्या च परिस्थितींत या च जगांत स्वर्ग मिळाला पाहिजे. मी पुन्हा सांगतों कीं, गांवाची सामूहिक मालकी बनविणें हा रस्ता सर्वांत सोपा आहे.

## अर्थशास्त्री, वैज्ञानिक आणि धर्मशास्त्री या तिघांना ग्रामदान पसंत

परमेश्वर अत्यंत व्यापक आहे. तो चहूंकडे पसरलेला आहे. आपण हि जितके व्यापक होऊं तितके ईश्वराजवळ पोहचूं. एक बेडूक होता. त्यानें बैल पाहिला तो आईजवळ जाऊन म्हणाला, 'मीं आज केवढा मोठा प्राणी पाहिला!' आईनें विचारलें, 'किती मोठा? पोट फुगवून म्हणाली, इतका मोठा होता का?' असें पोट फुगवतां फुगवतां पोट फुटून गेलें. त्याप्रमाणें तुमचें कुटुंब विश्वव्यापक बनवा असें जर मीं सांगितलें तर आपण त्या बेडकीप्रमाणें पोट फुटून मरून जाऊं. तूं आपलें घर सोडून दे हें म्हणणें जितकें कठीण आहे तितकें च तूं आपलें घर विश्वव्यापक बनव असें म्हणणें कठीण आहे. हिंदुस्थानात या च दोन गोष्टी चालल्या आहेत. एक तर घर सोडून संन्यासी हो किंवा सगळ्या जगाला कुटुंब मान–विश्वकुटुंबी हो. दोन्ही गोष्टी कठीण आहेत. म्हणून मीं मध्यम मार्ग काढला आहे. साऱ्या गावचें एक कुटुंब बनवा हें फार कठीण नाही. याकरितां काल हि अनुकूल आहे. म्हणजे असें करण्यानें लाभ होणार आहे आत्म्याचें कल्याण होईल आणि उन्नति हि होईल. विज्ञानाच्या या युगात छोटे छोटे परिवार टिकणार नाहींत. मोठे पसरलेले देश हि टिकणार नाहींत. आज सर्व जगाचे परस्पर-संबंध जवळ आले आहेत म्हणून पूर्वींसारखी संकुचित वस्तु आतां चालणार नाहीं. ती व्यापक केली पाहिजे. ग्रामदानाची गोष्ट विज्ञानाला आणि या काळाला अनुकूल अशी आहे. म्हणून वैज्ञानिक आणि अर्थशास्त्री तर त्यावर खूष आहेत आणि त्यागराजन् आणि अप्पास्वामी हि खूष आहेत. कारण तुम्ही आतां घराच्या बाहेर आला आहां. तुम्ही मोठें कुटुंब बनविलें आहे. चार पावलें तर तुम्ही आता आमच्याकडे आलांत. ग्रामदानाची गोष्ट

वैज्ञानिकांना आणि अर्थशास्त्रज्ञांना जितकी पसंत आहे तितकी च ती धर्मशास्त्रज्ञांना हि पसंत आहे. ग्रामदानाच्या विरुद्ध अर्थशास्त्रज्ञ, वैज्ञानिक आणि धर्मशास्त्री यांच्याजवळ कोणता हि युक्तिवाद नाहीं. तियांना हि ग्रामदान मान्य आहे.

## विचारांचा पाऊस

मी विचार सांगण्याचा अधिकारी आहें. तो अमलांत आणणें तुमचा अधिकार आहे. मी आज येथें आलों आहें, उद्यां दुसऱ्या गांवीं चाललों. पाणी बरसणें पावसाचें काम आहे, त्याचा उपयोग करून शेती करणें तुमचें काम आहे. बाबा शेतकरी नाहीं. बाबा पाऊस आहे. तो विचार, प्रचार करीत फिरणार. म्हणून ' कुरळ 'मध्यें पहिलें स्थान परमेश्वराला दिलें आहे आणि दुसरें स्थान पावसाला. '**दानं, तपं, इरंडुम तंगा**' म्हणजे पाऊस पडणार नाहीं तर दान, तप हि राहणार नाहीं. कारण पीक येणार नाहीं; मग दान कसलें द्यायचें. परंतु पावसाशिवाय तप तर होऊं शकतें. तपस्व्यांना तप करण्याकरिता उपास च करावा लागतो. परंतु ' कुरळ ' विचाररूपी पावसाची गोष्ट सांगत आहे. ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. जगामध्यें विचाराचा पाऊस पडणार नाहीं तर दान, तप हि राहणार नाहीं. म्हणून बाबानें नंबर दोनचा अधिकार आपल्या हातीं घेतला आहे. अप्पास्वामी, त्यागराजन् वगैरेंचा अधिकार नंबर एकचा आहे. बाबाचा अधिकार पाऊस पाडणे हा आहे आणि तुमचा अधिकार शेती करणें हा आहे.

**तिरुचेट्यार** ( तंजावर )
२२–१–'५७

## ग्रामदान ईश्वराचा पहिला संकल्प 

आज मी एका वेदमंत्राचें स्मरण करीत होतों. त्यांत भक्त परमेश्वराला म्हणतो, ' देवा, तुझे अनेक संकल्प असतात; परंतु तुझा जो पहिला संकल्प झाला, त्यावर माझी श्रद्धा आहे. ' तो पहिला संकल्प कोणता ? सर्वांच्या-विषयीं करुणा. त्यानंतर दुसरे शेंकडों संकल्प झाले असतील. कोणाच्या मृत्यूचा संकल्प झाला असेल, कोणाच्या जन्माचा. त्या संकल्पांना महत्त्व नाहीं. मनु ऋषि म्हणतो, ' तुझ्या पहिल्या संकल्पाला च महत्त्व आहे. '

हीं जीं ग्रामदानें मिळत आहेत तो परमेश्वराचा पहिला संकल्प आहे असें मी समजतों. हें करणेचें काम आहे; म्हणून च महाराष्ट्रांत आणि तामिळनाडमध्यें ग्रामदानांची संख्या वाढत आहे. ठिकठिकाणीं वातावरण उत्तम होत आहे. सर्व लोक माझें म्हणणें ऐकून घेतात आणि मालकी सोडायला तयार होतात. कोणाला याची पूर्वी कल्पना तरी आली असती का ? पुष्कळ वेळां बाप-लेकांत हि तंटे असतात. गांवांत जातिभेद, पक्षभेद वगैरे असतात; पण या च लोकांना सत्यविचार नीट प्रकारें समजून दिला तर ते जमिनीची मालकी सोडायला तयार होऊन जातात.

पुंडी ( तंजावर )
२४-१-५७.

एका मित्रानें लिहिलें आहे कीं, 'बाबा तर चांगलें काम करीत आहे. तो पुन्हां पुन्हा ईश्वराचें नांव का घेतो? त्यानें अर्थशास्त्र समजावून दिलें म्हणजे पुरे आहे.' परंतु अर्थशास्त्राच्या प्रेरणेनें सहा वर्षे फिरायची बाबाला ताकद मिळाली नसती. देवाच्या स्मरणामुळें च त्याला शक्ति मिळते. बाबा अगदीं बेफिकीर राहून फिरत आहे. तो कोणाची पर्वा करीत नाहीं. ज्याला जें सांगायचें असेल तें तो खुशाल सांगतो. त्याची परमेश्वरावर भक्ति आहे म्हणून च हें होत आहे. कोणाला ही कल्पना तरी होती का? कीं, लोक कसल्या हि दबावाशिवाय आपली सर्वच्या सर्व जमीन देऊन ग्रामदान करतील अशी? हें एक असो; पण थोडीशीं ग्रामदानें झालीं तरी हजारों ग्रामदानें मिळतील असें कोणाला वाटलें होतें? ओरिसांतल्या जंगलांतल्या आदिवासींनीं हजारों ग्रामदानें दिलीं; पण मदुरा जिल्ह्यांतले सुधारलेले, जाणते, शिकले-सवरलेले, बुद्धिमान लोक हि ग्रामदान करतील असें कोण समजत होतें? आतां ईश्वराची करुणा पुराच्या वेगानें येत आहे. **"मारइल्लाद मांकरुणै वेळ्ळमे"** परमेश्वराची करुणा प्रकट होत आहे.

आज हें बोलतांना माझ्यासमोर गांधींची मूर्ति उभी राहिली. माझें सर्व जीवन त्यांच्या चरणीं अर्पण केलेलें आहे. मी एक लहान मुलगा होतो. तेव्हां च सर्व कांहीं सोडून त्यांच्यापाशीं गेलों. तेव्हांपासून अखेरपर्यंत त्यांच्या चरणांपाशीं राहून सेवा करण्याची बुद्धि देवानें मला दिली. ते गेल्यानंतर हि त्यांच्या सेवेशिवाय मला दुसरें कांहीं सुचत नाहीं. त्यांच्या आशीर्वादाचा वरदहस्त माझ्या मस्तकावर आहे. आंत बाहेर सगळीकडे त्याचा च आशीर्वाद आहे. व्यवहारांत मी असंख्य चुका करतों. चांगली भाषा मला साधत नाहीं आणि प्रयत्न केला तरी तिच्यावर नियंत्रण राहात नाहीं. मला माझ्या भाषेवर नियंत्रण ठेवतां येईल असा भरंवसा वाटत नाहीं. परमेश्वराचें स्मरण करीत करीत मोकळेपणानें काम करण्याची मला संवय होऊन गेली आहे. म्हणून अनेक चुका होऊन जातात. तरी हि मला त्यांच्याबद्दल पश्चात्ताप

होत नाहीं. कारण त्या चुका हि मीं परमेश्वराला च अर्पण करून टाकतों. केवळ त्याच्या कामांत च माझा देह खतम् होऊन जावा एवढी च वासना मीं ठेवली आहे. आजच्या या पवित्रस्थानीं माणिक्कवाचकर आणि दुसऱ्या अनेक सत्पुरुषांचें स्मरण करून गांधीजींच्या चरणीं दृढ प्रतिज्ञा करतों कीं, हा देह निरंतर धर्मकार्याला च लागो.

तिरुवारूर ( तंजावर )
३०-१-'५७

## सर्वोदयाचें अविरोधी दर्शन : ३६ :

मनुष्याच्या जीवनाचा कांहीं अंश व्यक्तिगत असतो. पण जास्त अंश सामाजिक असतो. व्यक्तिगत अंश आकारानें लहान असला तरी त्याची खोली जास्त असते. सामाजिक अंश आकारानें मोठा असला तरी त्याची खोली व्यक्तिगत जीवनाइतकी च असते. परंतु कांहीं व्यक्तींच्या जीवनाची खोली खूप जास्त असूं शकते. जगांत असे कांहीं महात्मे असतात. त्यांच्या जीवनाची खोली सर्व सामाजिक जीवनाच्या खोलीपेक्षां जास्त असते. अशा व्यक्ति सोडून दिल्या तर सामान्यतः असें म्हणतां येईल कीं, व्यक्तिगत जीवनाची जितकी खोली असते सामाजिक जीवनाचा आकार मोठा असला तरी तितकी च असते.

उदाहरण म्हणून आपला दिवसभराचा कार्यक्रम पहा. आपलें पुष्कळसें काम इतर लोकांबरोबर च चालतें. अगदीं थोडा वेळ स्वतःच्या खाजगी कामाला उरतो. व्यक्तीला आपल्या स्वतःकडे पहायला संधि आपण जेव्हां व्यक्तिगत काम करीत असतो तेव्हां च मिळते. ते आपल्या जीवनाचे फार खोल क्षण असतात. त्यातून च मनुष्याला शक्ति मिळत असते. त्या शक्तीनें च त्याला समाजाची सेवा करायची असते. प्राचीन काळापासून आजपर्यंत जे लोक समाजसेवेला लागले आहेत ते व्यक्तिगत जीवनाची खोली वाढविण्याच्या च कामाला लागले होते.

## चिंतनमय सेवा आणि सेवामय चिंतन

प्राचीन काळापासून आजपर्यंत सेवेच्या दोन शाखा चालत आलेल्या आहेत. आध्यात्मिक चिंतन करणारे लोक व्यक्तिगत खोली वाढविण्याकडे अधिक लक्ष देतात. ते म्हणतात, "या आमच्या जीवनाच्या खोलीचा समाजाला स्पर्श होईल तर समाजसेवेचें काम स्वाभाविक च होऊन जाईल." म्हणून ते सामाजिक जीवनात परिवर्तन करण्याचा प्रयत्न करीत नाहीत, आपल्या चिंतनाच्या च खोलीनें ते समाजसेवा करतात—चिंतनमय सेवा करतात. यांच्याहून दुसरा एक वेगळा वर्ग आहे. तो समाजसेवेमध्यें, समाजांत जीवनपरिवर्तन करण्याच्या कामात लागलेला आहे. त्याला हि खोल विचार करावा लागतो. परंतु त्याला वाटतें कीं, समाजसेवा करण्यानें च मनुष्याच्या विचाराची खोली वाढते. मी कांहीं लोकांच्याबरोबर श्रम करतों. त्या कामांत मला कांहींसें यश मिळतें, कांहीं मिळत नाहीं. यश मिळालें नाहीं म्हणजे विचार करावा च लागतो. तो चिंतनाला प्रेरित करतो. माझ्यांत काय उणीवा आहेत त्यांच्याकडे माझें लक्ष जातें. माझ्यांत क्रोध फार आहे त्यामुळें लोकांच्याबरोबर माझें पटत नाहीं. म्हणून काम होत नाहीं. तो दोष क्रोध असो, मोह असो, लोभ किंवा मत्सर असो, हे सर्व माझ्यासमोर येऊन उभे राहतात. ते दूर करण्याची मला प्रेरणा मिळते. अशा लोकांच्या जीवनाचा मुख्य आकार सेवामय असतो. ते चिंतन हि करतात पण ती सेवा हि होते. याप्रमाणें जगामध्यें सेवकांचे दोन वर्ग पडले आहेत.

जे नाममात्र सेवा करून व्यक्तिगत फायदा मिळवूं पाहातात अशा लोकांविषयीं मी बोलत नाहीं. खरोखर ते लोकसेवक च नव्हेत. अशा महत्त्वाकांक्षी लोकांना मी सेवक म्हणत नाहीं. परंतु जे खरेखुरे सेवक आहेत त्यांचे दोन वर्ग आहेत. पाश्चात्य लोकामध्यें एका तऱ्हेची प्रवृत्ति आहे आणि पौर्वात्य लोकात दुसरी असें म्हणणें चुकीचें होईल. दोन्ही ठिकाणीं दोन्ही तऱ्हेचे लोक होऊन गेले आहेत आणि आज हि आहेत. परंतु असें दिसून येतें कीं, हिंदुस्थानात चिंतनमय सेवेचा विचार अधिक दृढ आहे आणि युरोपमध्यें कदाचित् सेवामय चिंतनाचा. हें मी स्थूल दृष्टीनें सांगत आहें.

## भूदानांत व्यक्तिगत आणि सामाजिक हा भेद नाहीं

भूदान आणि ग्रामदान यामध्ये या दोन्ही विचारांना मी अगदीं एका भूमिकेवर आणूं इच्छितों. दोन्हींमधला भेद च मला नाहींसा करावयाचा आहे. मी माझें सर्वच्या सर्व शरीर, मन, इंद्रियें व शक्ति सर्व कांहीं समाजाला अर्पण करून टाकतों. समाजात सृष्टि हि आली च; म्हणून आपली स्वतःची वेगळी शक्ति स्वतःकरितां राखून ठेवीत नाहीं. सारी समाजाला अर्पण करून टाकतो. तेव्हां माझी व्यक्तिगत खोली एकदम वाढून जाते. आंत अहंकार राहात नाहीं. समाजकार्यांकरिता च मी, माझें शरीर, मन आहे असे मानतों; म्हणून माझी व्यक्तिगत चिंता नाहींशी होते. त्याचा परिणाम असा होतो कीं, माझी व्यक्तिगत खोली एकदम वाढून जाते. म्हणजे माझी व्यक्तिगत खोली साधण्याकरिता समाजाची सेवा मला कमी करावी लागत नाही.

जेव्हां मी माझ्या स्वतःविषयीं विचार करूं लागतो तेव्हा माझें व्यक्तिगत खाणें-पिणें, झोपणें ही सामाजिक जबाबदारी च आहे असें मी मानतों. हें माझें व्यक्तिगत काम आहे असा भेद करीत नाहीं. म्हणजे तें हि एक समाजसेवेचें अंग आहे असें मानतो. रात्रीं योग्य वेळीं झोपणें, निःस्वप्न झोंप येणें, ठरलेल्या वेळीं उठणें हें सर्व सामाजिक सेवेच्या कार्यक्रमाचें एक अंग आहे असें मी समजतों. मी इतका वेळ सामाजिक सेवा करतों आणि इतके तास माझ्या व्यक्तिगत कामात जातात असा मला भास हि होत नाहीं. चोवीस तास माझ्या ज्या कांहीं क्रिया होतात त्या सर्वच्या सर्व सामाजिक सेवेच्या होतात असा मला अनुभव येतो.

सारांश, जोंपर्यंत जीवनाचे हे दोन तुकडे एक होत नाहींत तोंपर्यंत जीवनांत ओढाताण असते. आमचें प्रत्येक व्यक्तिगत काम सामाजिक आणि प्रत्येक सामाजिक काम व्यक्तिगत झाले पाहिजे. पुष्कळ वेळां मी एक उपमा देत असतों. पांच बोटांनीं जें काम केलें तें बोटांनीं केलें कीं हातानें? दोन्ही एक च आहेत. जितकें काम बोटांकडून होतें तें सर्व हाताचें च असतें आणि जितकें हात करतो तें सर्व बोटांचें असतें. म्हणून व्यक्ति

आणि समाज यांचा वेगळा असा विकास असत नाहीं. हल्लीं लोक हे दोन्ही वेगवेगळे मानतात. दोन्हींमध्यें विरोध आहे असें समजतात आणि त्यांच्यांत समतोल राखण्याचा प्रयत्न करतात. माझें म्हणणें आहे कीं, हा विरोध च चुकीचा आहे. म्हणून समतोल हि चुकीचा आहे.

## ग्रामदानांत व्यक्तीचें कांहीं च नाहीं आणि सर्व च आहे

ग्रामदानात व्यक्तिगत मालकी नाहींशी होते आणि वाढते हि. ग्रामदानामध्यें माझी मुळीं च जमीन नाहीं आणि सर्व च जमीन माझी आहे. आज माझी पाच एकर जमीन आहे. गांवाची एकंदर जमीन आहे पांचशें एकर. त्यात माझी पाच आणि इतर ४९५. पण ग्रामदानानंतर माझी जमीन जशी शून्य आहे तशी ५०० हि आहे. घरामध्यें आईची काय सत्ता आहे? म्हटली तर कांहीं नाहीं, म्हटली तर सर्व आहे. ती च लहान मुलांची. सहा महिन्याचा छोटा बालक आहे. त्याचा घरावर कांहीं हक्क नाहीं. असला तर सर्व घरावर आहे. एका लहान घरांतलें मूल घरांतल्या सान्या माणसाचें लक्ष आपल्याकडे ओढून घेत असतें. त्याला कांहीं दुःख झालें तर घरातील सर्व माणसें दुःखी होतात. तो आनंदांत असला तर सर्व माणसें खूप असतात. घरातल्या सर्व माणसांवर त्याची इतकी सत्ता चालते. बालक म्हणजे घराचा बादशहा आहे. दुसऱ्या दृष्टीनें विचार केला तर त्याची काय स्थिति आहे? त्याला कोणी खायला दिलें तर तो खाणार नाहीं तर तो काय खाईल? एका दृष्टीनें त्याची कांहीं च सत्ता नाहीं; दुसऱ्या दृष्टीनें त्याची सर्व सत्ता आहे. त्या दोन्ही गोष्टी घरीं साधूं शकतात. आदर्श ग्रामदानी गांवांत असें च झालें पाहिजे. व्यक्ति आणि समाज हे भेद च मिटून गेले पाहिजेत. व्यक्तीच्या विकासाकरितां जें केलें जाईल त्यानें समाजाचा विकास होईल आणि समाजाच्या विकासाकरिता जें केलें जाईल त्यानें व्यक्तीचा विकास होईल. मीं सर्वांना विद्यादान केलें त्यानें माझी विद्या कमी होत नाहीं तर अधिक पक्की होते. विद्येसंबंधीं ही गोष्ट सर्वांना कबूल आहे; पण लक्ष्मीविषयीं ते असें मानीत नाहींत. मीं माझी लक्ष्मी कोणाला दिली तर ती कमी होते पण विद्या दिली तर ती कमी होत नाहीं. त्या ठिकाणीं कांहीं विरोध आहे असा अनुभव आहे. परंतु

लक्ष्मीच्या बाबतीत तसा विरोध जाणवतो. तुम्हांला मी लक्ष्मी दिली तर माझी कमी झाली असें मला वाटतें. परंतु गांवाच्या सेवेकरितां जर मी पैसा तुम्हाला दिला तर असा देण्यानें तो माझा हि वाढतो ही गोष्ट लक्षांत आली पाहिजे.

ग्रामदानामध्ये भिण्यासारखें कांहीं नाहीं. सर्वोदयांत जीवनाचे दोन तुकडे होत नाहींत. व्यक्तीच्या विरुद्ध समाज खडा होत नाही आणि समाजाच्या विरुद्ध व्यक्ति उभी रहात नाहीं. व्यक्तिगत जीवनाच्या विरुद्ध सामाजिक जीवन आणि सामाजिक जीवनाच्या विरुद्ध व्यक्तिगत जीवन उभें रहात नाहीं. सेवा आणि चिंतनाचे वेगळे वेगळे तुकडे होत नाहींत. सेवा च चिंतन आणि चिंतन च सेवा होते.

## एकांत आणि लोकांत यांमध्यें विरोध नाहीं

मी स्नानगृहांत स्नान करण्याकरिता गेलों तर लोक समजतात मला तेथें एकांत मिळाला, आणि मी तुमच्यापुढें बोलत आहे तेव्हां समजतात माझा एकांत मोडला; परंतु आतां हि माझा एकांत च चालू आहे. या वेळीं जर मला एकांताचा अनुभव येत नसेल तर मी एकांत समजूं शकलों च नाहीं असें म्हणावें लागेल. या ठिकाणीं माझा एकांत बिघडण्यासारखें काय आहे ? स्नानाला गेलों, तेथें बादली होती, पाणी होतें, धोतर ठेवलें होतें. इतक्या सगळ्या वस्तु समोर असून हि जर मी तेथें एकांतांत होतों, तर इतके लोक माझ्यापुढें बसले आहेत म्हणून माझा एकांत कसा बिघडेल ? तुम्ही येथें नसता तर आतां जें मी बोलत आहे त्याचें च मनांत चिंतन चाललें असतें. तुमच्या उपस्थितीमुळें माझें चिंतन कुठें थांबतें ? उलट नीट प्रकारें चिंतन करून तें तुमच्यापुढें मांडावें अशी मला प्रेरणा होत आहे; म्हणून माझा एकांत बिघडत नाहीं. त्यामुळें माझें चिंतन सहज आणि सुलभ होत आहे. चरख्यावर सूत कातत आहे, उत्तम चिंतन चाललें आहे आणि सामाजिक सेवा हि होत आहे. सामाजिक सेवा आणि चिंतन एकत्र चाललें तर काय बिघडेल ?

मी जर एखाद्या फॅक्टरीमध्यें काम करीत असेन, मोठमोठीं यंत्रें चाललेलीं

असतील, कानांमध्यें धों धों असा जोराचा आवाज चालला आहे, आणि लोकांचे शोषण चाललेलें दिसत आहे, तेथें काय चिंतन होईल? तेथल्या कर्माच्या स्वरूपामुळे च चिंतन होऊं शकत नाहीं. कर्माचे स्वरूप आणि परिणाम दोन्ही सौम्य पाहिजेत, म्हणजे ते चिंतनाला अनुकूल असतें.

उत्तम शेतीचें काम चालू आहे. सर्व जगाला त्यापासून पोषण मिळत आहे, कोणाचा विरोध नाहीं, स्वच्छ खुली हवा आहे, शांति आहे, सौंदर्य आहे, कोठला जोरदार आवाज नाहीं. असल्या कर्माचे स्वरूप आणि परिणाम दोन्ही कल्याणकारक असतील तर अशा कामांत मग्न असलेल्या माणसाला चिंतनाकरिता वेगळा वेळ काढण्याची जरुरी नाहीं. शेतीमध्ये सेवा आणि चिंतन यामध्यें विरोध राहात नाहीं. उलट सेवा आणि चिंतन असा.भेद च राहात नाहीं. सेवेमध्ये पूर्ण चिंतन चाललें पाहिजे आणि चिंतनांत सेवा चालली पाहिजे. व्यक्तिगत कामांत सामाजिक काम होत आहे आणि सामाजिक कामात व्यक्तिगत काम होतें. घडा जर गंगेमध्ये बुडविला तर गंगेमध्यें घडा आहे आणि घड्यामध्यें गंगा आहे. दोन्ही गोष्टी खऱ्या च आहेत. त्याप्रमाणे च सामाजिक कामात व्यक्तिगत कार्य होत आहे म्हणणें हे हि खरें आहे आणि व्यक्तिगत कामात सामाजिक कार्य हें हि खरें आहे. 'सर्वोदया'च्या कामात ही खुबी आहे तशी दुसऱ्या कोणत्या हि कामांत नाहीं.

पट्टुकोट्टै (तंजावर)
७–२–'५७.

मी पुष्कळ वेळा म्हटलें आहे कीं, ' हें काम धार्मिक लोकांनीं हातीं घेतलें पाहिजे. ' तशी ' धार्मिक ' म्हणून कांहीं वेगळी जात नाहीं. ज्याच्या मनात धर्म आहे अशी प्रत्येक व्यक्ति धार्मिक आहे; परंतु कांहीं लोक सर्व कांहीं सोडून धर्माच्या सेवेला आपलें जीवन अर्पण करतात. मी माझी गणना अशा लोकांमध्ये करतों. लहानपणापासून च माझें प्रेम व आसक्ति केवळ धर्मविचारावर च होती, आणि अजूनपर्यंत मीं माझें सर्व जीवन त्या च कामाला लावलें आहे. समाजधारणा कशी असावी त्याची वाट दाखविण्याची जबाबदारी अशा माणसावर पडते.

## धार्मिकांची जबाबदारी

ज्यांच्या अंतःकरणात धर्म-भावना आहे अशा सर्व माणसावर धर्मकार्य करण्याची जबाबदारी आहे. साधारणतः सर्व गृहस्थावर ही जबाबदारी आहे; परंतु परमेश्वरानें ज्यांना धर्माकरितां जीवन समर्पण करण्याची प्रेरणा दिलेली असते त्यांच्यावर लोकांना धर्ममार्गावर घेऊन जाण्याची जबाबदारी आहे असें मानलें जातें. मीं म्हटलें च आहे कीं, भू-दान-ग्रामदान-आंदोलन हें ' धर्मचक्र-प्रवर्तना 'चें आंदोलन आहे. हा भगवान् गौतमबुद्धांचा शब्द आहे. परंतु भगवद्गीतेमध्यें हि त्याविषयीं चर्चा आहे. गीतेनें त्याला ' यज्ञ-चक्र ' हें नाव दिलेलें आहे. जो हें ' यज्ञ-चक्र ' चालविणार नाहीं त्याचें जीवन पापमय होईल. म्हणून हें ' धर्म-चक्र ', ' यज्ञ-चक्र ' चालविण्यांत आपला भाग घेणें हें प्रत्येक व्यक्तीचें कर्तव्य आहे. हा धर्म-विचार ओळखणारे कित्येक सज्जन या कामांत लागले आहेत हें पाहून मला आनंद वाटतो. या आंदोलनांत जितके लोक भाग घेत आहेत तितके क्वचित्‌च दुसऱ्या आंदोलनांत पडले असतील असें मला वाटतें.

## एक व्यक्ति हि धर्मकार्य करूं शकते

असलें कार्य एक च माणूस कसें करू शकेल? असें पुष्कळ लोक मला

विचारतात. माझा विश्वास उलटा आहे. धर्मकार्य एक माणूस हि करूं शकतो असें मला वाटतें. खिस्ती-धर्माची प्रेरणा एकट्या येशू-ख्रिस्ताच्या अंतःकरणांत उत्पन्न झाली आणि त्याच्या शिष्यांकडून युरोपमध्ये पसरली. त्याला फक्त बारा शिष्य होते. त्यातला एक शिष्य कांहीं काम करूं शकला नाहीं. बाकीच्या शिष्यांनीं हि त्याच्या मृत्यूनंतर च काम केलें. येशू जिवंत होता तोंपर्यंत तो एकटा च काम करीत होता. एकट्या महंमद पैगंबराच्या हृदयांत इस्लामची ज्योति प्रकट झाली. एकएका व्यक्तीनें देशाचा रंग च पालटून टाकला अशीं अनेक उदाहरणें तुम्हाला वरचेवर दिसतील. प्रकाश लहान असो किंवा मोठा, त्याच्यापुढें अंधःकार टिकूं शकत नाहीं. एकटा सूर्य आणि एकटा दिवा अंधःकार दूर करतो. या च प्रकारें धर्मकार्य व्यक्ति करते आणि ती एकटी च करते. मग त्याच्या आजूबाजूला आणखी पांच-पन्नास उभे राहिले तर ती वेगळी गोष्ट आहे; परंतु दहा माणसें एकत्र जमलीं म्हणून काहीं चेतना मिळत नाहीं. एक माणूस उभा राहिला कीं पुरे. तो चेतना देऊं शकतो.

## गुणविकासाकरितां वर्णाश्रम पाहिजे

या वेळीं हिंदुस्थानाकरिता याहून दुसरा चागला धर्म-मार्ग नाहीं ही गोष्ट समजण्याची जरूरी आहे. कोणी लोक मला विचारतात, 'तुम्ही तर सर्व गांवें ग्रामदानी करायला निघाला आहां. मग काय वर्णाश्रम-भेद हि काढून टाकणार काय?' मी त्यांना सांगतो, 'धर्म सूक्ष्म असतो. अगदीं वरवर पाहून समजणार नाहीं. आतून पाहावा लागतो. चातुर्वर्ण्य काय आहे? चार आश्रम काय आहेत? हे काय बाह्य वेष आहेत? ती विचाराची आणि अनुभवाची गोष्ट आहे. आपण आपल्याला उच्च समजलों तर काय उच्च वर्णाचे होऊं? जो आपल्याला उच्च समजेल तो ईश्वराच्या दृष्टीने सर्वांत नीच ठरेल; म्हणून जो माणूस 'मी उच्च आहे' असा दावा करील तो दावा च त्याला खतम करून टाकील. चार वर्णांची कल्पना लोकांमध्यें भेद पाडण्याकरितां नाहीं; समाजाच्या गुणविकासाकरितां आहेत. चार आश्रम हि गुणविकासाकरितां च आहेत. मी तर पुन्हा नवीन पद्धतीनें चार वर्ण आणि

चार आश्रम उभे करूं इच्छितों. प्रत्येक व्यक्तीमध्यें चार वर्ण आणि चार आश्रम असावेत अशी माझी इच्छा आहे.

ग्रामदानी गावांत यता प्रकारें चार वर्ण आणि चार आश्रम यांची स्थापना होईल यानें मी एक लहानसें सूत्र च बनविलें आहे. ज्याप्रमाणें 'मेघदूतसार 'च सूत्र आहे किंवा ' ब्रह्मसूत्र ' आहे, तसे च चार शब्दांत मी चार वर्ण आणि चार आश्रम घातले आहेत. हे चार गुण ज्याच्यामध्यें आहेत, त्याच्यामध्यें चार वर्ण आणि चार आश्रम आहेत.

## ब्राह्मण वर्णाची स्थापना—शांति

चारी वर्ण अत्यंत पवित्र आहेत. लोकांची समजूत आहे कीं, कांहीं वर्ण उच्च आणि कांहीं नीच; पण तें खरें नाहीं. गीतेमध्यें सांगितलें आहे, ' स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः । '— जो माणूस आपआपलें कर्तव्य नीटपणें करील व तें निष्कामबुद्धीनें ईश्वराला अर्पण करील ,तो सारख्या च मोक्षाचा अधिकारी आहे. मी सांगूं इच्छितों, चित्तांत शांति असणें हें ब्राह्मणाचें लक्षण आहे. ग्रामदानी गांवात शांति असावी, सर्वांच्या हृदयात राम असावा अशी माझी इच्छा आहे. आजच्या गावात शांति असत नाहीं देशाला शांतीची इच्छा आहे; पण त्यानें वाट धरली आहे अशांतीची. सर्व लोकांच्या हृदयातलें दुःख दूर होईल तेव्हा शांति स्थापन होईल. लोकांना सर्वसाधारण वस्तु उपलब्ध होत नाहींत हें अशांतीच्या अनेक कारणांपैकी एक कारण आहे. कांहीं लोकांच्याजवळ जरूरीपेक्षा जास्त वस्तु आहेत त्यामुळें त्यांच्या चित्ताला समाधान नाहीं. तें अशांतीचें दुसरें कारण आहे.

अमेरिकेमध्यें संपत्ति आणि उत्पादन खूप आहे. आम्ही हि उत्पादन वाढविण्याच्या गोष्टी बोलत आहों. आपल्या देशात आपल्याला उत्पादन वाढविण्याची जरूरी आहे यात मुळीं च संशय नाहीं; परंतु काय आम्हीं अमेरिकेसारखे झालो तर सुखी होऊं? अमेरिकेत जास्तींत जास्ती आत्महत्या होतात आणि जास्तींत जास्त वेडे लोक आहेत. तेथें वेडेपणाचे अनेक प्रकार आहेत. त्याला ' मेनिया ' म्हणतात. तेथें उत्पादनाला व भोगाला कमतरता

नाहीं; पण शांति नाहीं. शरीराला कमीत कमी जितकें लागतें तितकें मिळालें नाहीं तर शांति राहात नाहीं; म्हणून जेथें जेथें रामाची स्थापना होईल तेथे तेथें ब्राह्मणाची प्रतिष्ठा राहील. म्हणून ग्रामदानी गांवांत दुसऱ्या कोणत्या हि गांवांपेक्षां जास्त शांति राहील यांत कसली हि शंका नाहीं.

## क्षत्रिय वर्णाची स्थापना—दम

चार वर्णांतला दुसरा वर्ण आहे क्षत्रिय. क्षत्रिय म्हणजे हातांत तलवार घेणारा. अलिकडे असले लोक पुष्कळ वाढले आहेत आणि शस्त्रास्त्रें हि वाढलीं आहेत. प्रत्येक सरकारच्या मागें शस्त्रास्त्रांचें च बळ असतें. त्यामुळें सर्व जग निर्वीर्य आणि भयभीत झालेलें आहे. क्षत्रियांचें खरें लक्षण आहे निर्भयता. कसल्या हि शस्त्रास्त्रांनीं निर्भयता येत नाहीं. तिची स्थापना करण्याकरिता दमरूप क्षत्रियाची स्थापना केली पाहिजे. दम म्हणजे स्वतः-वर ताबा ठेवतां येणें. जेव्हां सर्व लोक स्वतःवर ताबा ठेवूं शकत नाहींत, तेव्हां त्यांच्यावर बाहेरून ताबा ठेवण्याची जरूर पडते. ग्रामदानी गांवांत इतर गावांपेक्षां दमाची प्रतिष्ठा अधिक राहील असें वाटतें. दुसऱ्याकडून वस्तु काढून घेण्याची इच्छा च राहाणार नाहीं; कारण दुसरा कोणी च नाहीं. सगळे आपले आहेत. सर्व गावाची जमीन एक होऊन मालकी नाहींशी झाल्यावर प्रत्येक मनुष्याला आपल्यावर ताबा ठेवणें सुलभ आहे. ह्या 'दमा'लाच मी क्षत्रिय धर्माची स्थापना म्हणतों.

## वैश्य वर्णाची स्थापना — दया

तिसरा आहे वैश्य वर्ण. वैश्याच्या लक्षणाचें वर्णन एका शब्दात करायचें तर तो शब्द आहे 'दया.' हिंदुस्थानात मांसाहार सोडलेल्या लोकांची गणना केली तर वैश्यांची संख्या ब्राह्मणांच्यापेक्षा जास्त निघेल. वैश्याचें लक्षण च दीनांचा सांभाळ करणें हें आहे. दीनाच्याकरितां संग्रह करणे आणि त्यांतून त्यांचा सांभाळ करणे. वैश्याला दयेपेक्षां दुसरा कुठला हि चांगला गुण होऊं शकत नाहीं. वैश्याची स्थापना ग्रामदानी गांवात जरूर होईल. दया आणि करुणा यांच्याशिवाय ग्रामदानाचा आरंभ च होत नाहीं. आज दया आहे कुठें ? अंतःकरणें अगदीं निठुर झाली आहेत. आपण दुसऱ्यांच्या

आवरि पदात रहातों. पण त्याकरिता कांहीं खटपट करण्याची इच्छा होत नाहीं.

## शूद्र वर्णाची स्थापना— श्रद्धा

चौथा वर्ण आहे शूद्र. शूद्राशिवाय जग चालूं च शकत नाहीं. शूद्राचें वर्णन एका शब्दात करायचें तर तो शब्द आहे श्रद्धा. शूद्र सेवाप्रधान असतो. श्रद्धा आणि भक्तीशिवाय सेवा होऊं च शकत नाहीं. म्हणून शूद्राचा मुख्य बाह्यगुण आहे सेवा आणि आंतरगुण आहे 'श्रद्धा'. ग्रामदानांतील मुलांच्या अंतःकरणांत 'श्रद्धा' उत्पन्न होईल कीं नाहीं हें तुम्हीं च सांगा. आज भूमिहीन गरिबांच्या मुलांना अनाथ समजून कांहीं सज्जनांना त्यांचें पालन करावें लागतें. ही जबाबदारी गांवाची झाली पाहिजे. ग्रामदान झालें कीं अनाथांचा सांभाळ झाला च. जगांतल्या अनाथांना एकत्र करण्याची जरूरी नाहीं. ग्रामदानी गांवांतल्या मुलाचा बाप मेला तर तो एक पिता मेला पण त्याचा सांभाळ करायला दुसरे शंभर बाप आहेत. ग्रामदानी गांवाच्या एकेक मुलाला सांभाळणारे शंभर दोनशें बाप असतील. ग्रामदानी गावांतल्या एका मातेला तीनशें-चारशें मुलगे असतील. म्हणून तेथें वेगळा अनाथाश्रम उघडण्याची जरूर च राहणार नाहीं. अशा मुलांच्या मनात समाजाविषयीं किती श्रद्धा वाढेल ! त्यांना लहानपणापासून शिक्षण मिळेल. ज्या समाजांत मी उत्पन्न झालों तो किती दयाळू आणि प्रेमी आहे आणि सर्व मुलांचें सारखें रक्षण करीत आहे.

## श्रमरूप संन्यासाश्रमाची स्थापना

याप्रमाणे शम-दम-दया आणि श्रद्धा या चार गुणांची समाजांत प्रतिष्ठा वाढणे म्हणजे च चार वर्णांची स्थापना होते. आतां ग्रामदानांत चार आश्रमांची स्थापना कशी होईल तें पहा. पहिला आहे संन्यासाश्रम. समाजाला संन्यासी माणसाची अत्यंत आवश्यकता आहे हे सर्वांना माहीत आहे. कारण संन्यासी असेल तर सर्वांची सेवा करायला एक मोफत सेवक मिळून जाईल. तो सर्वत्र ज्ञानप्रचार करीत जाईल. सन्यासाचें लक्षण आहे—शम. जेथें चित्तांत शांति नाहीं तेथें संन्यास हि नाहीं. डोकें मुंडून-

किंवा जटा-दाढी वाढवून कोणी संन्यासी होत नाहीं. संन्यासाची परीक्षा त्याच्यांत शम आणि शांति किती आहे यावरून होते. ग्रामदानानें शमरूप संन्यासाश्रमाची मी स्थापना करूं इच्छीत आहें.

**दमरूप वानप्रस्थाश्रमाची स्थापना**

दुसरा आश्रम आहे वानप्रस्थाश्रम. याचें लक्षण आहे दम. तप करून आपल्याला इंद्रियांचें दमन करायचें आहे, त्याना संपूर्णपणें जिंकायचें आहे. याप्रमाणें 'दम' गुण आला कीं तेथें वानप्रस्थाश्रमाची स्थापना होऊन जाते. ग्रामदानानें या 'दम'रूप वानप्रस्थाश्रमाची स्थापना मला करावयाची आहे.

**दयारूप गृहस्थाश्रमाची स्थापना**

तिसरा आश्रम आहे गृहस्थाश्रम. त्याचें लक्षण आहे 'दया'. 'तिरुकुरल'-मध्यें लिहिलें आहे कीं, गृहस्थाश्रमाचा सर्वांत श्रेष्ठ गुण आहे दया, करुणा, प्रेम. म्हणून जेथें दयेची प्रतिष्ठा असते तेथें गृहस्थाश्रमाची स्थापना होते. ग्रामदानी गांवांत आम्हांला दयारूप गृहस्थाश्रम स्थापावयाचा आहे.

**श्रद्धारूप ब्रह्मचर्याश्रमाची स्थापना**

चौथा आश्रम आहे ब्रह्मचर्याश्रम. त्याचें लक्षण 'श्रद्धा'. श्रद्धेची प्रतिष्ठा असली कीं ब्रह्मचर्याश्रमाची स्थापना होते. ग्रामदानी गांवांत श्रद्धारूप ब्रह्मचर्याची आम्हांला स्थापना करायची आहे.

**ग्रामदानाचीं चतुःसूत्रें**

शम, दम, दया आणि श्रद्धा या चार शब्दांत चार वर्ण आणि चार आश्रम येऊन जातात. 'शम', 'दम', 'दया', 'श्रद्धा' हीं ग्रामदानाचीं चार सूत्रें आहेत. या प्रकारचीं ग्रामदानें गांवें बनतील तर धर्मस्थापना किंवा धर्मचक्रप्रवर्तन होईल. म्हणून माझी मागणी आहे कीं ज्यांच्या अंतःकरणांत परमेश्वरानें धर्मभावना ठेवली आहे त्या सर्वांनीं हें काम हातीं घेऊन पुरें करावें.

**शाकोटै** ( रामनाड )
१४-२-'५७
९-१२

आमचे स्वामीजी ( उण्ड्कुंडीजी ) भूदान आणि ग्रामदानाच्या कामाला आपला वेळ देत आहेत हे तुम्ही पहात आहांत च. मठाधीश वगैरे लोकांना असल्या कामांत आजपर्यंत बहुधा आवड दिसत नव्हती. त्याला अनेक कारणें आहेत. हे मठ पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें च चालले आहेत हें एक त्याचें कारण आहे. त्यांच्याजवळ जमीन जुमला असतो. तरी हि लोक-सेवेकडे त्यांचें लक्ष असत नाहीं. पूजाअर्चा करणें, कांहीं पाठ पढणें, धार्मिक व्याख्यानें देणें, ग्रंथांचें पठन-अध्यापन असलीं कांहीं थोडीं कामें केलीं म्हणजे आपलें कर्तव्य संपलें असें ते समजतात. हा अगदीं अर्धवट विचार आहे असें माझें नम्र मत आहे. या युगाची काय मागणी आहे इकडे त्यांचें लक्ष नाहीं.

## विचार-शोधन हें पहिलें काम

ज्यांना धार्मिक जीवन घालवायचें आहे त्यांनीं कमींत कमी तीन कामें अवश्य केलीं पाहिजेत. पहिले आहे विचार-शोधन. लोकांना जुने ग्रंथ शिकवीत बसण्यानें काम संपत नाहीं; त्यांतले विचार पडताळून हि पाहिले पाहिजेत. जुन्या विचारांत कांहीं अंश चांगला असतो कांहीं चुकीचा हि असतो. म्हणून चांगले विचार आणि वाईट विचार दोन्ही एकत्र करून लोकांच्या पुढें ठेवणें याला धर्म-कार्य म्हणता येणार नाहीं. सार कोणतें आणि असार कोणतें याची ओळख झाली पाहिजे.

सध्याचें फळ आपण तसेंच्या तसें च खात नाहीं. सालें काढून टाकतों, चोडी चावून चावून रस तेवढा घेतों आणि चोथा थुंकून टाकतों. उत्तमातल्या उत्तम वस्तूचें हि आपण असें च सेवन करतों. केळ्याची देखील साल टाकून च खावी लागते. नारळाचा हि वरचा भाग फेंकून खावा लागतो. प्रत्येक वस्तूमध्यें कांहीं टाकायचा भाग असतो च. तो सोडून उरलेला भाग आपण घेतों. याला 'सारासार-विवेक' म्हणतात. वेदांत हि म्हटलें आहे "सक्तु-

मिव तितउना पुनन्तो यत्र धीरा मनसा वाचमक्रत। ” हातांत चाळण घेऊन तींतून धान्य जसें चाळून घेतलें जातें, त्याप्रमाणें च ज्ञानी पुरुष वाणीचें शोधन करतात. तेथें च लक्ष्मी राहते. वेद हा अत्यंत श्रेष्ठ ग्रंथ आहे. तो हि आहे तसा च घेऊन चालणार नाहीं. त्याचा हि सारासार-विचार करून, असार भाग सोडून, सार तेवढें घेतलें पाहिजे. तर च तो आपल्या कामाला येईल म्हणून पुराणें ग्रंथांचे पाठ देत राहिलें, व्याख्यानें दिलीं तर एवढ्यानें धर्म-कार्य होणार नाहीं. त्या ग्रंथातले उत्तम विचार घेऊन चुकीचे विचार सोडून दिले पाहिजेत. कोणता विचार बरोबर-कोणता चूक हें ओळखायला आलें पाहिजे. मग जे चागले विचार आहेत त्यांत नवीन चांगले विचार घातले पाहिजेत. जेवणात हि आपण असें करतों. धान्य घेऊन दळतों, तें चाळून घेतों आणि कोंडा टाकून पीठ घेतों. त्या कणकेंत तूपसाखर घालतों तेव्हा पक्वान्न बनतें.

## धार्मिक लोकांनीं पोस्टमन बनूं नये

या मठांच्याकडून विचार-संशोधनाचें काम बहुधा होत नाहीं. ते या जुन्या ग्रंथांचा भार अक्षरशः डोक्यावर घेतात आणि ज्याप्रमाणें पोस्टमन डाकेचा सर्व बोजा डोक्यावर घेऊन घरोघर वांटत जातात, कोणत्या पत्रांत काय सार आहे काय असार आहे हें पाहणें त्याचें काम नाहीं– त्याचें काम फक्त पत्रें पोचविणें. सार, असार वाचणाऱ्यांनीं पहावें. जुनें काय आहे हें सांगणें आमचें काम असें ते म्हणतील. पण वाचणारे जर इतक्या योग्यतेचे असतील तर या लोकांचें काम च काय? परंतु अशी योग्यता सर्व लोकांना असत नाहीं. म्हणून तर अशा धार्मिक लोकांची जरूरी असते. या ग्रंथांत अमुक भाग असार आहे तो काढला पाहिजे अशी ज्यांना हिंमत होणार नाहीं तर त्यांचें काम अपूर्ण च राहील. ते धर्माची उन्नति करूं शकणार नाहींत. युग-धर्माला अनुकूल धर्म बनूं शकणार नाहीं. तो अग्नीमध्यें तूप जाळून यज्ञ होत आहे, देव संतुष्ट होत आहे, असें समजेल. पण यानें भगवान् संतुष्ट होत आहे कीं नाराज हें एक भगवान् च जाणे. त्या काळीं जंगल न् जंगल च होतें, गाई पुष्कळ होत्या, त्या काळीं विस्तव पेटवण्याकरितां

तुपाचा उपयोग केला असेल. पण आज जर आम्ही असला यज्ञ करूं लागूं, तर चालेल का?

## मूढ आस्तिकता ठेवूं नये

सकाळची वेळ होती. पिता-पुत्र पूर्वेकडे जात होते. बाप मुलाला म्हणाला, 'छत्री पूर्वेकडे धर'. मुलानें ऐकून घेतलें. तो मुलगा संध्याकाळीं एकटा च फिरायला निघाला. सूर्य पश्चिमेला होता पण बापाची आज्ञा होती छत्री पूर्वेला धरण्याची. म्हणून त्याप्रमाणें धरून तो चालूं लागला. हें कोणीं तरी पाहिलें. तो म्हणाला, 'अरे, आता संध्याकाळ आहे. सूर्य पश्चिमेच्या बाजूला आहे तेव्हां छत्री पश्चिमेकडे धरली पाहिजे. पण मुलानें उत्तर दिलें, 'पण वडिलांनीं मला पूर्वेकडे धरायला सांगितलें आहे.' तो बापाच्या शब्दा-प्रमाणें वागणारा मुलगा होता. जुन्या काळीं अमुक गोष्ट धर्म-कार्य मानली जात होती, म्हणून तीं धर्मकृत्यें आम्ही आज हि करूं लागलों तर तो अधर्म होईल, धर्मावर श्रद्धा उरणार नाहीं, लोक नास्तिक बनतील. लोक नास्तिक बनतात त्याची जबाबदारी असल्या आस्तिकांवर आहे. ही मूढ आस्तिकता आहे. म्हणून धर्मविचारांचें हि संशोधन झालें पाहिजे.

## मठाधीशांकडून धर्माची प्रगति झाली नाहीं

कोणी लोक संशोधन करूं लागले कीं, हे पुराणमतवादी लोक ओरडूं लागतात. त्यांच्या ओरडण्याच्या भीतीनें आपण सत्य गोष्ट लोकांपुढें ठेवणार नाहीं तर धर्माला विसरलों असें म्हणावें लागेल. मठाधीश बहुधा संभाळून असतात. कांहीं गोष्टी ते सोडतात पण एक त्याग ते करूं शकत नाहींत. ते लोक-निंदा सहन करू शकत नाहींत. त्यामुळें सत्यनिष्ठेत हि उणीव येते. जेथें सत्यनिष्ठा नाहीं, तेथें धर्म कसा टिकेल? म्हणून ज्याना धार्मिक जीवन जगायचें असेल त्यांनीं सर्वांत आधीं विचार-संशोधन केलें पाहिजे, नवनवीन विचार ग्रहण करून धर्म वाढवीत गेले पाहिजे, धर्म प्रतिदिन वर्धमान असला पाहिजे.

जे 'नालवर' (चार श्रेष्ठ, तामिलनाडचे चार श्रेष्ठ संत पुरुष) होऊन गेले ते 'नालवर' च म्हणजे चार च राहिले, 'अलवर' (पांच श्रेष्ठ) झाले

नाहींत. शिखांनीं म्हटलें कीं, 'दहा गुरु होऊन गेले, अकरावा झाला च नाहीं.' 'आलवार' बारा च झाले. एका वर्षांत बारा महिने येतात, तेरावा नाहीं. त्याप्रमाणें 'आलवार' हि तेरावा होऊ शकत नाहीं. 'नायनमाल' हे ६३ झाले म्हणजे रुपयाला एक पैसा कमी पडला पण ६४ वा 'नायनमाल' होऊं शकत नाहीं. हें सर्व काय आहे? जुने सर्व भक्त झाले तर आपण काय अभक्त आहों? नवीन भक्तिमार्ग शोधण्याची आपल्याला हिंमत असली पाहिजे. मठवाल्यांच्याकडून जर हे घडलें तर धर्माची शुद्धि होईल

परंतु अशीं कामें बहुधा मठवाल्यांकडून होत नाहींत, जे मठाबाहेर आहेत त्यांच्या हातून च झालीं. राजा राममोहन रॉय, विवेकानंद, म. गांधी, अरविंद घोष अशा स्वतंत्र व्यक्तींनीं सुधारणा केल्या. पुराणे शंकराचार्य, मठाधीश नुसते पहात राहिले. आद्य शंकराचार्यांमध्यें तर स्वतंत्र प्रज्ञा होती. त्यांनीं जुन्या चुकीच्या विचारावर प्रहार च केले आणि धर्माचें संशोधन केलें. पण आज जी शंकराचार्यांची परंपरा चालली आहे, ते शब्दांना प्रमाण मानणारे शंकराचार्य झाले आहेत. म्हणून हे मठ धर्माची प्रगति रोखण्याचें च काम करीत आहेत. टॉलस्टॉयनें ख्रिस्ती धर्माची उत्तमांत उत्तम सेवा केली. पण चर्चनें त्याच्यावर बहिष्कार घातला. सत्य धर्म जाणणाऱ्यावर पुराण्या धर्मवाल्यांचा प्रहार च होतो. तसें च हे मठवाले नवीन सुधारणेच्या बहुधा प्रतिकूल च राहिले. पण यापुढें हि तसें च राहिलें पाहिजे असा कायदा तर नाहीं. म्हणून त्यांनीं विचार-संशोधनाचें काम केलें पाहिजे.

### लोकजीवनांत करुणेची स्थापना हें दुसरें काम

मठवाल्यांनीं लोकजीवनांत प्रवेश करून करुणेची स्थापना करणें हें त्यांचें दुसरें काम आहे. एक देवतेची मूर्ति बसवली, तिच्यापुढें एक नारळ ठेवला, कीं आज काम भागतें. पण हा एक संकेत आहे. यामुळें जीवन सुधारणार नाहीं. आपलें समर्पण तर गांवाला, लोकांना केलें पाहिजे. लोकांमध्ये करुणाभाव आला पाहिजे. आपण परमेश्वरापुढें त्याच्या करुणेची, दयेची, याचना करतों, तर कोणावर दया करण्याची आम्हांवर हि कांहीं जबाबदारी आहे कीं नाहीं? आम्ही लोकांशीं निष्ठुर वागत जाऊं आणि

देवाला म्हणत राहूं, 'तूं मजवर दया कर, मला पापाची क्षमा कर' तर तें काय योग्य होईल? तो सांगेल, 'तूं कठोर बनला आहेस, तेव्हां मी तुझ्याशीं निष्ठुर च होईन.' अमीवर -- निखाऱ्यावर पाय ठेवून त्याची माफी मागूं लागलो तर भाजल्याशिवाय राहणार नाहीं. पहिल्या वेळीं च त्याचा पाय भाजून त्याला त्यांतून बचावण्याचें शिक्षण देतो. आम्ही बाभळीचे बीं पेरूं आणि त्यांतून आंब्याचें झाड उगवावें असें करायला ईश्वर काय मूर्ख आहे? तुम्हाला आंबे पाहिजे असतील तर आंब्याची कोय लावली पाहिजे. बाभळीचें बीं पेराल तर बाभळ च मिळेल. म्हणून लोक-जीवनामध्यें करुणा कशी दाखल व्हावी हें कार्य हि धार्मिक पुरुषांनीं केलें पाहिजे. लोकाना जीवनांत काय समस्या आहे याचा विचार करून ते प्रश्न हातीं घेतले पाहिजेत. ते प्रश्न धार्मिक मार्गानें सुटूं शकतात हें त्यांनीं दाखवून दिलें पाहिजे.

## धार्मिकांचें कर्तव्य – समस्याविरुद्ध उपायसंशोधन

समाजांत चोऱ्या होतात; त्यावर धार्मिक पुरुषांजवळ कांहीं इलाज नाहीं. ते म्हणतात, 'त्याचा बंदोबस्त सरकार करील.' मग तुम्ही काय करीत बसणार? तुम्ही लोक धार्मिक होऊन बसला आहात तरी समाजात चोऱ्या होत च राहतील तर त्याची कांहीं जबाबदारी तुमच्यावर आहे कीं नाहीं? पण समाजात चोऱ्या का होतात याचें कारण शोधलें पाहिजे. या ठिकाणीं आश्रम किंवा मठ आहे म्हणून याच्या दहा पाच मैल आसपास चोरीचें नावनिशाण हि नाहीं असें लोकाना दाखवून देता आलें पाहिजे. पण आज तर उलटा च मामला आहे. या मंदिर-मठामध्यें संग्रह असतो म्हणून त्यांना हि कुलूप लावावें लागतें. मूर्तीला सोन्याचे दागिने घातले म्हणजे जणूं कांहीं देवाला तुरुंगात च घातलें. त्या मूर्तीनें काय पाप केलें असेल म्हणून तिला हा तुरुंगवास भोगावा लागतो? कांहीं मंदिरात तर मूर्तीच्या रक्षणाकरिता शस्त्रधारी शिपाई असतात असें हि मला दिसून आलें आहे

## महावीर स्वामींना तुरुंगवास

मी बिहारमध्यें फिरत होतों तेव्हां एका मोठ्या जैन मंदिरांत मला नेण्यात

आलें. सर्व पंथांचे लोक बाबावर प्रेम करतात ही ईश्वराची कृपा आहे. त्यांतल्या कोणत्या हि संप्रदायातले दोष दाखविल्याशिवाय बाबा राहिलेला नाहीं. तरी हि ते बाबावर प्रेम करतात. त्या मंदिरामोंवतीं मोठे उंच उंच कोट होते. अमक्या मंदिराच्या भिंती पाहण्यासारख्या अशी त्याची ख्याति च होती. नागपूर जेलपेक्षां हि भिंती उच आहेत. या मंदिराची तुलना जेलबरोबर च होऊं शकेल. बाहेर हातांत तलवार घेऊन शिपाई उभा होता. दरवाजे हि लोखंडी होते. एक दरवाजा ओलांडून गेलों; दुसरा आला. असे चार पाच दरवाजे उघडून दोनदीं मूर्तीपुढें गेलो. मंदिराच्या चारी बाजूंला सोनें जडविलें होतें आणि मधें महावीराची मूर्ति होती. ज्याने वस्त्राची हि उपाधि ठेवली नाहीं त्याला इतक्या दरवाजांच्या आंत उंच उंच भिंतीं-आड कैद करून टाकलें आहे; हें आहे तरी काय ? मग मंदिर आणि मठ यांच्या आसपास चोऱ्या कमी कशा होतील ?

## तिसरें काम आत्मशुद्धि

धर्मविचारकांनीं तिसरी गोष्ट करायची म्हणजे त्यांनीं आपल्या वाणीची, शरीराची आणि चित्ताची शुद्धि करीत राहिलें पाहिजे. त्यांनीं नित्य आत्म-शुद्धीची उपासना आणि आत्मशुद्धीकरितां तपश्चर्या करीत राहिलें पाहिजे.

चतुर्वेदमंगलम् ( रामनाड )
१९–२–'५७

( मदुरा जिल्ह्यांतील कार्यकर्ते आणि सर्वोदयमंडळ यांच्यापुढें दिलेलें प्रवचन )

## आम्हीं मुक्तिमार्गावरचे यात्रेकरू आहोंत

आजच्या दिवसाचें माझ्या जीवनांत फार महत्त्व आहे. आजची च तारीख होती–२५ मार्च १९५७. बेचाळीस वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. त्या दिवशीं मीं घर सोडलें. घरीं कांहीं दुःख होतें म्हणून सोडलें नाहीं; तर घरीं भरपूर सुख होतें म्हणून च सोडलें. कारण आत्म-दर्शनाची ओढ लागली होती. त्याच्या शोधार्थ घर सोडून बाहेर पडलों होतों. तो शोध सतत चालू आहे. त्या दिवसांत या एका चिंतनाशिवाय दुसऱ्या कसल्या भोगाकडे माझी यत्किंचित् हि दृष्टि जात नव्हती. चित्तामध्यें वैराग्य होतें. तरी हि विषयांचा जो प्रहार होणार होता तो झाला च. पण ते मला पराजित करूं शकले नाहींत. आज माझ्या चित्तात अपार शांति, अपार आनंद यांचा अनुभव येत आहे. तो शोध माझा आज हि चालू आहे. पण तो रस्ता मीं दृढपणें धरलेला आहे.

त्या दिवसांत माझ्या चित्तात समाधान नव्हतें. पण तेव्हां जो कामांत आवेश होता त्यापेक्षा आज थोडा हि कमी नाहीं. त्या आवेशामुळें या ४१ वर्षांत मला कसला च थकवा आला नाहीं. आश्रमामध्यें अनेक प्रयोगांमध्यें वेळ गेला. त्या काळीं मी एका जागीं स्थिर होतों पण माझें चित्त एक च ठिकाण धरून राहिलें नव्हतें. आज तर बाहेरचें हि कोणतें स्थान मला चिकटलेलें नाहीं कारण रोज स्थान बदलत च आहे. रोज स्थान बदलतें तरी मी माझ्या च जागीं राहतों असा अनुभव येतो.

## संसारी आणि परमार्थी आपल्यापुरतें च पाहतात

हे भूदान, ग्रामदान माझ्या दृष्टीनें आत्मदर्शनाचा शोध आहे. आम्हां लोकांची ही फार मोठी गैरसमजूत आहे कीं, आपण आपल्याला या एका

देहापुरतें च मर्यादित समजतों. संसारांत आसक्त असलेले लोक देहसुखांत आपलें सुख समजतात आणि असें सुख मिळालें नाहीं म्हणजे दुःखी होतात. त्यांचें सुखदुःख त्यांच्या व्यक्तित्वाच्या आसपास राहतें. पारमार्थिक साधना करणाऱ्यांची हि ही च दशा आहे. चित्तशुद्धीची च त्यांना इच्छा असते. त्यांत आपली उन्नति झाली तर सुखी होतात. पण जर तशी त्यांना दिसली नाहीं, चित्तांत रागद्वेष भरले आहेत असें दिसलें, तर त्यांना दुःख होते. त्यांची परमार्थसाधना त्यांच्या आजूबाजूपुरती च मर्यादित असते. या-प्रमाणें संसारासक्त माणूस आपली च उन्नति इच्छितो आणि परमार्थाकडे लागलेले लोक हि आपला स्वतःचा मोक्ष मिळवूं इच्छितात. एक आपल्या देहाचें सुख इच्छितो, तर दुसरा आपल्या देहगत चित्ताची शांति इच्छितो. हे दोघे हि चुकत आहेत असें मी समजतों. कारण दोघे हि आपल्याला या देहापुरते च मर्यादित समजत आहेत.

## सर्वांमधें आपलें रूप पाहणें म्हणजे आत्मदर्शन

समजा, माझ्या देहाला सुख आहे पण माझ्या शेजाऱ्याला तें मिळालेलें नाहीं, तर स्वार्थासक्त माणूस त्याची चिंता करीत नाहीं. तो आपल्या देह-सुखानें सुखी असतो. तशी च साधकाची काय दशा आहे ? समजा, त्याच्या चित्तांतले विकार शमले आहेत पण शेजाऱ्याचे नाहींत तर साधकाला त्याची चिंता नाहीं तो आपल्या शांतीनें संतुष्ट आहे. हें चूक आहे असें मी समजतों. जोंपर्यंत आपण आपल्याला आपल्या देहापुरते च सीमित आहों असें समजण्याची चूक करूं तोंपर्यंत आपल्याला आत्मदर्शन दूर आहे. आत्मा कोठल्या एका देहांत च नाहीं, तो अनेक देहांत आहे. त्या अनेक देहांतला माझा एक देह आहे.

माझ्या चित्तांत अशांति असेल तर ती माझी च अशांति आहे आणि तुमच्या चित्तांत अशांति असेल तर ती हि माझी च अशांति आहे. हा व्यापक संबंध जेव्हां ध्यानांत येईल तेव्हां आत्म्याचें दर्शन होईल. त्याचा एक लहानसा प्रयोग ग्रामदानांत होतो. हें ग्रामदान ही तर लहानशी वस्तु आहे आणि जीबद्दल मी आतां सांगत होतों ती फार मोठी आहे. प्रत्येकाच्या सुख-दुःखांचा-माझ्याशीं संबंध आहे आणि प्रत्येकाची मानसिक

शांति-अशांति माझी च शांति-अशांति आहे. दुसऱ्याला आपल्याहून मी भिन्न समजेन तर ते चूक आहे. जगात जें कांहीं आहे तीं सर्व एक वस्तु आहे. मग त्याला 'मी'; 'तू' किंवा 'तो' अशी नांवें असोत. तुमच्यांतील कोणी माझ्याशीं वैर करीत आहे, याचा अर्थ माझ्या मनांत च तें लपलेलें आहे. त्याशिवाय तुम्ही वैर करू शकत नाहीं. म्हणून माझा शत्रु तुमच्यामध्यें नाहीं; तो माझ्यामध्ये च बसलेला आहे. तुम्ही माझ्यावर प्रेम करीत असाल तर तें प्रेम हि माझ्या मनांत च आहे. तें प्रेम तुम्ही करीत नाहीं, मी च माझ्यावर करीत आहें. मनुष्याला जेव्हां इतकें दर्शन होईल तेव्हां तो आत्मदर्शनाजवळ पोंचेल.

## ग्रामदान हा आत्मदर्शनाचा पहिला धडा

ग्रामदानांत एक लहानशी गोष्ट घडून येते. 'गांवाची संपत्ति आणि जमीन गांवाची, माझी-तुमची, आम्हां सर्वांची किंवा कोणाची च नाहीं, त्या ईश्वराची' असें कोणत्या हि भाषेंत म्हणा. ग्रामदानांत व्यक्तिगत मालकी सोडावी लागते. आजपर्यंत आम्ही आपले परिश्रम आपल्या च कुटुंबाला देत होतो; पण आतां सर्व गांवाला देऊं. आमची श्रमशक्ति फक्त आमच्याकरितां नाहीं तर सान्या गावाकरितां आहे. माझें जें कांहीं आहे तें केवळ *माझ्याकरिता नाहीं, सर्व गावाकरिता आहे. हा आत्मदर्शनाचा सर्वांत* सोपा पहिला आहे. म्हणून मी म्हणतों कीं, माझ्या दृष्टीने ग्रामदान-आंदोलन हें आत्मशोधार्थ आहे.

## आज आत्म्याचे तुकडे तुकडे झाले आहेत

आज आम्हीं त्या व्यापक आत्म्याचे तुकडे केले आहेत. गांवांत शेंकडों जाति आहेत. जाति-भेद, मालक-मजूर-भेद, हरिजन-परिजन-भेद, खिस्ती-मुसलमान-हिंदु-भेद, कॉंग्रेस आणि पी. एस्. पी. यांच्यांतले भेद अशा तऱ्हेचे आम्ही आमच्या व्यापक अखंड आत्म्याचे शेंकडों तुकडे करीत आहों. वेड्या मुलाच्या हातात कात्री सांपडली तर तो जसा अखंड कपड्याचे तुकडे तुकडे करून टाकतो, तसें आम्ही करीत आहों. त्याचें घटनेमध्यें हि समर्थन केलें जातें. आमच्या घटनेमध्यें व्यक्तिगत मालकीला मान्यता दिली गेली आहे. कांहीं धर्मांचे लोक हि म्हणतात कीं, 'परसनल

'प्रॉपर्टी इज् सेक्रेड' (व्यक्तिगत मालकी ही पवित्र वस्तु) आहे, तिच्यावर आक्रमण होतां कामा नये. आक्रमण होऊं नये हें मला हि मान्य आहे; पण द्वेषाचें नाहीं, प्रेमाचें आक्रमण झालें पाहिजे.

## चुकीच्या विचारानें 'दूषण' च 'भूषण' वाटतें

मुलगा बापाला म्हणाला कीं, या घरावर माझा हि हक्क आहे, तर बाप काय तें कबूल करणार नाहीं? बाप म्हणेल, 'तूं हे आपलें हि घर समजूं लागला आहेस ही आनंदाची गोष्ट आहे. आता हें जर तुझें घर आहे तर माझ्याबरोबर च घर झाडायला तूं लागलें पाहिजेस. दोघे मिळून घर साफ करूं.' याप्रमाणें प्रेमाचें आक्रमण होऊं शकतें. कोणी हिंसेनें किंवा बलात्कारानें 'प्रायव्हेट प्रापर्टी' काढून घेऊं लागला तर तें चूक आहे. कारण 'प्रायव्हेट प्रॉपर्टी'चा विचार मूलतः च चुकीचा आहे. आणि जर आम्ही जबरदस्तीनें ती काढून घेऊं लागलो तर त्याला ती चांगली वस्तु आहे असें वाटूं लागेल. पण आम्ही जर सद्विचार समजावून दिला तर तो मालकीचा बोजा खालीं टाकून देईल व त्याला हलकें वाटेल, आपण आज मुक्त झालों असें त्यास वाटेल. आजपर्यंत एक दागिना समजून त्यानें मालकी गळ्यांत बांधून घेतली होती. स्त्रियांना कैदी बनविण्याकरितां पुरुष त्यांच्या हातात, पायांत, कानात दहा दहा तोळ्यांचे सोन्याचे दागिने घालतात. सोन्याचे असतात म्हणून ते घालणाऱ्याला तो शृंगार आहे, भूषण आहे, असें वाटतें. पण खरोखर त्या बेड्या आहेत. या दागिन्यांमुळे च स्त्रिया एकट्या फिरूं शकत नाहींत, रात्रीं बाहेर पडूं शकत नाहींत. सारांश, चुकीच्या समजुतीमुळे 'दूषण' च 'भूषणांसारखें वाटूं लागतें.

## जबरदस्तीनें चुकीचा विचार सुटत नाहीं

'*मालकीवर दुसऱ्या कोणाचें आक्रमण होऊं नये*' असें जो म्हणतो, त्याचा मालकीवर विश्वास आहे. समजा, कोणी माणूस लाख रुपयांचा धनी आहे. त्याच्या घरीं रात्रीं चोर आले व त्यांनीं ते लाख रुपये चोरून नेले. तर त्याच्या मनांतली मालकी जाईल का? त्यानें क्रांति केली असें म्हणतां येईल का? त्याचा मालकीवर विश्वास आहे तर त्याची मालकी कशी नाहींशी होईल? मानसिक मालकी तर चालू च आहे. म्हणून

आम्हीं जबरदस्तीनें आक्रमण केलें तर मालकी सुटत नाहीं. तुम्हांला माहीत च आहे कीं मधें मुसलमानांनीं मूर्ति फोडणें सुरू केलें होतें. ते म्हणत, मूर्तीची पूजा करणें चूक आहे. त्याचा परिणाम म्हणून मूर्तिपूजा अजून चालू च आहे. मूर्तिपूजा कशी चुकीची आहे हें जर त्यांनीं समजावून सांगितलें असतें तर काम झालें असतें.

भगवान् बुद्धाच्या सुंदर सुंदर मूर्तींचें नाक कापलें आहे असें मला दिसलें. जगांतले लोक तें पाहून नाक का तुटलें म्हणून विचारतात. तेव्हां उत्तर मिळतें कीं, मुसलमानाच्या अंमलांत त्यांनीं मूर्तींचे नाक कान कापले. ज्यांनीं ते नाक कान तोडले त्यांच्या बदनामीचें तें स्मारक आहे असें मला वाटतें. नाक मूर्तींचें तुटलें नाहीं, तर ज्यांनीं तें कापलें त्यांचें च कापलें गेलें. म्हणून माझें म्हणणें आहे कीं, असद्विचार सद्विचारानें च काटला जाईल. आम्ही मालकीवर हिंसक आक्रमण करूं इच्छीत नाहीं. केवळ 'तो असद्विचार आहे' एवढें च समजावून देऊं इच्छितों.

### कुटुंबसंस्थेचा नाश नाहीं, विस्तारच च होईल

पण आज लोकांनीं तो एक पवित्र विचार आहे असें समजून मालकी राखली आहे. तिच्यांत पवित्रतेचा काहीं अंश आहे हें खरें; तो आम्ही समजून घेऊं तेव्हां मालकी काढून टाकूं शकूं. असद्विचाराशीं एखादा 'सद्विचार' हि चिकटलेला असतो. त्यामुळें तो 'असद्विचार' टिकतो. त्या 'असद्' आणि 'सद्' चें पृथक्करण करून त्यांतल्या 'सद्विचारा'चें ग्रहण केलें म्हणजे 'असद् विचार' गळून पडतो. 'प्रायव्हेट प्रापर्टी'शीं कुटुंब-भावना जडलेली असते हा मालकीच्या विचारांतला पवित्र अंश आहे. लोकांना भीति वाटते कीं, व्यक्तिगत मालकी सोडून गांवाची मालकी झाली कीं कुटुंबसंस्था च मोडेल. कुटुंबसंस्था फार प्राचीन कालापासून चालत आली आहे. तिच्यामुळें लोकांना संयम, प्रेम, त्याग यांचें शिक्षण मिळतें. त्यामुळें आनंदलाभ होतो. म्हणून आम्हीं लोकांना समजावलें पाहिजे कीं, आम्हांला या कुटुंबसंस्थेचा नाश करायचा नाहीं, विस्तार च करायचा आहे.

तेहुंकुरम् (मदुरा)
२५-३-'५७

विज्ञानाच्या प्रगतीमुळे एकेका नव्या वस्तूचा शोध लागला. या शोधाना पुष्कळ काळ लागला. शोध लागल्यानंतर समाजाला त्या शक्तीचा उपयोग करायचा असतो. तें दुसऱ्या प्रकारचें काम असतें. यामधें वेगळ्या शक्ति कामाला येतात. शोध लागल्यानंतर समाजात त्याचें 'अप्लिकेशन' झालें नाहीं तर त्या शोधाचा काय उपयोग? तरी हि त्या शोधाची किंमत कमी ठरणार नाहीं. आपण पाहाता च कीं, वाफेचा, विजेचा, ॲटमचा शोध लागला. आता अणूचे दिवस आले आहेत. वीज मागें पडली; पण आज हि हिंदुस्थानात विजेचा पूर्ण उपयोग होत आहे असें नाहीं. सूर्य-नारायणाचा प्रत्येकाला उपयोग होतो तसा विजेचा प्रत्येकाला होत नाहीं; म्हणजे वीज अजून सामूहिक वस्तु बनली नाहीं, पण बनूं शकेल. आता अणुशक्तीचा शोध लागला आहे. त्याचा उपयोग सर्व समाजाकरितां— सर्वांना सारखा व्हावा असे प्रयोग केले पाहिजेत. त्यामुळे कोणाचें नुकसान होणार नाहीं. सर्वांचा लाभ च लाभ होईल. सारांश, अणुशक्तीचा शोध हा पहिला पुरुषार्थ, त्याचा समाजाला उपयोग होणे हा दुसरा पुरुषार्थ आणि समाजाचें काहीं नुकसान नसता लाभ च लाभ व्हावा हा तिसरा पुरुषार्थ आहे. या तीन प्रकारच्या पुरुषार्थांनीं विज्ञानाच्या शोधाचा मानव-जातीला उपयोग होतो.

## ग्रामदानांतून शक्तीचा शोध

ही च गोष्ट आध्यात्मिक क्षेत्रात आणि व्यावहारिक जीवनात लागू होते. भारतांत ग्रामदानाच्या शक्तीचा शोध लागला आहे. आतां या शक्तीचा सर्व समाजांत व्यापक प्रमाणात उपयोग व्हावा हा स्वतंत्र पुरुषार्थ होईल आणि त्यांतून कसली हानि न होतां नुसता लाभ च लाभ व्हावा हा तिसऱ्या प्रकारचा पुरुषार्थ होईल. अग्नि ही कल्याणकारी शक्ति आहे; पण ती घराला आग हि लावूं शकते. जो परम पुरुषार्थ मानला जातो

त्या योगानें हि नुकसान होऊं शकते. येथपर्यंत शास्त्रांत सांगितलें आहे. योगानें शक्तीचा प्रवाह खुला होतो. त्यांतून कांहीं कल्याणकारी निर्माण हि होऊं शकतें; पण सिद्धीचा दुरुपयोग केला तर नुकसान हि होऊं शकेल. त्याप्रमाणें च ग्रामदानाच्या विचारांचा शोध ही नवीन शक्ति आहे व त्यामुळें नवीन जीवन निर्माण होऊं शकेल. या गोष्टीचा लोकांना विश्वास वाटला पाहिजे या शक्तीचा शोध लागला ही गोष्ट सर्व भारताला माहीत व्हावी. मग तिचा सर्व समाजांत उपयोग करणें, विनियोग करण्याची गोष्ट, त्याला अनुसरून जीवन बनविण्याची गोष्ट दुसऱ्या पुरुषार्थांत पडते. नंतर त्यामुळें कांहीं नुकसान होऊं नये, लाभ च लाभ व्हावा, असा 'सेफ्टी व्हाल्व' लावणें हा तिसऱ्या प्रकारचा पुरुषार्थ आहे.

## शुद्धीची योजना आवश्यक

सर्व ठिकाणीं याप्रमाणें करावें लागतें. लोकांमध्ये एक सामाजिक भावना उत्पन्न व्हावी आणि कांहीं संयमाचा अनुभव यावा म्हणून गृहस्थाश्रमाची योजना झाली. परंतु त्यामुळें हि संकुचित भावना उत्पन्न होऊं शकते. म्हणून त्याला संन्यासाश्रमाची जोड दिली. पण त्यामुळें हि नुकसान होऊं शकतें. सामाजिक जीवनाच्या स्वीकारानें जसें नुकसान होऊं शकते तसें सामाजिक जीवनाच्या तिरस्कारानें हि होऊं शकतें. गृहस्थ जीवनांत सामाजिक जीवनाचा स्वीकार आहे. त्यानें आसक्ति उत्पन्न होते. म्हणून संन्यासाश्रम केला. त्यात सामाजिक जीवनाचा परित्याग आहे. त्यांत हि हानि आहे. म्हणून सन्यासाश्रमाशीं ईश्वरार्पण जोडलें. याप्रमाणें एका कल्पनेच्या शुद्धीकरिता नवीन नवीन पोषक गोष्टी जोडाव्या लागतात. म्हणून तर असा प्रश्न उत्पन्न झाला आहे कीं, ग्रामदानाच्या पायावर असें जीवन घडविलें पाहिजे कीं त्यात नुकसान न होता लाभ च लाभ व्हावा. त्याकरिता कित्येक प्रकारच्या नव्या योजना कराव्या लागतील. समजा, एखादा गाव आपला स्वतंत्र अभिमान बाळगूं लागला तर त्यामुळें शेजारच्या गावाना त्रास होण्याचा संभव आहे. त्यासाठीं कांहीं योजना करावी लागेल. या सर्व गोष्टी एकामागून एक हातीं घ्याव्या लागतील.

## खूप विचार-मंथन व्हावें

मी वारंवार सांगत असतों कीं, गांवोगावीं जनतेपुढें सर्व तऱ्हेचे विचार अत्यंत स्पष्टपणें मांडले जावेत. ग्रामदान, भू-दान आणि सर्वोदय या कामांबरोबर च विचार-प्रचाराची विराट् योजना बनवली पाहिजे, विचार-मंथन झालें पाहिजे. अनुकूल आणि प्रतिकूल दोन्ही प्रकारची चर्चा अवश्य झाली पाहिजे. अमुक एक विचार जगांत सर्वमान्य आहे, त्याच्या विरुद्ध विचार करण्याची जरूर च नाहीं, असा विचार क्षणभर हि माझ्या मनांत येत नाहीं. वाईटांतल्या वाईट गोष्टींत हि कांहीं लाभ असतो आणि चांगल्यांतल्या चांगल्यांत हि कांहीं दोष असतो; म्हणून गुण-दोषविश्लेषणाची चर्चा करणें फार अवघड आहे. त्यात उदासीनता आली तर ती हानिकारक होईल. आमच्या विचाराला विरोध होत असेल तर तो हि लाभदायक आहे. भारतांत सर्वत्र आमचा विचार पसरावा अशी माझी इच्छा आहे. वेदांत वर्णन येतें कीं, इंद्र आणि अग्नि यांचें देखील सरस्वतीशिवाय चालत नाहीं. भक्तानें इंद्राचें आणि अग्नीचें आवाहन केलें आहे कीं, 'तुम्ही सरस्वतीबरोबर या.' इतकें सरस्वतीचें महत्त्व आहे. वेदात जें सरस्वतीचें वर्णन आहे तें शक्तीच्या वर्णनासारखें आहे. '**सरस्वती**...**मरुत्वती धृपद्वती जेषि शत्रून्।**'—हे सरस्वती, तूं धैर्य देणारी, शत्रूला जिंकणारी आहेस. चुकीचा विचार हा च शत्रु, दुसरा कोणी नाहीं. एखादा कुविचार यावा आणि त्याचा नाश व्हावा हा च शत्रुनाश. हें सरस्वतीचें काम आहे. म्हणून आम्हांला सरस्वतीचें साहाय्य घेतलें पाहिजे असें मीं पुष्कळ वेळां सांगितलें आहे.

## विचार-प्रचाराचें अद्भुत सामर्थ्य

आम्ही आतां एका फिरक्यांत, एका तालुक्यांत काम करीत आहों; पण त्या विचाराचें चिंतन तामिळनाडमध्यें च नव्हे सर्व भारतांत झालें पाहिजे. येथें आम्हाला ग्रामदानें मिळूं लागलीं तर मी लगेच 'तालुका-दान' 'फिरका-दाना'ची भाषा बोलूं लागलो. त्याचा परिणाम म्हणून महाराष्ट्रात जेथें तीन महिन्यापूर्वी विशेष काम नव्हते, तेथें 'फिरका-दान' होऊन गेलें आहे. शब्दामध्यें अशी ही विलक्षण शक्ति आहे. कोठे त्या शब्दाचा उच्चार झाला तर त्याचा अंमल कोठें दुसरीकडे च झाला!

टॉलस्टॉय व गांधीजी यांचा पत्रव्यवहार प्रसिद्ध च आहे. टॉलस्टॉय पृथ्वीच्या उत्तर भागांत राहात होते आणि गांधीजी त्या काळीं अगदीं दक्षिणेच्या टोकाला, दक्षिण आफ्रिकेंत राहात होते. टॉलस्टॉयनीं जे विचार प्रकट केले त्याचा अंमल गांधीजींनीं दक्षिण आफ्रिकेंत केला. विचार उत्पन्न झाला मॉस्कोजवळ आणि त्याचा अंमल झाला जोहान्सबर्गजीक. याप्रमाणें विचाराचा प्रसार आणि परिणाम होतो. ज्याप्रमाणें पावसाळ्यांत ढग इकडून तिकडे जात असतात तसा विचारांचा प्रवाह हि जगांत वाहात असतो. म्हणून मी वारंवार प्रचारावर जोर देत असतों.

आम्ही लोक खेड्यामध्ये काम करतों. क्रांति खेड्यामध्यें च होऊं शकेल. पण त्याचा विचार, त्याचा इतिहास शहराकडून लिहिला जाईल याकडे आमचें ध्यान असलें पाहिजे. शहरात विश्वविद्यालयामध्ये अध्ययन होतें म्हणून शहराकडे दुर्लक्ष करुन चालणार नाहीं. विचार शहरांत बनतो म्हणून तेथें घरोघरीं साहित्य पोचलें पाहिजे. इकडे खेड्याखेड्यामध्यें परिव्राजक फिरत राहिले पाहिजेत आणि तिकडे सरस्वतीच्या मदतीनें आमचा विचार पसरला पाहिजे. याप्रमाणें दुहेरी प्रचार होईल, तर च काम होईल.

### भिन्न भिन्न प्रयोग व्हावेत

मीं आतां च सांगितलें कीं शक्तीच्या शोधानंतर तिच्या उपयोगाचा प्रश्न उत्पन्न होतो. परंतु शक्तीच्या शोधाच्या वेळीं हि तिचा उपयोग लवकरात लवकर व्हावा अशी वासना जोर करते. आतां च मीं वाचलें कीं, 'आतां आपल्याला मगळावर हि जातां येईल.' म्हणून कांहीं लोक आतांपासून च विचार करूं लागले आहेत कीं, मंगळावरच्या जमीन वगैरे-वरची मालकी आतापासून रिझर्व करुन ठेवावी. यावरून माणसाचें डोकें कसें चालत आहे तें कळतें. याप्रमाणें च ग्रामदानाची गोष्ट निघाली कीं ग्रामदानी गांवांत काय फरक पडेल हा प्रश्न उद्भवतो च. म्हणून याकरिता पुरुषार्थाची जरूरी आहे आणि पुष्कळ विचारपूर्वक काम केलें पाहिजे. गावची शक्ति वाढावी, गावकऱ्याची उन्नति व्हावी, हें काम सोपें नाहीं. याच्यांत आमच्या बुद्धिमत्तेची कसोटी लागणार आहे. ग्रामदानांत वेगवेगळे

प्रयोग केले जातील असें मीं किती वेळां तरी सांगितलें आहे. कोरापुटमध्यें ग्रामदानी गांवांत कांहीं झालें आहे. पण तें सर्वांना पसंत नाहीं. ज्यांना पसंत नाहीं ते हि सर्वोदयविचाराचे च लोक आहेत. आतां ते कोठें प्रयोग करतील तर तो दुसऱ्यांना पसंत पडणार नाहीं. हा विचार इतका व्यापक आहे कीं, त्यांत तऱ्हतऱ्हेच्या विचारांना सवड राहील, मतभेदाला वाव द्यावा लागेल, कांहीं सर्वसाधारण विचार निश्चित करावे लागतील, त्यांच्या मर्यादेंत गांवोगांवीं वेगवेगळे प्रयोग होतील. कित्येक गांवीं वेगवेगळी 'जीनिअस'–प्रतिभा असते. तिच्या अनुसरून तेथल्या नियोजनांत कांहीं फरक पडला म्हणून कांहीं हरकत नाहीं. याचें चिंतन आणि विचार करण्याकरितां जितके म्हणून रचनात्मक कार्यकर्ते आहेत त्या सर्वांची बुद्धि लागली पाहिजे.

## चेतन, धृति आणि संघात

प्रथम दोन प्रकारच्या कार्यकर्त्यांची जरूरी पडेल. त्यानंतर रचनात्मक कार्यकर्त्यांची. पहिल्या प्रकारच्या कर्त्यांना मी 'चेतन' म्हणेन. म्हणजे सर्वांना प्रेरणा देणें आणि ग्रामदानाची तयारी करणें हें त्याचें काम. अशा तऱ्हेची आमची एक 'चेतन' सेना असेल. आमची दुसरी सेना मी 'धृति' म्हणेन. 'धृति' म्हणजे टिकून राहणें. गांवकऱ्यांनीं जो संकल्प केला असेल त्यावर टिकून राहणें. त्या गांवकऱ्यांच्या सर्व अडचणी कशा दूर कराव्या याचे उपाय सुचविणारी ही आमची दुसरी सेना आणि तिसऱ्या प्रकारच्या सेनेला म्हणायचें 'संघात.' हिचें काम सर्व गांवाची शक्ति एकत्र करून गांवाचें पुनर्निर्माण करणें.

हे तीन शब्द मीं गीतेंतून घेतले आहेत. हें शरीर कसें चालतें याचें गीतेंत वर्णन आहे. शरीरांत कित्येक तत्त्वें काम करीत असतात. पण त्यात सर्वांत महत्त्वाचीं कामें करणारीं तीन तत्त्वें आहेत. 'संघातश्चेतना धृतिः' —संघात, चेतना आणि धृति. चेतना तर फक्त चाबकाचें काम करते. पण घोड्यावर बसायला नुसता चाबूक उपयोगी नाहीं. त्यावर मांडी मजबूत ठेवून टिकून राहायला आलें पाहिजे. मग चाबूक उपयोगी. याला धृति

म्हणतात. चेतनेनें घोडा पळूं लागेल; पण धृति नसेल तर घोडा वर आणि स्वार खालीं येईल. म्हणून चेतनेबरोबर धृतीची हि योजना असली पाहिजे. तिसरी गोष्ट पुनर्निर्माणाची. त्याकरितां ' संघाता ' ची योजना पाहिजे.

नेडुंकुलम् ( मदुरा )
२५-३-'५७

## सरकारी नोकरांना : ४१ :

( ब्लॉक डेव्हलपमेंट ऑफिसर्स, ग्रामसेवक आणि गावचे प्रमुख लोक यांच्यापुढें झालेलें भाषण )

### जुन्या जमान्यांतले शोषक अधिकारी

स्वराज्यप्राप्तीनंतर ' सरकारी नोकर ' ' जनतेचे सेवक ' होऊन जातात. पूर्वीच्या राज्यांत सरकारी नोकर हि कांहीं सेवा करीत नव्हते, असें नाहीं. कांहीं सेवा करीत होते च. परंतु तें सरकार जी योजना करीत असे ती देशाच्या शोषणाची असे त्यामुळें सरकारी अधिकारी आणि नोकर त्यांतील कित्येकांच्या मनात लोकसेवेची इच्छा असून हि त्या सरकारी यंत्रणेचे भाग बनून त्या शोषणाचे सहाय्यक होत. अलीकडे जागोजागीं, गांवोगावीं जाऊन तेथली ' सर्व्हे ' केली जात आहे. इंग्रजांच्या काळीं हि ' सर्व्हे ' केली जात असे. पण त्याचा उद्देश असे परदेशी व्यापाराला तिच्यापासून काय फायदा होईल हा. पण आज देशाची समृद्धि कशी वाढावी, गांवकऱ्याची शक्ति कशी वाढावी या उद्देशानें ' सर्व्हे ' करण्यांत येते. त्या वेळच्या हि सरकारी अधिकाऱ्यांना आणि नोकरांना गांवोगांवीं जावें लागे. पण लोक त्यांना घाबरत असत. त्याचा पोषाख हि लोकांच्याहून वेगळा असे. लोकांच्या अनुकूल पेहराव करणें हे त्यांना बरें वाटत नसे. आपण कोणी वेगळे आहों असें दिसावें अशी त्यांची इच्छा असे. उकाड्या-मुळें अंगांत घाम आला असला तरी कोट, पँट, टाय, बूट, हॅट यांशिवाय

दुसरा पोशाख त्यांना चालत नसे. यामुळें लोकांना आपला दबाव दिसेल आणि त्यांच्यावर आपलें वजन पडेल असें त्याना वाटे. भाषेंत हि इंग्रजीशिवाय दुसरा शब्द यायचा नाहीं. जनतेहून आपण कोणी वेगळे आहों असें ते मानीत. जणूं काहीं वाघ आपलें विलक्षण आणि भयानक रूप घेऊन जनावरांत फिरतो व त्यामुळें तीं जनावरें घाबरून जात आहेत. सगळ्याना असा भास व्हावा कीं अरे, हा वाघ आहे, कोणी सामान्य जनावर नाहीं. त्याचा आवाज हि दुसऱ्या जनावरापेक्षां वेगळा. असा भास त्या काळच्या सरकारी अधिकाऱ्यांना पाहून होई.

## सेवकांनीं जनतेमध्यें मिळूनमिसळून जावें

आतां थोड्या च दिवसांत तामिलनाडचा सर्व कारभार तामिलमध्यें चालेल. कोर्टकचेरीमध्यें ती च भाषा चालेल. शेतकरी ज्या भाषेंत घरीं बोलतो त्या च भाषेंत आपलें म्हणणें मांडील. स्वराज्याच्या पूर्वीच्या नोकरांत आणि नंतरच्या नोकरांत फार फरक पडतो. आज पूर्वीच्या मानानें पगार हि पुष्कळ कमी झाले आहेत. कारण त्या वेळीं त्यांचा लोकांशीं कांहीं संबंध च नव्हता. दर्जे ठरलेले होते. आज हि लोकांच्या जीवनमानाबरोबर त्यांचा पगार नाहीं. तसा करणें सोपें हि नाहीं. परंतु लोकांच्या जीवनाच्या प्रमाणांत तो असावा असा प्रयत्न आहे. आज पूर्वीपेक्षां पगार कमी झाले आहेत पण दर्जा कमी झालेला नाहीं आमच्या भारतीय संस्कृतीची ही विशेषता होती कीं, जो प्रेमानें जितका अधिक त्याग करील तितकें त्याचें श्रेष्ठ स्थान मानलें जाई. उलट सामान्य लोकांच्या स्तरापेक्षां जास्त पगार मिळणें ही गोष्ट आमच्या संस्कृतींत 'व्हल्गॅरिटी' – कमीपणा मानली जात असे. लोकांशीं कसें एकरूप व्हावें असा च दिवसेंदिवस प्रयत्न केला जाई. सेवकांमध्यें ही वृत्ति असली पाहिजे.

आपण जसे भुकेकंगाल आहो तसें च नोकरांनीं हि असावें असें लोकांना वाटत नाहीं. कोणी बुडायला लागला तर आपल्याशीं सहानुभूति दाखवण्याकरितां दुसऱ्यांनीं हि बुडावें असें त्याला वाटत नाहीं. दुसऱ्यांनीं पोहावें आणि आपल्याला वांचवावें असें त्याला वाटतें. आपल्या जीवनाचा जो स्तर आहे तो च सरकारी नोकरांचा असावा असें ते म्हणत नाहींत. ते

एवढें च म्हणतात कीं, आमचें जीवनमान वाढविण्याचा त्यांनीं प्रयत्न करावा. आमचा उद्धार करणारा पाण्यांत बुडावा अशी आमची इच्छा नाहीं. पण त्यानें निदान पाण्यांत तरी उतरावें. ते पाण्यांत न उतरतां कांठावर च राहतील तर कसें चालेल? तुम्हां लोकांचें काम 'स्टेटस' आहे हें तुमच्या लक्षांत यावें म्हणून मी हें सर्व बोलत आहें.

## तुम्ही शिवाचे भक्त व्हा

तुम्ही भगवान् शिवाचे भक्त आहां. आमचा शिव भगवान् अत्यंत दरिद्री आहे. त्याला ल्यायला पुरें वस्त्र नाहीं. खायला पुरें अन्न नाहीं. त्याला त्याच्या बैलाशिवाय कोणाची मदत नाहीं. असल्या शिवाचे तुम्ही उपासक आहां. असल्या देवाची उपासना कशी करायची? उपासनेचा नियम च आहे कीं, 'शिवो भूत्वा शिवं यजेत्।' – शिवाची उपासना करायची असेल तर शिव झालें पाहिजे. हे लोक जसें जीवन जगत आहेत तसें जगण्याचा तुम्हीं भरपूर प्रयत्न केला पाहिजे. आई जशी मुलांकडे वात्सल्य-भावानें जाते तसें च तुम्हीं लोकांनीं हि गांवांतील लोकांकडे गेलें पाहिजे.

## आदर्श सेवक – सूर्यनारायण

सेवेकरिता तुमच्या हातांत एकेक ब्लॉक दिला आहे हे तुम्ही जाणतां च. अशा प्रकारचें नियोजन हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं व्हावें असा विचार आहे. तुम्ही ज्या कोणत्या गांवीं जाल तेथल्या लोकांना हा आमचा सेवक आला आहे, असा धीर आणि विश्वास वाटला पाहिजे. सूर्य उगवला म्हणजे लोक अत्यंत उत्साहानें आपला दरवाजा उघडतात व त्याचें किरण घरांत यावें याविषयीं उत्सुक असतात. 'मित्र आला' असें समजतात. संस्कृतांत सूर्याला 'मित्र' म्हणतात. हा सूर्य कसला! लोकांचा प्राण च उगवत आहे असें म्हणत: 'प्राणः प्रजानाम् उदयत्येष सूर्यः।' सूर्याबद्दल लोकांना किती विश्वास, किती प्रेम व भक्ति आहे! एवढा महान् आहे. पण स्वभाव कसा आहे? इतकें उच्च त्याचें स्थान, पण नम्रता किती आहे! कोणी आपले दरवाजे बंद ठेवले तर धक्के देऊन तो उघडणार नाहीं. आपल्या किरणांसह तो दरवाजात च उभा राहील. दरवाजा उघडणार नाहीं. तोंपर्यंत तो

आपण होऊन आंत जाणार नाहीं. परत हि निघून जाणार नाहीं. अशी सेवकांची वृत्ति पाहिजे. सूर्यनारायण सेवकाचा आदर्श आहे. खेडेपाडीं लोक किती घाण करतात ! पण सूर्यनारायण आपल्या किरणांनीं त्याचा दुर्गंध नाहींसा करतो. म्हणून इतकी दुर्गंधि असून लोक जिवंत आहेत. सूर्य-नारायण भंगी बनून आम्हांला वांचवीत आहे. आम्हीं मेल्यावर माती टाकली तर सूर्यनारायण त्याचें सोनें बनवील. त्याचें उत्तम खत करून लोकांना देईल. याप्रमाणें तो निरंतर सेवा करतो. सेवा करीत असून हि अत्यंत नम्र आहे. हा आपला मित्र च आहे असें सर्वांना वाटतें. वेदामध्ये त्याचा अद्भुत महिमा गायिला आहे : **‘ माम् प्रति माम् प्रति इति सर्वेण समम् । ’**— सर्वांना वाटतें कीं, हा माझ्याकरितां च आला आहे, तो सर्वांना समान आहे.

हें च सेवकाचें लक्षण आहे. त्याच्यात पक्षपात नाहीं. उच्चनीच भेद नाहीं. हां ! भेद असला तर एवढा च कीं, मी सर्वांचा सेवक आहे आणि सारे माझे स्वामी आहेत. तुम्हीं हि याप्रमाणें च लोकांच्याकडे गेलें पाहिजे आणि त्यांच्या स्थितीचा अभ्यास केला पाहिजे. घरीं आई ज्याप्रमाणें सगळ्यांत अशक्त, मलिन वेड्या मुलाकडे जास्त लक्ष देते त्याप्रमाणें जे सगळ्यांत निकृष्ट असतील त्यांना प्रथम मदत मिळाली पाहिजे. आई आपल्या विद्वान्, शहाण्या मुलाचें कौतुक करील पण काळजी करणार नाहीं, वेड्याची करील. रात्रं-दिवस, स्वप्नांत कोणाचें तिला स्मरण होईल तर त्या वेड्या मुलाचें.

### सगळ्यांत दीन असेल त्याची काळजी घ्या

भक्तांनीं अनेक विशेषणांनीं भगवंताचें वर्णन केलें आहे. पण सर्वांत सुंदर वर्णन आहे ‘ पतित-पावन ’ या शब्दामध्यें. ‘ रघुपति राघव राजाराम पतित-पावन सीताराम । ’ तो पतितपावन आहे हें च त्याचें गौरव आहे. भारतांत राजे लोक अनेक होऊन गेले आहेत पण तो च एक पतितपावन राजा राम लोकांना माहीत आहे. म्हणून च जो सगळ्यांत नीच आहे, पतित आहे, त्याची च सर्वोदयात चिंता केली जाते.

हिंदुस्थानांतला गरीब शेतकरी सर्व प्रकारें दरिद्री आहे. केवळ लक्ष्मी त्याच्यापाशीं नाहीं म्हणून तो दरिद्री नाहीं; त्याला शिक्षण हि नाहीं; ज्ञान

नाहीं आणि शक्ति हि नाहीं. तो सर्व प्रकारें दीन आहे. म्हणून तुम्हीं स्वतः त्याच्याकडे जावें, चमच्यानें तोंड उघडून, जरूर तर नाक दाबून, त्याला दूध पाजावें, तेव्हां तें त्याच्या पोटांत जाईल. दूध दिसतां च त्याच्यावर धाड घालावी अशी मांजरासारखी त्याची स्थिति नाहीं. तो कोठें आहे हें च आपल्याला शोधावें लागेल. तुम्हीं त्याला शोधूं लागलां तर तो प्रथम तर दूर च पळून जाईल. म्हणून हा साहेबाचा पोषाक तर सोडून च द्या. साधारण स्वच्छ कपडे असतील तरी ते भितील. हा कोणी वेगळा च आहे असें समजून लपून बसतील. अशाना आपल्याला शोधायचें आहे. ते ज्या प्रकारचे आहेत तसलें रूप आणि वेष घेऊन त्यांच्याकडे जाल तर ते तुम्हांला ओळखतील.

## परमनम्र सेवक— भगवान् कृष्ण

महाभारतांत एक कहाणी आहे. कुंतीला वर मिळाला होता कीं, ज्या रूपामधें भगवंताचें दर्शन घेण्याची तिची इच्छा असेल, त्या रूपांत तिला दर्शन मिळेल. एके दिवशीं तिला इच्छा झाली कीं चला, सूर्यनारायणाचें जवळून दर्शन घ्यावें. स्मरण करता च सूर्यनारायण समोर येऊन उभे राहिले. त्याचें तेज असह्य होतें. ती जळूं लागली. लागली च तिनें देवाची प्रार्थना केली कीं, ' प्रभो, आपलें हें रूप आवरून घे. ' सूर्यनारायणाचें तेज सहन करण्याची शक्ति पाहिजे. पण तीहि दरिद्र नारायणांत नाहीं म्हणून त्यांच्याजवळ जायचें असेल तर त्यांच्यासारखें च होऊन गेलें पाहिजे. नम्रपणें बोलून आपण त्यांच्यापैकीं च एक आहों अशी त्याना प्रतीति आली पाहिजे. भगवान् कृष्ण किती नम्र होते ! अर्जुनापेक्षां वयानें तर मोठे होते च आणि त्यांच्या ज्ञानांत तर इतकें अंतर होतें कीं एक होता मूर्ख आणि दुसरा होता ज्ञानी. पण ते अर्जुनाबरोबर मित्रासारखे वागत होते. त्यांनीं युद्धांत अर्जुनाचें सारथ्य केलें. पांडवाना राज्यावर बसवून, राजसूय यज्ञांत उष्ट्या पत्रावळी उचलायचें काम केलें. आम्ही जेव्हा इतक्या नम्रपणें त्यांच्याजवळ जाऊं तेव्हा च आमची सेवा त्यांना मान्य होईल. नाहीं तर तुमची सेवा ते घेणार च नाहींत.

## ग्रामदानाचें काम अधिकाऱ्यांनीं हातीं घ्यावें

तुम्हां लोकांना माहीत च आहे कीं, बाबा तर भूदानाच्या कामाला लागला आहे आणि ग्रामदानाच्या गोष्टी सांगत आहे. आजच्या सरकारी नोकरांनीं बाबाचें व्याख्यान ऐकावें अशी हे लोक योजना करतात. कारण त्यांना माहीत आहे कीं, बाबाजवळ एक अशी चीज आहे कीं, तिच्याशिवाय सरकारी नोकरांची सेवा कामीं लागणार नाहीं. आज गांवोगांवीं असलेली उचनीचता आणि आर्थिक व जातीय विषमता नाहींशी करण्याची चावी जोंवर हातीं येणार नाहीं तोपर्यंत दुसरी कसली सेवा उपयोगी पडणार नाहीं. ग्रामदान आणि भूदान याच्यायोगें ही चावी सांपडते. राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झाल्यावर देशापुढें आर्थिक आणि सामाजिक स्वातंत्र्य मिळविण्याचा कार्यक्रम उभा राहतो. म्हणून तुम्ही भू-दान, ग्रामदान आदि कामात भाग घ्यावा अशी मी अपेक्षा करण्यांत मला जरासा हि संकोच वाटत नाहीं. सरकारी नोकर जातील तर लोकांवर दबाव पडेल अशी लोकांना भीति वाटेल. पण दबाव घालण्याची वृत्ति केवळ सरकारी अधिकाऱ्यांत च असते असें नाहीं. सर्वांमधें असते. म्हणून मी प्रथम च सांगितलें कीं, आपण नम्र होऊन गेलें पाहिजे. सरकारी अधिकाऱ्यांना तर नम्रता अधिक च जरूर आहे. तुम्हीं अगदीं नम्र होऊन गांववाल्यांकडे जावें आणि ग्रामदानाचें महत्त्व समजावून द्यावें. सरकारनें तुम्हांला जो कार्यक्रम दिला आहे त्या सर्वांना बळ देणारें हें मौलिक कार्य आहे. त्याकरितां तुम्हांला तुमचें जीवन हि सुधारलें पाहिजे. आपण लोकांना मालकी सोडायला सांगायचें तर आपल्या संपत्तीचा हि कांहीं भाग दिला पाहिजे. याप्रमाणें आपलें जीवनपरिवर्तन करून जर आपण लोकांकडे जाऊं तर हिंदुस्थानचें रूप च बदलून गेलेलें तुम्हाला दिसेल.

## पगार सरकारचा घ्या पण काम बाबाचें करा

असेंब्लीच्या मेंबरांना मी एकदा विनोदानें म्हणालों होतों कीं, तुमची असेंब्ली तर पांच च महिने चालते पण तुम्हांला बारा महिन्यांचा तनखा मिळतो; हा ज्यादा सात महिन्याचा तनखा तुम्हांला बाबाचें काम करण्याकरितां च दिला जातो. नाहीं तर दुसरें तर कांहीं कारण दिसत नाहीं. सुतार

रोज काम करतो तेव्हां त्याला आम्ही रोजची मजुरी देतों. ही च गोष्ट शिक्षक, प्रोफेसर आणि पेन्शनरांची आहे. ते जोंपर्यंत सरकारची सेवा करीत तोंपर्यंत त्याना पगार मिळत होता हें ठीक च आहे पण सेवा बंद झाल्यावर पेन्शन मिळतें तें बाबाचें काम करण्याकरितां च मिळतें.

## स्वराज्याचें लक्षण — गरीबांची सेवा

*हिंदुस्थानात दरिद्री माणूस च सर्वांचा स्वामी आहे. त्याची सेवा करण्यांत* च आपण सर्वांनीं आपली शक्ति लावली पाहिजे. हिमालयाच्या उंच शिखरावरच्या किंवा त्याच्या खालच्या शिखरावरच्या पाण्याला किंवा नदीनाल्यांतल्या पाण्याला विचारलें कीं, तुम्ही कोठें जात आहां, तर सर्व हें च सांगतील कीं आम्ही समुद्राला मिळायला चाललों आहों. त्याप्रमाणें सर्वांची सेवा दरिद्र्याकडे गेली पाहिजे. तेव्हां च देशांत स्वराज्य आलें आहे असें मी म्हणेन. आपली सर्व शक्ति समाजाला अर्पण झाली पाहिजे. गंगा मोठी नदी आहे, तिचें समर्पण मोठें असेल. नाला लहान आहे तेव्हां त्याचें समर्पण लहान असेल. याला च 'सर्वोदय' म्हणतात. सर्वोदयात सर्वांचें भलें होतें, आणि सर्वांत पतिताचा उद्धार करण्यात च सर्वांचें भलें आहे.

## विचारावर विश्वास

तुम्ही सर्वोदय-विचाराचें चांगल्या प्रकारें अध्ययन कराल अशी मला आशा आहे. तुमच्या दोन भूमिका आहेत एक विचार-प्रचारक आणि दुसरी सेवक. म्हणून या विचाराचा खूप व्यापक प्रचार तुम्हीं केला पाहिजे. भूदान समित्या आमचें हें काम करीत आहेत असा मिथ्या भास होत होता म्हणून मीं भूदान समित्या बरखास्त करून टाकल्या. आता बाबाच्या सभेला कोणी हि येऊं शकतो. बाबा समुद्र आहे. बाकीचे नदी नाले आहेत. म्हणून तुम्ही सर्वांच्या सर्व बाबाचे च सेवक आहांत, असें तो समजतो. दरिद्रनारायणाचे सेवक म्हणून घेण्यात च आपल्याला अभिमान वाटला पाहिजे. म्हणून तुम्हीं खूप विचार-प्रचार हि करावा. विचार च बाबाला फिरायला लावीत आहे. ज्याला तो पटेल त्याला तो चैन पडूं देणार नाहीं. त्याला तो धक्का देऊन उठवील. म्हणून सर्वांत ज्यास्ती माझा विचारा-

याप्रमाणें माझ्याजवळ जी म्हणून वस्तु आहे तिचा मी मालक नाहीं अशी भावना असली पाहिजे. ती वस्तु माझ्या उपयोगाकरितां मात्र आहे. समाजाला जर तिची जरूरी असेल तर मी तिच्यांतला भाग समाजाला देईन. याला मी ' दान ' म्हणतों. शंकराचार्यांनीं दानाची व्याख्या ' दानं संविभागः ' म्हणजे ' दान म्हणजे समविभाजन ' अशी केली आहे. दान म्हणजे कोणावर उपकार नाहीं. ही वस्तु माझी नाहीं, सर्वांची आहे. उपयोगाकरितां ती माझ्याजवळ आहे. कोणाला तिची ज्यास्त जरूर असेल, तर ती त्याला दिली पाहिजे. माझ्यापाशीं धान्य आहे आणि कोणा व्यक्तीला त्याची जरूरी आहे व तो काम करायला हि राजी आहे तर त्या धान्याचा त्याला हिस्सा देणें माझा धर्म आहे. प्रत्येकानें काम करणें हा त्याचा धर्म आणि खायला मागणें हा त्याचा हक्क आहे. तें देणें समाजाचें कर्तव्य आहे. याप्रमाणें च एखाद्या फॅक्टरीमधें हि अशी वृत्ति आणतां येईल. मालक आणि मजूर मिळून समाजाची सेवा करणारे होतील. तो कारखाना समाजाच्या हिताकरितां च चालविला जाईल आणि जी कांहीं बचत होईल तर ती हि समाजाला दिली जाईल. याप्रमाणें जर एखादी फॅक्टरी चालेल तर ती *औद्योगीकृत* ( industrialized ) देशांत असली तरी सर्वोदय-समाजामधें बसूं शकते.

## सृष्टीशीं संबंध असावा

दुसरी गोष्ट अशी की, प्रत्येक मनुष्याचा सृष्टीशीं संबंध राहिला पाहिजे. सृष्टीची कांहीं ना कांहीं सेवा आपल्या हातीं असली पाहिजे. आपण जर सृष्टीपासून अगदीं तुटक समाज बनवूं, तर सर्वोदयाशीं विरोध येईल. औद्योगीकृत देशांत ही गोष्ट बरीच कठीण हें खरें, *पण त्याकरितां कांहीं* योजना केली पाहिजे. फॅक्टरीमधें काम करणाऱ्याला मी तीन तास शेतावर घेऊन जाईन. तेथें तो सुंदर स्वच्छ मोकळ्या हवेंत काम करील आणि तीन तास फॅक्टरींत. एक दीड महिना शेतांत ज्यास्त काम असतें. तेव्हां फॅक्टरी बंद ठेवीन. तेव्हां ते सर्व वेळ शेतात च काम करतील. खाणींत काम करण्या-करितां हल्लीं उजेडाची सोय केली आहे पण कामगारांना तेथें आठ आठ तास बंद हवेंत काम करावें लागतें. फार झालें तर एखादा दयाळू मालक

आठच्या ऐवजीं सात तास काम करून घेईल. पण मी सांगेन कीं खाणींत दोन च तास काम करा आणि शेतांत चार तास. त्याचें शेत खाणीपासून दहा पांच मैल दूर असावें म्हणजे त्या ठिकाणीं त्याना मोकळ्या हवेंत काम करायला मिळेल. त्यांच्याकरितां चांगलीं घरें व सुरेख बागा बनवल्या जातील. सृष्टीशीं संबंध तोडून टाकून काम करणे सर्वोदयाला अनुकूल नाहीं. अशा तऱ्हेची योजना औद्योगीकृत देशांत देखील करिता येईल असें मी मानतो.

## समान वेतन

तिसरी गोष्ट सर्वोदयसमाजात शरीरश्रम आणि मानसिक श्रम यांना सारखें च महत्त्व दिलें जाईल. बुद्धीचें काम करणाऱ्याला ज्यास्त वेतन आणि हातानें काम करणाऱ्याला कमी वेतन, हा विचार च चुकीचा आहे. परिश्रम मानसिक असो, शारीरिक असो, सेवेची योग्यता पैशात होऊं शकत नाहीं. शरीरश्रमाची सेवा असो किंवा बुद्धीची सेवा असो, प्रेमाची किंमत पैशांत करितां येणार नाहीं. आदर्श समाजात राष्ट्रपतीच्या आणि सुतार किंवा भंग्याच्या पगारांत फरक असतां कामा नये. ही दूरची गोष्ट आहे. आज एकदम होणार नाहीं. परंतु हा जो विचार आहे तो सर्व देशांना लागू आहे. त्याचा अंमल कसा करावा याचा विचार करीत राहिलें पाहिजे. औद्योगीकृत देशांमधें हि हा विचार मान्य होऊं शकेल. असें हि होऊं शकेल कीं एखाद्या कारखान्याचा मालक शंभर रुपये पगार घेईल आणि तेथल्या मजुराला तो कमजोर आहे म्हणून दीडशें रुपये मिळतील. त्याला शरीरश्रम ज्यास्त करावे लागतात म्हणून दुधाशिवाय त्याचें चालणार नाहीं. सेनापति चांगला धडधाकट असला तर ५० रुपये घेईल आणि शिपाई जरा दुर्बळ असला तर त्याला ७५ रुपये मिळतील. असें हि असायला हरकत नाहीं. हा विचार जर पटला तर औद्योगीकृत देशामधें हि आपण सर्वोदय स्थापन करू शकूं.

उत्तम गवय्याला सर्वोदयसमाजात तनला म्हणून शेतात तीन तास काम दिलें जाईल. तेथें तो मोकळ्या हवेंत काम करील तर त्याचा आवाज अधिक मधुर होईल. चित्रकार, गवय्ये इत्यादिकांची योग्यता ज्यास्त आहे असें आज लोक समजतात. परंतु जे प्रामाणिकपणें देशाची सेवा करतात

त्या सर्वांची योग्यता मोठी आहे. त्यांना खाणेपिणें वगैरे जीवनाच्या सर्व सोई मिळाल्या पाहिजेत. पण आजच्याइतकें अंतर असतां उपयोगी नाहीं. ही गोष्ट जेथें उद्योगधंदे पुष्कळ आहेत अशा समाजांत आणि जेथें विशेष उद्योग नाहींत अशा समाजांत– दोन्ही ठिकाणीं हें तत्त्व आपल्याला लावतां येईल. हिंदुस्थानांत मोठमोठे कारखाने नाहींत तरी विषमता कमी नाहीं. एकाला एक रुपया मजुरी मिळते तर दुसऱ्याला शंभर. हे भेद नाहींसे करण्याशीं औद्योगीकरणाचा कांहीं संबंध नाहीं. हा स्वतंत्र विचार आहे. हा जर मान्य झाला, तर अमेरिकेमध्यें हि सर्वोदय-समाज स्थापन होईल.

दीपकाशी । मदुरा )
१-४-'५७

## ग्रामदान आणि विकास-कार्य : ४३ :

या ठिकाणीं सर्वोदय मंडळ बनलें आहे ही फार शुभ घटना आहे. ही एक लहानशी जमात आहे. या शुभकालाशीं माझा सखोल संबंध आहे असें मला दिसतें. आज सकाळीं समुद्रावर गेलों होतों. समुद्रजलाचा स्पर्श, सूर्य-नारायणाचा उदय आणि कन्याकुमारीचें स्मरण करून मीं अशी प्रतिज्ञा केली होती कीं, 'जोंपर्यंत हिंदुस्थानात ग्रामराज्याची स्थापना होणार नाहीं तोंपर्यंत ही यात्रा चालू राहील.' ही प्रतिज्ञा करण्याकरितां च या स्थानीं दोन दिवस राहण्याचें ठरविलें. त्या सकाळच्या समयीं माझ्याबरोबर कांहीं मित्र होते. इच्छा असती तर सगळ्यांना समजावून सांगून त्यांच्याकडून हि प्रतिज्ञा करविली असती. पण मीं च मात्र प्रतिज्ञा घेतली. पण प्रतिज्ञेमध्यें 'माझी' यात्रा म्हणण्याऐवजीं 'आमची' यात्रा' असे शब्द वापरले. पण तो तर माझा रिवाज च आहे. मी स्वतःला एक व्यक्ति असें मानीत नाहीं. म्हणून 'माझ्या 'ऐवजीं 'आमच्या' म्हणणें स्वभाविक च होतें. ही प्रतिज्ञा व्यक्तिगत असू शकते, पण तुम्हां सर्वांच्या मनांत हि अशी च प्रतिज्ञा असावी अशी माझी इच्छा आहे.

## ग्रामदानी गांवांच्या विकासाची जबाबदारी आमची नाहीं

ग्रामदानासाठीं आम्हांला एक गोष्ट लक्षांत ठेवावी लागेल. लोकांना वाटतें कीं, जर ग्रामदानाची प्रेरणा आम्ही देतों तर त्याच्या प्रगतीची जबाबदारी हि आमच्यावर च येते. अशानें आपण आपला विचार संकुचित करतों. शेवटीं हें समजलें पाहिजे कीं, आम्ही आमच्या शक्तीनें किती ग्रामदानें मिळवूं शकूं ? मी तर एक हि गांव माझ्या प्रयत्नांनीं मिळवलें नाहीं. इतकें च काय पण ज्या गावाजवळ आमचा आश्रम आहे, जिथें आम्हीं २०-२५ वर्षें राहिलो, तिथें हि ग्रामदानाचें वातावरण तयार होत नाहीं. पवनार, सेवाग्राम, सुरगावची गोष्ट करून राहिलों आहे मी. तिथें जर ग्रामदान झालें असतें तर माझ्या डोक्यावर अहंकाराचा बोजा पडला असता आणि त्यामुळें माझी सेवा कमी झाली असती. पण देवाच्या कृपेनें तिथें ग्रामदान झालें नाहीं. म्हणून आमच्या प्रयत्नांचें चीज होत आहे अशा प्रकारची कोणती हि भावना आमच्या मनांत येत नाहीं.

मी जेव्हां या गोष्टीचा वारंवार विचार करतों तेव्हा समजून चुकतें कीं यांत परमेश्वराचा च हात आहे. मला हिंडायची आणि बोलायची प्रेरणा आहे हें खरें पण ती प्रेरणा हि तो च देतो. शेंकडों ग्रामदानें मिळालीं तेव्हां हि मीं ती भगवंताची कृपा च मानली. मी तर केवळ निमित्तमात्र आहे. याकरितां त्या गांवांचें पुढें काय होईल याची चिंता आम्हांला करायची नाहीं. ज्यानें हें घडवून आणलें त्याला च त्याची चिंता आहे. त्या गांवांची आमच्याकडून सेवा होईल तेवढी आम्ही करूं हि, पण आमच्या शक्ती-पुरती जर तिला मर्यादा घातली तर काम हि मर्यादित होईल. आपण ५-२५ लोक आहोंत. खूप झालें तर पन्नास एक गांवें घेऊन बसूं शकूं. पण आमच्या शक्तीनें आंदोलनाला मर्यादा पडणार नाहीं इकडे आपण लक्ष दिलें पाहिजे. गावांचा विकास गावकऱ्यांवर सोंपविला जावा. आपल्या हातून जेवढें होऊं शकतें तेवढें दुसऱ्यांना करायला लावलें पाहिजे. आम्हांला फार गोष्टी करायच्या आहेत. काम करणाऱ्या जितक्या Agencies उभ्या होतील तितक्या उभ्या करायच्या. मात्र आम्ही स्वतः च एक agency

बनावयाचें नाहीं असें माझें म्हणणें आहे. विचारामध्यें मतभेद असूं शकतो तरी हि जे लोक काम करूं इच्छितात त्याच्यावर तें सोंपवून द्यावें.

कोरापुटमध्यें जें काम चालू आहे तिथें फक्त २००-२५० गांवांत च आमचे लोक पोंचले आहेत. आता वर्ष-दोन वर्षें झाली. उरलेल्या १२०० गांवांत आमचे लोक कधीं पोंचणार आणि अशा तऱ्हेनें हजारों गांवांत काम कसें होणार ? तिथें एका नमुन्यानुसार काम चाललें आहे. आम्ही सर्व सर्वोदय मानणारे आहोंत. असें असून हि प्रत्येकाच्या योजनेंत प्रत्येकाला दोष हा दिसणार च कारण काम व्यापक स्वरूपाचें आहे. म्हणून थोडा-फार फरक रहाणार च. मथितार्थ हा कीं आपण निर्माणकार्यांत जास्त आग्रह ठेवूं नये. गांवाची शक्ति वाढली पाहिजे ही मुख्य गोष्ट आहे. दुसऱ्या गांवातील लोक हि त्याचें अनुकरण करूं शकतील असें काम केलें पाहिजे. आम्हीं एक नैतिक संघटना उभी केली आहे. ती सत्ता देईल आणि तिच्यातर्फे कोणी हि काम पाहील. आतां प्रश्न हा आहे कीं, योजना कोणाची राहील ? अंमल कोणाचा चालेल ? कम्युनिटी प्रोजेक्टवाल्याना द्यावी तर हजारों गावांचा प्रश्न निर्माण झाल्यावर ते हि घाबरून जातील. हें काम च शक्तिशाली आहे. आता कोणती शक्ति हें काम करील ? ग्रामशक्ति च तें करूं शकेल. तिचा च आधार आपण घ्यावयाचा आहे.

हें मी अशासाठीं सांगून राहिलो आहे कीं इथे तामिळनाडमध्यें परमेश्वराच्या कृपेनें सरकार, रचनात्मक कार्यकर्ते आणि दुसरे हि लोक जे या कार्यांत रस घेतात ते एकमेकांजवळ आले आहेत. जोंपर्यंत सबंध हिंदुस्थानांतील सारीं गावें ग्रामदानी होणार नाहींत तोंपर्यंत कांहीं माझें समाधान होणार नाहीं. म्हणून आपण या गोष्टीचा विचार करावा. मी गेल्यानंतर हि काम चालू ठेवावें आणि सर्वांनीं मिळून ग्रामराज्याचें काम मोठ्या प्रमाणावर करावें.

### ग्रामदान आयोजन नाहीं विचार आहे

ग्रामराज्याची माझी कल्पना वेगळी आहे. ग्रामराज्य म्हणजे कांहीं योजना नव्हे. माझी कल्पना कल्याणकारी गावाची नाहीं सर्वांना चांगलें

आणि पोटभर अन्न मिळावें, कपडा मिळावा, एवढी च माझी कल्पना नाहीं. अन्नाशिवाय कोणी राहूं शकत नाहीं हें प्रत्येकाला माहीत च आहे; मग माझें काम काय? ग्रामराज्य झालेल्या गावांतील सर्व लोकांनीं मिळून सुख आणि दुःख भोगण्याची ही योजना आहे. खातील तर मिळून खातील, कोणाला उपास पडला तर सर्वजण उपाशी राहातील, हें माझें म्हणणें समजून घेतलें पाहिजे. अमेरिकेंत खायला-प्यायला खूप आहे म्हणून काय तिथें 'सर्वोदय' आहे? सगळ्यांना खायला-प्यायला मिळणें म्हणजे सर्वोदय नव्हे. कोणाला खायला नाहीं मिळालें तर भूतदया म्हणेल त्याला खायला मिळावें; पण शेवटीं उत्पादन वाढेल तेव्हा च ना पोटभर खायला मिळेल? आणि उत्पादनाचा आधार ईश्वर च आहे कीं नाहीं? पाऊस पडला तर पीक येणार. मला असें सांगितलें गेलें कीं, या भागांत गेले ५–६ वर्षांत पाऊस नाहीं, आणि गांवांतील लोक दुःखी आहेत, तरी एकत्र आहेत. आम्हांला ही कम्यूनची भावना वाढवावयाची आहे. गांवाचें उत्पादन वाढावें यासाठीं जरूर प्रयत्न केला पाहिजे पण उत्पादन वाढलें एवढ्यानें आम्हांला समाधान नाहीं. हृदय व्यापक बनलें पाहिजे ही गोष्ट जोंपर्यंत साध्य होत नाहीं तोंपर्यंत प्रयत्न चालू ठेवले पाहिजेत.

काळाची च ही मागणी आहे; म्हणून मीं ती प्रतिज्ञा केली. दोन-चार गावें घेऊन त्याच्या विकासकार्यासाठीं बसून राहिलों तर काम होणार नाहीं. सरकारचें काम मोठ्या प्रमाणावर चालतें. सरकारची इच्छा असल्यास तें चुकीचा विचारसुद्धा पसरवूं शकतें. अशा वेळीं आपण छोट्या विचारांत अडकलों तर आमचा छोटा विचार बुडून जाईल; म्हणून आपण व्यापक काम केलें पाहिजे, सर्वोदयाचें वातावरण तयार केलें पाहिजे, म्हणजे कल्याण-कारी राज्य, कम्युनिझम वगैरेंचें जें वातावरण आहे तें टिकणार नाहीं.

हिंदुस्थानांतील सर्व गांववाल्यांना चांगलें खायला मिळावें एवढा च माझ्या प्रतिज्ञेचा अर्थ नाहीं. चांगलें जेवण मिळावें; हें तर सर्वच म्हणतात; पण कोणी हि व्यक्तिगत स्वार्थानें वागूं नये हें आम्हाला पाहिजे आहे, आणि सामुदायिक जीवनासाठीं लोकांना प्रवृत्त करावयाचें आहे; म्हणून

ज्यांच्याकडे जमीन आहे अशानींच केवळ दानपत्रें भरलेलीं मला नको आहेत. मीं तर भूमिहीनाकडून हि दानपत्र मागतों. आमच्याजवळ जी श्रमशक्ति आहे ती समाजासाठीं समर्पित आहे असें त्यांनीं म्हणावें. सर्वांच्याजवळ देण्यालायक कांहींतरी असतें च; तेव्हां आपल्याजवळ जें कांहीं आहे तें समाजाला अर्पण करण्याची भावना याचें च नांव ग्रामराज्य.

कन्याकुमारी ( मद्रास )
१५–४–'५७.

## केरळमध्यें जमिनीची मालकी नाहींशी व्हावी :: ४४ ::

आज आम्ही एका प्रेमराज्यांतून दुसऱ्या प्रेमराज्यांत प्रवेश करीत आहोंत. ज्या प्रदेशांतून आम्ही आलों त्या प्रदेशावर माणिक्यवाचकर, नम्मल्वार आणि रामानुज यांचें राज्य चालतें. आता आम्ही ज्या प्रदेशांत शिरत आहोंत त्या प्रदेशावर राज्य आहे येशू खिस्त आणि शंकराचार्यांचें ! मला त्याच्यांत कोणता च फरक दिसत नाहीं. येशू खिस्तानें शिकवलें— आपल्या स्वतःवर जितकें प्रेम करतां तितकें च आपल्या शेजाऱ्यावर हि करा. म्हणून येथील पाद्री लोकांनीं या कार्याला आपलें मानलें याबद्दल मला आश्चर्य वाटलें नाहीं. जर त्यांनीं तसें नसतें केलें तर च आश्चर्याची गोष्ट होती. कारण या कार्याला न मानणें येशूला न मानण्यासारखें च आहे.

### शंकराचार्यांचें एक पाऊल पुढें

शंकराचार्यांनीं एक पाऊल पुढें जाऊन अभेद शिकविला. जिथें अभेद शब्द येतो तिथें सर्व प्रकारची मालकी गळून पडते. शंकराचार्यांनीं याचें स्पष्ट विवरण केलें आहे. ' कस्य स्विद् धनम् ' धन कोणाचें आहे ? मालकी कोणाची ? कोणाची नाहीं. माझ्या समजुतीप्रमाणें मालकी नाहींशी करण्याचा याहून स्पष्ट आदेश मिळणार नाहीं. अशा महान् पुरुषाच्या राज्यांत आज आम्ही प्रवेश करीत आहोंत.

आज १८ एप्रिल आहे. हें आंदोलन सुरू झाल्याला बरोबर सहा वर्षे झालीं. तुम्हीं आणि आम्हीं सर्वांनीं मिळून प्रयत्न केला तर केरळ प्रदेशांत सगळ्यांनीं जमिनीची मालकी प्रेमानें सोडली असें सर्वोदय-संमेलनांत जाहीर करतां येईल.

परसाला (त्रिवेन्द्रम्)
१८–४–'५७

## स्वामित्वविसर्जनांत कोणता हि दोष नाहीं : ४५ :

जेव्हां आम्ही जमिनीची मालकी सोडून द्या असें म्हणतों तेव्हां त्यावर अनेक आक्षेप घेतले जातात. आम्ही समाजाची मालकी मानली तर व्यक्तीचें महत्त्व कमी होईल, त्यामुळें उत्पादन कमी होईल इत्यादि. पण आज एक नवा आक्षेप घेण्यांत आला—धर्मवाले खाजगी मालकी पवित्र मानतात. ही गोष्ट विचार करण्यालायक आहे माझें मन मोकळें आहे. जर मला असें दिसलें कीं मी जो विचार समजलों आहें त्यांत चूक आहे तर मी तो विचार त्या क्षणीं सोडून देण्यास तयार आहें. मला या विचाराविषयीं आसक्ति नाहीं. परंतु आजवर जितके आक्षेप घेण्यांत आले त्यांपैकीं कोणता हि माझ्या मनावर परिणाम करूं शकला नाहीं. उत्पादन कमी होईल इत्यादि जे आर्थिक आक्षेप घेण्यांत आले आहेत त्यांत मला कांहीं च राम वाटत नाहीं. या विज्ञानयुगांत जितकें परस्परसहकार्य वाढेल तितकें उत्पादन वाढलें पाहिजे. मालकी नष्ट झाल्यावर हि जर गांववाल्यांना वाटलें कीं, प्रत्येक कुटुंबाला जमीन वाटावी तर ते देऊं शकतात. मालकीचें विष नाहींसें झाल्यावर नंतरची योजना गांवांतील सर्व लोक मिळून सहज करूं शकतात.

## मालकी नाहींशी झाल्यानें व्यक्तीचें महत्त्व वाढेल

मालकी नाहींशी झाल्यावर व्यक्तीचें महत्त्व कमी होईल या आरोपाचा विचार केला पाहिजे. जर जबरदस्तीनें मालकी नाहींशी झाली तर व्यक्तीचें महत्त्व निश्चितपणें कमी होईल. चांगली गोष्ट हि जबरदस्तीनें केली तरी तिचा वाईट परिणाम दिसून येतो. परंतु जर मनुष्य समजून उमजून प्रेमानें मालकी हक्क सोडत असेल तर त्याची उन्नति च व्हावयास हवी. काल कांहीं पाद्री मला भेटण्यास आले होते. त्यांच्या छातीवर क्रॉस लटकवलेला होता. मीं त्यांना सांगितलें, "व्यक्तीचें महत्त्व वाढावें असें तुम्हीं काय केलें आहे ? जर व्यक्तीचें महत्त्व वाढवावयाचें असेल तर प्रत्येक व्यक्तीनें क्रॉस उचलला पाहिजे. छातीवर मालकी चिकटवून कांहीं उपयोग होणार नाहीं छातीवर पैशांची पिशवी बांधली तर मनुष्याचें महत्त्व कमी होईल आणि पैशाचें महत्त्व वाढेल. पैसा आणि इतर भौतिक गोष्टी यांचें महत्त्व आज वाढलेलें आहे. पण नेमकें यामुळें च महत्त्व कमी होतें. मालकी सोडून क्रॉस घ्यायला जी व्यक्ति तयार आहे त्या व्यक्तीचें महत्त्व खूप च वाढेल.

## समाज विरुद्ध व्यक्ति असा झगडा व्यर्थ

जर माझा हात सान्या शरीराची सेवा करील तर त्या हाताचें महत्त्व वाढेल. पण पायांत काटा बोचला असून हि जर हात म्हणायला लागला मी उंच आहे म्हणून मी वेगळा राहू इच्छितों, पायाला शिवणार नाहीं, तर त्याचें महत्त्व कमी होईल. आज हाताला जास्त महत्त्व आहे कारण तो पायाची आणि सर्व अवयवांची सेवा करतो. जर तो केवळ डोक्याची सेवा करायला तयार असला आणि पायाची करायला तयार नसला तर त्याचें महत्त्व कमी होईल. शरीराचे कांहीं अवयव आपल्याला उच्च समजतील आणि कांहीं नीच समजतील तर कसें होईल ? तसें च व्यक्तीचें महत्त्व वाढविण्यासाठीं मालकीला चिकटून राहून चालणार नाहीं. याउलट मालकी माझी नाहीं, समाजाची आहे, मी सेवक आहें, असें व्यक्ति जर मानूं लागेल तर तिचें महत्त्व वाढेल.

समाजशास्त्रज्ञांनीं व्यक्ति विरुद्ध समाज आणि समाज विरुद्ध व्यक्ति असे निष्कारण झगडे निर्माण केले आहेत. व्यक्ति म्हणजे समाजरूपी हाताचीं बोटें आहेत. दोन्हींचा विरोध नसून दोन्ही गोष्टी एक च आहेत. साम्यवादाचें म्हणणें आहे कीं व्यक्तीला महत्त्व नसून समाजाला आहे. हा दुसरा एकांगी विचार झाला. एका च गोष्टीचीं हीं दोन नावें आहेत. समाज अनेक व्यक्ती मिळून बनतो. जर सर्व व्यक्ती अलग अलग केल्या तर समाज च बनणार नाहीं. त्याप्रमाणें झाडाच्या फांद्या झाडाला लागून असतात, अंगभूत असतात, म्हणून त्यांत ताजेपणा असतो, फांदी कापून वेगळी ठेवली तर सुकून जाईल. त्याप्रमाणें एकटी व्यक्ति अलग राहिली तर ती सुकून जाईल. म्हणून व्यक्ति आणि समाज यांच्यात झगडा मानणें व्यर्थ आहे.

## सद्विचाराचें उगमस्थान व्यक्ति

मी व्यक्तीचें महत्त्व मान्य करतों. कोणता हि सद्विचार व्यक्तीच्या डोक्यांत च निर्माण होतो आणि तेथून त्याचा समाजांत फैलाव होतो. प्रत्येक ठिकाणीं ही गोष्ट दिसून आली आहे. भूदानयज्ञाचें उदाहरण घ्या. हा विचार हि प्रथम एका माणसाला सुचला आणि त्याच्या द्वारें तो समाजांत पसरला. खिस्तॅनिटीचा विचार प्रथम येशूला सुचला आणि इस्लामचा प्रथम पैगम्बराला. मार्क्सला प्रथम कोण मानत होतें? त्यानें ग्रंथ लिहून आपल्या विचारांचा प्रसार केला. सद्विचाराचें उगमस्थान व्यक्ति च असूं शकते. याकरितां आम्ही व्यक्तीचें महत्त्व कमी लेखीत नाहीं. सर्वोदयांत व्यक्तीला अत्यंत प्रतिष्ठा आहे. प्रत्येक व्यक्तीला कांहीं स्थान आहे. आम्ही कोणाला हि लहान समजत नाहीं. परंतु आजकाल बहुमत, अल्पमत असा वाद उत्पन्न झाला आहे. 'जास्तींत जास्त लोकांचें जास्तींत जास्त कल्याण' या तत्त्वज्ञानातून हा वाद निर्माण झाला आहे; त्यासाठीं कांहीं लोकांचें अहित झालें तरी हरकत नाहीं. खरें पाहिलें तर हा चुकीचा विचार आहे. सर्वोदय असें मानत नाहीं. सर्वोदयाला प्रत्येकाचें हित अभिप्रेत आहे. सर्वोदय म्हणतो कीं कोणाच्या हि खऱ्या हिताचा कोणाच्या हि खऱ्या हिताशीं विरोध नसतो. हितामध्यें विरोध असतो असें मानणें मुळांतच चूक आहे. माझें आरोग्य सुधारावें यात तुमचें कांहीं च नुकसान नाहीं. उलट मला रोग

झाला तर तुम्हांला हि तो होण्याची शक्यता आहे. खरें हित परस्पर-विरोधी असूं च शकत नाहीं. म्हणून सर्वोदय समाजांतून अलग राहिलेल्या व्यक्तीच्या हिताकडे हि पाहील. समाजाच्या हितासाठीं व्यक्तीचें अहित आम्हांला अमान्य आहे.

## समर्पणांत प्रतिष्ठा

सर्वांचें समान हित साधावें हा सर्वोदयाचा विचार आहे. यासाठीं या विचारांत व्यक्तींची जास्तींत जास्त प्रतिष्ठा आहे. परंतु व्यक्तीची प्रतिष्ठा कशी वाढेल याचा विचार केला पाहिजे. माणूस मालकी आणि संपत्तीला चिकटून राहिला तर त्याची प्रतिष्ठा वाढेल, का त्यानें आपलें सारें कांहीं समाजाच्या सेवेसाठीं अर्पण केलें तर वाढेल, यांत जास्त विचार करण्याची काय जरूरी ? घरांत काय होतें ? आई, बाप, मुलांनी जर आपली मिळकत वेगळी ठेवली तर घरांत सुख नांदेल का ? यामध्ये त्यांची प्रतिष्ठा वाढणार का ? जर आई आपली संपत्ति मुलाला देण्याला तयार नसली तर आईची प्रतिष्ठा वाढणार का ? जेव्हां आई आपल्या मुलाला सर्वस्व देते तेव्हां च तिची प्रतिष्ठा वाढते. आज आईचा गौरव तिला property चा हक्क आहे म्हणून कांहीं केला जात नाहीं. कायद्यानें आईला तुम्ही लाख अधिकार द्या पण तिची प्रतिष्ठा ती आपल्या कुटुंबासाठीं सर्वस्व वेंचते म्हणून च आहे. कायदा म्हणूं शकतो कीं ईस्टेटीवर आईचा इतका अधिकार आहे, बापाचा इतका आहे आणि लहान मुलांचा कांहीं च नाहीं. पण आईबापाच्या हृदयाचा कायदा हें च म्हणणार कीं त्यांची जी कांहीं मिळकत आहे ती सर्वच्या सर्व मुलाची च आहे. कुटुंबात आईची प्रतिष्ठा याकरिता आहे. व्यक्तीची प्रतिष्ठा कुटुंबासाठीं सर्वस्व समर्पण करण्यात आहे. तद्वत् च समाजा-साठीं सर्वस्व समर्पण करण्यांत च व्यक्तीची प्रतिष्ठा आहे. म्हणून प्रेमानें आणि बुद्धिपूर्वक व्यक्ति समाजहितासाठीं आपली मालकी सोडेल तर त्यात तिची प्रतिष्ठा कमी व्हायचें काहीं च कारण नाहीं.

## त्यागाला धर्म विरोध करूं शकत नाहीं

कांहीं लोक म्हणतात कीं, रोमन कॅथॉलिक व्यक्तिगत मालकी पवित्र

मानतात. मला असें वाटतें कीं, त्यांनीं असें मानणें अज्ञानाचें लक्षण आहे. ते प्रायव्हेट प्रॉपर्टीचा अर्थ काय करतात हें पाहिलें पाहिजे. जर प्रत्येकाची खाजगी मालमत्ता मानली तर कुटुंबाचा नाश होईल, आणि आपण तर कुटुंबाच्या विच्छेदाची नाहीं तर विस्ताराची भाषा बोलून राहिलों आहोंत, कुटुंब व्यापक करायची गोष्ट बोलून राहिलों आहोत. आम्ही म्हणतों, साऱ्या गांवाचा एक परिवार बनवा, त्याच्या आंत आपलें छोटें कुटुंब आनंदानें राहील. सेवा करायची ती गांवाची करायची. त्यांत आपल्या कुटुंबाची तर येऊन च जाते. आपण समाजाची सेवा करणार आणि समाज आमची करणार. बाप मुलाची सेवा करणार आणि मुलगा बापाची. अशानें च जीवनात आनंद निर्माण होईल.

सर्वांनीं स्वावलंबी व्हावें, दुसऱ्याची सेवा करूं नये, हा स्वावलंबनाचा विचार नाहीं. निष्कारण दुसऱ्याची सेवा न घेणें हा स्वावलंबनाचा विचार आहे. मीं परवां पाहिलें कीं, एक माणूस घोड्याप्रमाणें रिक्षा ओढत होता. रिक्षेंत एक माणूस बसला होता. माणसानें माणसाला ओढणें ही कांहीं शोभादायक गोष्ट नव्हे; पण बिचारा मनुष्य लाचार होऊन हें करतो. दुसऱ्याच्या अशा सेवेचा स्वीकार करणें असभ्यपणा आहे; तरी हि आज तें चाललें आहे याच्या विरोधी आमची भावना तयार झाली पाहिजे. उगीच च दुसऱ्यांकडून सेवा घेणें, दुसऱ्यावर भार देणें, चूक आहे; परंतु दुसऱ्यांच्या सेवेसाठीं तयार नसणें स्वावलंबनाच्या भावनेविरुद्ध आहे. मीं दुःखी लोकांची सेवा करणार नाहीं, कारण मी स्वावलंबनाचा पुरस्कर्ता आहे, असें म्हणून चालणार नाहीं. आम्ही कुटुंबाचा विच्छेद इच्छीत नाहीं, तर कुटुंबाच्या योगानें साऱ्या समाजाची सेवा करूं इच्छितो. कुटुंबाची सारी शक्ति समाजाला अर्पित करायची आहे. कुटुंब व्यापक करून त्यांत व्यक्तिगत मालकीचें विसर्जन केलें पाहिजे. नदी समुद्रांत विलीन झाल्यामुळे लहान न होतां मोठी च बनते.

रोमन कॅथॉलिक चर्च याला विरोध कां करतें ते माझ्या लक्षांत येत नाहीं. येशूनें काय सांगितलें तें त्याच्या एका विख्यात गोष्टीवरून समजण्या-सारखें आहे. एक माणूस शिष्य बनण्यासाठीं येशूजवळ आला आणि

म्हणाला, 'मला बोध करा.' जेव्हां येशूनें चार गोष्टी सांगितल्या तेव्हां तो म्हणाला, 'या गोष्टी तर मी अंमलांत आणतों. मला कांहीं विशेष ज्ञान द्या.' तेव्हां येशू म्हणाला, 'तुझ्याजवळ जी संपत्ति आहे ती गरिबांना वांटून टाक आणि सगळें सोडून माझ्याकडे ये.' याचा अर्थ काय? प्रायव्हेट प्रॉपर्टी पवित्र आहे असा का याचा अर्थ? जास्तींत जास्त याचा अर्थ असा लावतां येईल की, मी तुमच्या प्रॉपर्टीवर आक्रमण करूं नये. तें मला मान्य आहे. पण आपली प्रॉपर्टी समाजासाठीं सोडून द्यावी याला हरकत काय? यासाठीं बायबल वाचायची आवश्यकता नाहीं. कोणता हि धर्म स्वेच्छापूर्वक केलेल्या त्यागाच्या विरुद्ध जाऊं शकत नाहीं. मनुष्य जर स्वामित्वविसर्जन करीत असेल तर त्याच्या मार्गांत कोणता हि धर्म किंवा चर्च आड येऊं शकत नाहीं. तरी हि या बाबतींत माझें मन मोकळें आहे. कोणी समजावल्यास मी माझी चूक सुधारण्यास तयार आहें.

मीं माझें च उदाहरण देतों. मीं माझी सारी व्यक्तिगत संपत्ति सोडली म्हणजे कांहीं अधर्म केला नाहीं आणि लोक हि तसें समजत नाहींत. पण मीं जर कोणाची प्रॉपर्टी हिरावून वांटण्याचें काम केलें तर तें चूक ठरेल. परंतु ही गोष्ट हि विचार करण्यालायक आहे. समजा, समाजांतील कोणा व्यक्तीनें अवास्तव संग्रह केला आहे आणि सारा समाज भुकी आहे तर अशा परिस्थितींत समाजाच्या हितासाठीं त्या व्यक्तीच्या प्रॉपर्टीचा भाग घ्यायचा समाजाला अधिकार आहे. जरी समाजाला हा हक्क असला तरी त्या व्यक्तीसाठीं कांहींना कांहीं ठेवलें पाहिजे. अशा तऱ्हेनें व्यक्तीला परिग्रहापासून मुक्त करणें समाजाला भाग पडलें तर एका मर्यादेपर्यंत तें मान्य करावें लागेल.

### प्राथमिक सिद्धान्त – अस्तेय व अपरिग्रह

सारांश, मीं आज दोन गोष्टी सांगितल्या. (१) आम्ही कोणाची खाजगी मालमत्ता हिरावून घेणें दुष्कृत्य तर ती वाईट गोष्ट ठरेल. परंतु कोणी आपणहून खाजगी मालमत्तेवरचा हक्क सोडीत असेल तर तें योग्य च आहे आणि कोणी प्रेमानें सोडण्याविषयीं समजावत असेल तर तें हि ठीक आहे.

(२) जिथें अत्यंत दरिद्री समाजांत कोणी जादा संग्रह करत असेल तर त्याला त्या अधिक संग्रहांतून मुक्त करण्याचा अधिकार जनतेला आहे. याचें च नांव अपरिग्रह आणि अस्तेय. अपरिग्रह म्हणजे जादा संग्रह न करणें आणि अस्तेय म्हणजे चोरी न करणें. हे दोन्ही मिळून धर्म पुरा होतो. आज आपण चोरी अधर्म समजतो. हें तर बरोबर आहे. पण फाजील संग्रहाला अधर्म समजत नाहीं हें चूक आहे. एकीकडून संग्रह म्हणजे दुसरीकडून चोरी हें निश्चित आहे हें समजलें पाहिजे. यासाठीं केवळ चोरीला पाप मानणें एकांगी नीति आहे. जेव्हां आपण संग्रह आणि चोरी दोन्ही हि पाप समजूं तेव्हां नीति पूर्ण होईल.

हें मुद्दां येशू ख्रिस्तानें च सांगितलें आहे. मी कांहीं नवी गोष्ट नाहीं बोलून राहिलों! येशूचें एक वाक्य इतकें कडक आहे कीं, त्याहून कम्युनिस्ट तें काय बोलणार? सुईच्या नेढ्यांतून हि एक वेळ उंट जाईल पण श्रीमंत माणसाला परमेश्वराच्या राज्यांत कधीं प्रवेश मिळणार नाहीं. माझ्या समजुतीप्रमाणें याहून अधिक स्पष्ट दुसरा कोणी क्वचित् च बोलला असेल. यामध्यें परिग्रहाचा स्पष्ट निषेध आहे. चोरीचा निषेध आहे च. चोरी करूं नये ही सामान्य गोष्ट आहे. सगळ्या धर्मांनीं ती मानली आहे. परंतु चोरीचें मूळ संग्रह आहे. तो कायम ठेवून चोरी संपणार नाहीं ही विशेष गोष्ट आहे.

## चोरी कीं अपरिग्रह?

म्हणून कम्युनिस्टांनीं एक धर्म तयार केला आहे. अपहर्त्यांचें अपहरण! मी म्हणतों, 'अपहरण करणाऱ्यांचें अपहरण करण्याची काय जरूरी? अपरिग्रह पाळा'. ते म्हणतात, 'तुम्ही अपरिग्रहाच्या गोष्टी बोलतां पण कोण अपरिग्रह पाळीत आहे? तुमचे मोठे मोठे धार्मिक लोक तर परिग्रही आहेत.' लोक खूप संग्रह करतील आणि मूठभर दान देऊन बाबाला फसवितील. अशा रीतीनें ते आपला संचय तर कायम ठेवतील च आणि पुण्य हि प्राप्त करतील. संग्रहानें या लोकांत काम होतें आणि दानानें दुसऱ्या लोकांची व्यवस्था करतां येते. या टीकेला कांहीं अर्थ आहे आणि अशा

तन्हेची टीका करायचा त्यांना अधिकार हि आहे. जी गोष्ट आम्हीं करायला पाहिजे, ती केली नाहीं आणि चुकीची केली तर कार्य-कारण-प्रक्रियेनुसार परिणाम होईल. मग आम्हीं काय करणार? आम्हीं जर चुकीचें काम केलें तर परिणाम हि चुकीचा होणार. जर आपण संग्रह कायम राखत असलों तर परिणाम कोणत्या ना कोणत्या चोरीच्या स्वरूपांत होणार. आपण मामुली चोरी कबूल करीत नसाल तर शास्त्रीय चोरी कबूल करा. शास्त्रीय चोरी म्हणजे कायद्याद्वारें लुबाडणें. सामान्य चोरी कबूल करायला तर कोणी च तयार नाहीं; मग आपल्याजवळ रहातें काय ? कायदेशीर चोरी किंवा अपरिग्रह. या दोहोंतून तिसरी गोष्ट रहात नाहीं. बाबा लोकांना सांगतो कीं, तुम्ही अपरिग्रह शिका. आपली वैयक्तिक मालकी समाजाला अर्पण करा. यांतून फार मोठी आध्यात्मिक शक्ति प्रकट होईल दुनियेंत कारुण्याचें दर्शन होईल; सान्या धर्मांचें तेज वाढेल; आस्तिक्यबुद्धि हि वाढीला लागेल. तरी हि धार्मिक लोक म्हणाले कीं, वैयक्तिक मालकी पवित्र आहे तर काय म्हणणार ? आमचें त्यांना सांगणें आहे कीं, तुम्ही जरा धर्मांचा खोल विचार करा.

## त्यागांतून सर्वोत्तम भोग

या विज्ञानयुगांत परस्परसंबंध वाढीस लागले आहेत. मनुष्य एकमेकापासून फार अलग राहूं शकत नाहीं. देशांच्या सीमा तुटून पडत आहेत. राष्ट्रवाद हि आंतरराष्ट्रीय वादाला जागा देत आहे. जिथें बुद्धीचा व्यापक प्रसार होत आहे अशा ठिकाणीं व्यक्तिगत मालकीला चिकटून चालणार नाहीं. यासाठीं आम्ही प्रेम, आनंद आणि उत्साह यांनीं व्यापक बनण्याची तयारी केली पाहिजे. जितक्या अधिक त्यागाला आपण तयार होऊं तितका अधिक भोग मिळेल.

ईशावास्य उपनिषदांत एक सुन्दर वचन आहे ' त्यक्तेन भुंजीथाः। ' त्याग करून भोगा. आपण त्याग करण्यात जर मागें पुढें पाहूं लागलों तर भोग साधणार नाहीं. तुम्हीं घरांत अत्युत्कृष्ट बीं ठेवलें आहे, गरीब शेतकरी आहात, खायला भाकरी मिळत नाहीं तरी हि तें सुंदर बियाणें तुम्ही खात

नाहीं. जरूर पडली तर उपास कराल किंवा भाज्या वगैरे खाल. तुम्हीं तें त्यागासाठीं ठेवलें आहे म्हणून तुम्ही तें खात नाहीं. तें बीं शेतांत पेरण्यासाठीं ठेवलें आहे. अशा रीतीनें इतक्या त्यागपूर्वक तें बीं पेरलें म्हणजे खाण्यासाठीं उत्तम पीक येईल. तें चांगलें बीं तुम्ही खाल तर पुढें पीक मिळणार नाहीं.

याप्रमाणें भोगाचें सर्वोत्तम साधन त्याग आहे. जर समाज त्यागपरायण बनला तर त्याचा भोग सर्वांगसुंदर साधेल. नाहीं तर कांहीं लोक उपभोगत रहातील आणि दुसरे लोक क्षीण होत जातील. दोघे मिळून दुःखी च होतील. खाणाऱ्याला पण सुख मिळणार नाहीं. शेजारी कोणी ओरडत असला तर खाण्यांत सुख आहे का? म्हणून समाजाला सर्वांगसुंदर भोग साधावयाचा असेल तर व्यक्तीला त्यागाची शिकवण मिळेल तेव्हां च तो साधेल. मी त्याग शिकवून तुम्हांला संन्यासी बनवूं इच्छीत नाहीं तर उत्तम भोगी बनवूं इच्छितों. उत्तम भोग पाहिजे असेल तर तो त्यागाच्या मार्गानें च मिळेल. घरोघरीं स्त्रिया मुलांसाठीं त्याग करत आहेत म्हणून कुटुंबांत आनंद दिसतो. जें आपण घरांत करीत आहांत तें च गांवासाठीं करा एवढें च माझें सांगणें आहे.

कल्लरा ( कोट्टायम )
३–५–'५७

या गांवां मीं दुसऱ्यांदा येत आहें. बत्तीस वर्षांपूर्वी येथें सत्याग्रह चालला होता तेव्हां आलों होतों. तो सत्याग्रह मंदिरप्रवेशासाठीं चालला होता. हरिजनाना मंदिर प्रवेश मना होता. इतकें च काय पण मंदिराच्या बाजूनें जाणाऱ्या रस्त्यावर हि त्यांना येऊं दिलें जात नव्हतें. यासाठीं तो सत्याग्रह सुरू झाला आणि खूप दिवस चालला हि. त्याचा परिणाम होत आहे असें दिसलें नाहीं. तेव्हां मी वर्ध्याच्या आश्रमांत होतों आणि बापू साबरमतीच्या. त्यांनीं मला आदेश दिला कीं, हा सत्याग्रह कसा चालला आहे तें मीं पाहावें. माझ्याकडून दोन अपेक्षा होत्या. एक तर विद्वान् सनातनी लोकांशीं चर्चा करून कांहीं होत असले तर तशी खटपट करावी, आणि सत्याग्रहाच्या पद्धतींत कांहीं सुधारणा सुचवतां येण्यासारखी असली तर ती सुचवावी. मला ज्ञान नाहीं आणि तेव्हां तर अनुभव हि नव्हता. तरी हि बापूंची माझ्यावर श्रद्धा होती, आणि मी हि श्रद्धापूर्वक हिंमत ठेवून येथें आलों. जागोजाग पंडितांशीं खूप चर्चा झाली. ते लोक तर संस्कृतमध्ये च बोलणें पसत करत होते, दुसरी भाषा च बोलत नव्हते. वास्तव मीं हि संस्कृत बोलायचा च प्रयत्न करीत होतों. तरीसुद्धा त्यांच्या हृदयांत मी कोणतें च परिवर्तन घडवून आणण्यास असमर्थ ठरलों. मुख्य प्रश्न होता सत्याग्रहाच्या पद्धतींत कांहीं बदल घडवण्याचा. शुद्ध दृष्टीनें जर सत्याग्रह चालला तर त्याचा परिणाम होणार च. त्या वेळेस मीं कांहीं सूचना केल्या आणि बापूंना हि त्याबद्दल कांहीं सांगितलें. तदनंतर बापू स्वतः च येथें आले आणि पुढें हा प्रश्न सुटला.

### सनातन्यांची संकुचितता

हरिजनांना देवालयात प्रवेश मिळाल्यानें देवाचें तर कधीं च बिघडलें नाहीं. पण आमच्यांत मात्र बरीच सुधारणा झाली. आश्चर्याची गोष्ट आहे. येथें मुसलमानांचे आक्रमण झालें, ख्रिस्ती आक्रमण झालें, दोन्ही संप्रदाय

वाढून राहिले; तरी हि येथील सनातन्यांना बुद्धि सुचली नाहीं. याशिवाय शंकराचार्यांचा अद्वैत सिद्धान्त येथून च निघाला. रामानुज हि येथे प्रचार करून गेले. या सगळ्यांचा कांहीं हि परिणाम न होता संकुचित बुद्धि कायम राहिली. सत्याग्रहाच्या प्रयोगानें च त्यांच्या बुद्धीचे पडदे कांहींसे उघडले. हरिजनांना मंदिरांत येऊं न देण्यात न्याय आहे असें आज कोणी च म्हणत नाहीं. मीं त्या वेळेस ब्राह्मणांना समजावण्याचा खूप प्रयत्न केला. त्यांना सांगितलें, "आपण '*वर्णानां ब्राह्मणो गुरुः*' म्हणवितां आणि शिष्यांना च जवळ येऊं देत नाहीं, असले कसले गुरु?" याचा परिणाम असा झाला कीं, सनातन धर्माला उतरती कळा लागली आणि समानता शिकविण्यांत इस्लाम आणि खिश्चन धर्मप्रचाराची मदत झाली. आज या प्रदेशांत एकतृतीयांश खिस्ती आहेत यावरून हिंदूंनीं बोध घ्यावयास हवा.

**सत्याग्रहाचें शिक्षण आवश्यक**

वायकम् एक मोठें तीर्थक्षेत्र बनून गेलें आहे. येथील सत्याग्रहामुळें साऱ्या हिंदुस्थानांत याचें नांव झालें आहे. सत्याग्रहाची शक्ति सदैव काम देणारी आहे. बऱ्या च वेळा सत्याग्रहाचा अर्थ आपल्याला बरोबर समजत नाहीं. सत्यावर कायम रहाणें म्हणजे सत्याग्रह. आपलें सारें जीवन सत्याग्रह-निष्ठेवर उभें केलें पाहिजे. किती हि अडचणी आल्या तरी ज्याला आपण सत्य समजतों त्याच्याशीं अविचलित रहाणें म्हणजे सत्याग्रह. परंतु त्याकरितां आम्हाला कष्ट होतात याचें भान हि असून चालणार नाहीं. जो सत्याचा अंमल करतो त्याला त्याच्या सत्यनिष्ठेच्या प्रयत्नांत च आनंदाचा अनुभव मिळतो. त्याहून वेगळा अनुभव येत च नाहीं. आणि मधल्या कष्टाची हि त्याला जाणीव रहात नाहीं. आपण तीर्थयात्रेला गेलों तर चढ आल्यास पाय दुखायला लागतात आणि उतार आल्यास हलकें वाटतें. पण यात्रिक या चढउताराकडे लक्ष देत नाहीं. त्याचें सारें लक्ष त्याला जिथें जायचें आहे तिथें केन्द्रित झालेलें असतें. तो असें च म्हणतो कीं, मी काशीयात्रेला निघालों आहें. वाटेंत थकवा लागेल तरी तो लक्ष देणार नाहीं; तद्वत् जो आपल्या जीवनांत सत्यनिष्ठा राखतो त्याला त्यासाठीं काम सहन करावा लागला तरी तो त्याला जाणवत नाहीं.

सारांश, आपत्ति आल्या तरी सत्यावर निर्भर रहाण्याची शक्ति जनतेत आली पाहिजे. हिंसेपासून दुनियेला वांचवणारी ही च एक शक्ति आहे. समाजातील समस्या सोडविण्यासाठीं या शक्तीचा उपयोग होतो. विद्यार्थ्यांत हि सत्याग्रही वृत्ति निर्माण व्हायला हवी. लहानपणीं मी जे श्लोक शिकलों त्यांपैकीं एक श्लोक माझ्या निरंतर स्मरणांत राहिला आहे. त्यामध्यें म्हटलें आहे कीं, प्रल्हादाला किती अडचणींना तोंड द्यावें लागलें तरी त्यानें रामनाम सोडलें नाहीं अशा तऱ्हेनें सामाजिक शिक्षणांत आणि शालेय शिक्षणात सत्याग्रहाच्या शिक्षणाला स्थान हवें.

## एका घरांत अनेक धर्मीयांनीं कां राहूं नये ?

मी मुद्दां अनुशासन जरूर मानतों; पण तें आचरणांत हवें. विचारांचें पूर्ण स्वातंत्र्य पाहिजे. संस्कृतमध्यें जें विचारवैभव दिसतें तें दुसऱ्या कोणत्या च भाषेंत नाहीं. संस्कृतमध्यें सहा आस्तिक दर्शनें आहेत; तर सहा नास्तिक दर्शनें हि. पण कोणाला हि अधार्मिक म्हणता येणार नाहींत. कपिल महामुनि नास्तिक होते; पण तरी हि ते हिंदु च राहिले कारण त्यांचें आचरण चांगलें होतें. कोणी सदाचरणी असला आणि ईश्वराला मानीत नसला तर त्याला तसें स्वातंत्र्य आहे. पतंजलि ईश्वराला मानत होते, त्यांना तसें हि स्वातंत्र्य होतें. अशा प्रकारें हिंदुधर्मात अनेक दर्शनें होतीं. त्याच्यात परस्परविरोध हि होता. विचारमंथन चालू होतें. या प्रकारचें विचारस्वातंत्र्य असायला पाहिजे.

प्राचीन काळीं हिंदुस्थानात असें दिसत असे. एका च कुटुंबांत बाप हिंदु तर एक मुलगा बौद्ध आणि दुसरा जैन. यात कोणाला च विरोध जाणवत नव्हता. मग आज असें कां होऊं नये कीं, एका च घरांत एक भाऊ हिंदु, एक मुसलमान आणि एक ख्रिस्ती ? आचार ही वेगळी गोष्ट आहे. आचरणाचे कांहीं सामुदायिक नियम असतात त्यांच्या आधारें आपण वागूं. पण विचारांचें स्वातंत्र्य कां नको ? आमच्या कुलपरंपरेंत अद्वैत चालूं आहे तर आम्हाला हि अद्वैत मानणें भाग आहे आणि द्वैत असेल तर द्वैत, असें का ? यावर आम्हाला विचार करायला पाहिजे. मला माहीत आहे कीं, या गोष्टीस लोक एकदम कबूल होणार नाहींत. पण एका

च घरांत चांगला हिंदु, चांगला मुसल्मान, चांगला खिश्चन राहिला तर काय हरकत ? ज्याची जी श्रद्धा असेल तिला तो मानेल. विश्वास जबरदस्तीनें बसूं शकत नाहीं. एका गोष्टीवर माझा विश्वास आहे म्हणून तुम्हीं हि त्यावर विश्वास ठेवला पाहिजे असे आपण दुसऱ्याला सांगूं शकत नाहीं. याकरितां एका घरांत अनेक धर्म नांदूं शकतात. ही गोष्ट मानायला आमच्या मनाची तयारी झाली पाहिजे. तर सत्याग्रहाचा विचार वाढेल. जर माझा सत्याचा आग्रह असेल तर तें मी दुसऱ्यावर लादूं शकत नाहीं, आणि दुसरा हि माझ्यावर लादूं शकत नाहीं. आपण एकमेकांना समजावूं शकतों, मतपरिवर्तनाची कोशिस करूं शकतों तसें झाले तर आपण बदलूं, नाहीं तर अलग राहूं शकूं. धर्मांच्या, समाजाच्या आणि सर्व प्रकारच्या विचारांत अशा प्रकारचे विचारस्वातंत्र्य असले पाहिजे.

वायकम् ( कोट्टायम् )
४–५–'५७

## स्वामित्वविसर्जन पवित्रतम गोष्ट : ४७ :

मीं जेव्हां केरळमध्ये प्रवेश केला तेव्हा माझे स्वागत करण्यासाठीं निरनिराळ्या पक्षांचे लोक आले होते. त्यांत आपले गवर्नर हि होते. त्यांनी सांगितलें, तुम्ही ग्रामदान मागायला आल्यात पण गांव कुठून सुरू होतें आणि कुठें संपतें याचा पत्ता च लागत नाहीं. म्हणून येथे राज्याचे च दान व्हायला हवें. कोणता हि विचार प्रथम स्फुरतो. त्याला आपल्या भाषेत संकल्प म्हणतात. नंतर तो वाणींत उतरतो. लोक बोलूं लागतात. त्यानंतर तो कृतींत येतो. संकल्प, वाणी, कृति हा एक च रस्ता आहे. राज्याचें दान झालें पाहिजे, झालें पाहिजे असें बोलायला तर लागा ! मग त्याचें कृतींत रूपांतर होईल.

### ख्रिस्ती अनुकूल

यासाठीं या प्रदेशांत वातावरण तयार झालें आहे. कम्युनिझम आणि धर्मसंस्था हे परस्परविरोधी मानले जातात. परंतु दोन्ही सांगतात कीं, भूदान व्हायला हवें. तुम्हा लोकांना माहीत असेल कीं येथील चर्चवाल्यांनीं जाहीर केलें आहे कीं भूदान म्हणजे येशू ख्रिस्ताच्या उपदेशाची अंमलबजावणी आहे. त्याची शिकवण होती कीं 'जितकें तुम्ही तुमच्यावर प्रेम करतां तितकें च शेजाऱ्यावर हि करा.' शेजाऱ्यावर प्रेम करा असें कोणी म्हणालें तर सहज समजण्यासारखें आहे. परंतु येशूनें एवढें च सांगितलें नाहीं तर एक फार मोठी गोष्ट सांगितली. ती म्हणजे आपल्या स्वतःइतकें च शेजाऱ्यावर प्रेम करा. इथें शंकराचार्यांनीं हि हा च विचार सांगितला एवढें च नाहीं तर शेजाऱ्यावर आपल्यासारखें च प्रेम कां करावयाचें याचें हि त्यांनीं तत्त्वज्ञान सांगितलें. तें म्हणजे आपल्यात आणि शेजाऱ्यांत काहीं च भेद नाहीं. आत्मा सर्वांत समानरूप आहे. ख्रिस्तानें हें कारण स्पष्ट शब्दांत सांगितलें नाहीं. त्यानें आपल्यासमोर एक जीवनविचार ठेवला. शेजाऱ्यावर आपल्या स्वतःसारखें प्रेम करा. यातल्या 'स्वतःसारखें' शब्दानें सारा भेद नाहींसा केला. भूदान याहून काय मागतें? म्हणून येथील सर्व चर्चवाल्यांनीं जाहीर केलें कीं, या यज्ञाला त्यांची पूर्ण सहानुभूति आहे.

गरीबांना जमीन देणं आम्ही समजूं शकतो. तें करुणेचें कार्य आहे म्हणून योग्य आहे. परंतु आपण व्यक्तिगत मालकी नाहींशी करूं पहात आहात. व्यक्तिगत मालकी पवित्र आहे असें आम्हाला वाटतें असा कांहीं पाद्री लोकांचा त्यावर आक्षेप होता. त्यांना मीं समजावलें कीं, कोणीं प्रामाणिकपणें केलेल्या कमाईवर दुसऱ्यानें आक्रमण करूं नये हें मी सुद्धां मानतों. ती हिरावून नेणं चूक आहे. पण इंग्रजींत ज्याला property म्हणतात त्या बाबतींत एक च विचार लक्षात घेतलेला असतो आणि तो म्हणजे ज्या साधनांनीं ती मिळवली ती proper होती का improper? जर तीं साधनें proper नसतील तर property शब्द लागू होत नाहीं. जर एखाद्यानें धर्म-साधनांनं संपत्ति मिळवली आहे असें आपण मानतों तर ती पवित्र गोष्ट आहे. आपणें प्रामाणिकपणें मेहनत करून संपत्ति

मिळवली असेल तर आपण म्हणतों कीं, तिच्यावर त्याचा हक्क आहे; परंतु मुलांकरितां तो हक्क सोडून दे असें आपण म्हटलें आणि त्यानें हें मानलें तर तो अधर्म नसून धर्म च मानला जाईल.

व्यक्तिगत मालकी पवित्र गोष्ट आहे हें मला मान्य आहे. म्हणून च तिचें विसर्जन त्याहून पवित्र आहे. आपण छिनावून नेण्याची गोष्ट च करीत नाहीं. भूदानांत छिनावून घेण्याला स्थान च नाहीं. त्यामध्यें विचारपूर्वक समजावून प्रेमानें मिळवायचें आहे, हक्क म्हणून मागायचें आणि हक्क म्हणून मिळवायचें. ग्रामदानामध्यें कुटुंबाचा विच्छेद नाहीं, विस्तार आहे, असें मी समजतों. म्हणून तुम्ही आपली स्वकष्टार्जित संपत्ति ग्राम-परिवाराला अर्पण कराल तर ती पवित्रतम वस्तु होईल.

अर्नाकुलम् (त्रिचूर)
६-५-'५७

